


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

## दिवाळी अंक १९८७

वर्ष ४०–४१ । अंक १२–१
सप्टें.–ऑक्टो. १९८७
किंमत १५ रुपये   वार्षिक वर्गणी ४५ रुपये
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ३००/–   संस्था : रु. ५००/–
या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक सहमत असतीलच, असे नाही.

---



---

**संपादकीय पत्रव्यवहार :**
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले.

अनुक्रमणिका

# नवभारत

सप्टें.–ऑक्टो. १९८७

## अनुक्रम



## लेखक-परिचय

■ **सतीश सभरवाल :** समाजशास्त्राचे प्राध्यापक, सेंटर फॉर हिस्टॉरिकल स्टडीज, जवाहरलाल नेहरू विद्यापीठ, दिल्ली. ■ **वसंत पळशीकर :** ‘समाज प्रबोधन पत्रिके’चे काही काळ संपादक; विविध सामाजिक-राजकीय विषयांचे आणि समस्यांचे व्यासंगी अभ्यासक; अ ७, प्राध्यापक निवास, बोरावके महाविद्यालय, श्रीरामपूर–४१३७०९. ■ **अ. ना. ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई–४१२८०३. ■ **सतीश आळेकर :** मराठी रंगमंचावरील प्रसिद्ध अभिनेते, नाटककार आणि दिग्दर्शक तसेच थीएटर अकॅडमी या नाटचसंस्थेचे अध्यक्ष; ४३८ शनिवार पेठ, पुणे– ४११०३०. ■ **अशोक दा. रानडे :** संगीताचार्य; साहाय्यक संचालक, नॅशनल सेंटर फॉर द परफॉर्मिंग आर्ट्स, मुंबई; ७, ज्ञानदेवी, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–४०००५१. ■ **र. गो. लागू :** लेखक व टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र येथे प्राध्यापक; होमी भाभा मार्ग, मुंबई– ४००००५ ■ **अनिरुद्ध कुलकर्णी :** कवी, चिकित्सक लेखक व कॉन्टिनेन्टल प्रकाशनाचे मालक; विजयानगर कॉलनी, पुणे– ४११०३० ■ **रा. ग. जाधव :** मराठी समीक्षक व विश्वकोशाच्या मानव्यविद्या कक्षेचे प्रभारी विभाग संपादक, वाई– ४१२८०३ ■ **मे. पुं. रेगे :** संपादक, ‘नवभारत’ आणि ‘न्यू क्वेस्ट’, वाई– ४१२८०३ ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :** प्राज्ञपाठशाळामंडळाचे अध्यक्ष; प्रमुख संपादक, धर्मकोश, वाई– ४१२८०३. ■ **एस. डी. इनामदार :** मराठी कथाकार व विश्वकोशात विविध कला-विषयांचे संपादक, वाई– ४१२८०३.

०००






# संपादकीय

नवभारताचा हा दिवाळी अंक आपल्या हाती देताना आम्हास आनंद होत आहे.

दरवर्षीच्या दिवाळी अंकाप्रमाणे ह्या अंकातही आम्ही साहित्य, ललितकला, सामाजिक–राजकीय प्रश्न, विज्ञान अशा विषयांवरील लेख अंतर्भूत केले आहेत.

'इंडिया : रूट्स ऑफ क्रायसिस' ह्या प्रा. सतीश सभरवालकृत पुस्तकावर प्राज्ञपाठशाळेने विस्तृत चर्चा घडवून आणली होती. 'आधुनिक, एकात्म राष्ट्रसत्ता उभारण्यात देशाला आलेल्या अपयशाची ऐतिहासिक–समाजशास्त्रीय चिकित्सा' असे ह्या पुस्तकाचे स्वरूप आहे. पुस्तकातील विवेचन सर्वमान्य होण्यासारखे नसले, तरी ते चर्चेला चालना देणारे असल्यामुळे श्री. वसंत पळशीकर ह्यांनी त्या विवेचनाचा केवळ परिचय 'नवभारता'च्या वाचकांना करून दिलेला आहे. प्रा. सभरवाल ह्यांच्या चिकित्सेची चिकित्सा स्वतंत्रपणे करणे युक्त होईल, असे श्री. पळशीकर ह्यांना वाटते. अशी चिकित्सा झाली, तर तिचेही नवभारत स्वागत करील.

अतिसंवाहकतेचा (सुपरकाँडक्टिव्हिटी) शोध डच वैज्ञानिक हाइके कार्मलिंग–ऑनेस ह्यांनी १९११ साली लावला. त्यावर सु. पाउणशे वर्षांचा काळ लोटल्यानंतर गेल्या वर्षात अतिसंवाहक द्रव्यांच्या संदर्भात जी विलक्षण प्रगती घडून आलेली आहे, तिचा आढावा श्री. अशोक नारायण ठाकूर ह्यांनी आपल्या लेखात सविस्तरपणे घेतलेला आहे. अतिसंवाहकतेच्या क्षेत्रात आपल्या संशोधनाने मोलाची भर घालणाऱ्या गेओर्ग बेडनोर्झ आणि अलेक्झ म्लूलर ह्यांना १९८७ चे भौतिकीतले नोबेल पारितोषिक देऊन गौरविण्यात आले आहे, ह्या पार्श्वभूमीवरही हा लेख वाचण्यासारखा आहे. विज्ञान हे पूर्णतः वस्तुनिष्ठ नसते; त्यात भावनोद्दीपनाला एक विधायक स्थान आहे, अशी वेगळी भूमिका घेऊन लिहिलेल्या मायकेल पोलान्यी ह्यांच्या लेखातील काही भागांचा अनुवाद डॉ. र. गो. लागू ह्यांनी नवभारतासाठी केला आहे.

डॉ. अशोक रानडे ह्यांनी एक प्रभावी संपर्कक्रिया म्हणून 'कीर्तन' ह्या प्राचीन संस्थेचा विचार आपल्या लेखात करीत असताना सौंदर्यमीमांसेत कीर्तनासारख्या कलाप्रकाराचे सखोल मूल्यमापन व्हावे, ही अपेक्षा व्यक्तविली आहे

थीएटर अकॅडमी ह्या ख्यातनाम नाट्यसंस्थेचे अध्यक्ष, तरुण नाटककार आणि दिग्दर्शक डॉ. सतीश आळेकर ह्यांनी नाट्यक्षेत्रातल्या आपल्या प्रवासाचा आरंभापासून घेतलेला आढावा ह्या दिवाळी अंकात प्रसिद्ध करता आला, ह्याचा आनंद वाटतो.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ह्यांनी भारतीय शास्त्रांचे जे अध्ययन-अध्यापन केले, त्या संदर्भात प्रा. मे. पुं. रेगे ह्यांनी घेतलेली त्यांची मुलाखत ह्या अंकात आम्ही सादर केली आहे. तसेच 'इस्लामी संस्कृतीची रूपरेखा' ह्या कौषिक ह्यांच्या लेखाचा पहिला भाग ह्या अंकात आम्ही देत आहोत.

श्री. अनिरुद्ध कुलकर्णी ह्यांचे इब्सेनवरील काही लेख आम्ही ह्यापूर्वी प्रसिद्ध केलेलेच आहेत. 'ट्रोल्स विरुद्ध इब्सेन' हा त्यांचा ह्या अंकातील लेख, त्यांच्या इतर लेखांप्रमाणेच वाचकांना वैशिष्टचपूर्ण वाटेल. विविध प्रकारच्या लेखक-वाचकांचा संदर्भ घेऊन आपल्या वाङ्मयीन संस्कृतीबाबत प्रा. रा. ग. जाधव ह्यांनी मांडलेले विचारही ह्या अंकात आम्ही अंतर्भूत केले आहेत.

जगद्विख्यात जर्मन साहित्यिक फ्रांट्स काफ्का ह्याच्या काही कथांचा, श्री. एस. डी. इनामदार ह्यांनी केलेला अनुवाद ह्या अंकात प्रसिद्ध केला आहे. हा एक नवा उपक्रम आहे. भारतीय तसेच एकूण जागतिक साहित्यातील श्रेष्ठ कथांचे दर्जेदार अनुवाद उपलब्धतेनुसार ह्यापुढेही प्रसिद्ध करण्यात आम्हास आनंद वाटेल.

ही दिवाळी आमच्या सर्व लेखक-वाचकांना, जाहिरातदारांना आणि हितचिंतकांना सुखसमृद्धीची जावो, ही शुभेच्छा.



अनुक्रमणिका

## मुखपृष्ठावरील चित्र

'नाइके (व्हिक्टरी) ऑफ सॅमोथ्रेस' हे प्राचीन ग्रीक शिल्प. त्याचा काळ साधारणपणे इ. स. पू. सु. २५० ते १८० असा दर्शविला जातो. माध्यम संगमरवर. हे शिल्प अभिजात कलेचा उत्कृष्ट नमुना मानले जाते. एका नाविक युद्धात मिळवलेल्या विजयाचे स्मारक म्हणून सॅमोथ्रेस येथे ते उभारले गेले. 'नाइके' ह्या ग्रीक विजयदेवतेची ही मूर्ती आहे. आकाशातून उतरलेली, पंख असलेली ही देवता नुकतीच गलबताच्या नाळेवर पाऊल ठेवते आहे, हा क्षण ह्या शिल्पात नेमका पकडला आहे. आकृती पुढे जात असली, तरी वाहणाऱ्या वाऱ्याच्या वेगाने तिची वस्त्रे काहीशी मागे फडफडत आहेत, आणि तिलाही त्या वेगाचा अटकाव होतो आहे, हे तिच्या हालचालींतून जाणवते. आकृतीचा डौल व गतिमान लयबद्धता; पसरलेल्या रुंद पंखांची गतीमुळे होत असलेली थरथर; वाऱ्यावर विहरणाऱ्या वस्त्रांच्या घड्यांच्या शिल्पांकनांतील छायाप्रकाशाचा सुंदर खेळ; आकार व अवकाश यांतील अतूट नातेसंबंध, यांसारख्या लक्षणीय वैशिष्ट्यांनी ही कलाकृती, कलेच्या इतिहासात अजरामर ठरली आहे. 'नाइके' ह्या विजयदेवतेची ही विशीर्ष मूर्ती तिच्या आकारिक वैशिष्ट्यामुळे एखाद्या आधुनिक अमूर्त (ॲब्स्ट्रॅक्ट) शिल्पाची आठवण करून देते. उदाहरणार्थ, हे शिल्प पाहून एखाद्याला आधुनिक रूमानियन शिल्पकार कॉन्स्टंटिन ब्रांकूश ह्याच्या, उड्डाण करणाऱ्या पक्ष्यांच्या अमूर्त शिल्पांची आठवण होणेही शक्य आहे. शेक्सपिअरच्या नाटचकृती जशा आजही आजच्या वाटतात, तसेच हे शिल्प. श्रेष्ठ कलाकृती कालातीत असते, असे आपण जे म्हणतो, ते ह्याच अर्थाने. हे शिल्प सध्या पॅरिस येथील लूव्हरच्या कलासंग्रहालयात आहे.

अनुक्रमणिका

# कै. वेणीमाधवशास्त्री बाळाजी जोशी

दिनांक १२ सप्टेंबर १९८७ रोजी पहाटेस वेणीमाधवशास्त्री जोशी यांचे वयाच्या ९२ व्या वर्षी मुंबई येथे दुःखकारक निधन झाले. सुमारे तीन आठवडे वृद्धापकाळामुळे ते आजारी होते.

आज भारतामध्ये आयुर्वेदाचे सांगोपांग अध्ययन केलेले व आयुर्वेदाची तात्त्विक विचारपद्धती सुसंगत रीतीने मांडणारे असे जे काही मोजके पंडित आहेत, त्यांच्यापैकी ते एक होते. आधुनिक वैद्यकाचा अभ्यास त्यांनी केला होता; परंतु प्रत्यक्ष व्यवसायामध्ये त्यांनी आपली आयुर्वेदनिष्ठा निरपवाद रीतीने सांभाळली. आयुर्वेद आणि आधुनिक वैद्यक या दोन्ही परंपरांचे एकत्र संमिश्र शिक्षण देणारी महाविद्यालये– महाराष्ट्रात व एकंदरीत भारतात भरभराटीस आलेली दिसतात. त्यांतून बाहेर पडलेले शेकडा ९९ पदवीधर आधुनिक वैद्यकाच्याच द्वारे वैद्यकीय व्यवसाय चालवितात. म्हणून वेणीमाधवशास्त्री जोशी यांचे असे मत झाले होते, की आयुर्वेद महाविद्यालयात आधुनिक वैद्यकाचा अभ्यासक्रम ठेवू नये. तो ठेवल्यामुळे आयुर्वेदाची पूर्ण हानी होते. आयुर्वेदाचा प्रत्यक्ष उपचारात उपयोग न राहिल्याने आयुर्वेद हा केवळ ऐतिहासिक संशोधनाचाच विषय बनेल. दुसरी गोष्ट अशी, की आयुर्वेदाच्या उपचारांमध्ये औषधाचे दुष्परिणाम (साइड इफेक्ट) आढळत नाहीत. आधुनिक वैद्यकातील औषधोपचारामध्ये अजून दुष्परिणाम टाळता येत नाहीत. त्यामुळे एका रोगाचे निवारण होते, परंतु दुसऱ्या रोगांचाही उद्‌भव होऊ लागतो. म्हणून जनहिताच्या दृष्टीने विचार केला असता, आयुर्वेदाची उपचारपद्धती ही त्यांच्या मते मानवाला अत्यंत लाभदायक आहे.

त्यांनी दीर्घकालपर्यंत आयुर्वेदासंबंधी लहानमोठ्या विषयांवर विपुल लेखन करून प्रसिद्ध केले आहे. त्यानी आयुर्वेदाचा महाकोश संपादित करून आयुर्वेदाचा उत्कृष्ट संदर्भग्रन्थ जिज्ञासूंना उपलब्द करून दिला आहे. हा कोश संस्कृत व मराठीमध्ये तयार केला आहे. आयुर्वेदाचा व्यवसाय करीत असता, आयुर्वेदाचे पठण-पाठणही त्यांनी नित्य चालविले होते. सातारा आणि अहमदनगर येथील महाविद्यालयांचे प्राचार्य म्हणून अनेक वर्षे त्यांनी अध्यापनाचेही काम केले आहे

आयुर्वेद हे सबंध मानवी जीवनाचे शारीर आणि मानसिक आरोग्याचे शास्त्र आहे; आणि ते एका अर्थी मोक्षशास्त्रही आहे; हा मूलभूत सिद्धान्त त्यांनी आपल्या लेखांमधून निरनिराळ्या अंगोपांगांचा विचार करीत असता मांडला आहे. मानवाची समग्र प्रकृती तपासून, सर्वांगीण नीट परीक्षा करून उपचार करणे हे वैद्यकशास्त्राचे कर्तव्य आहे. हे कर्तव्य परंपरागत आयुर्वेदज्ञ त्याचप्रमाणे आधुनिक वैद्यकज्ञ दुर्लक्षित करतात असे त्यांचे मत होते. समग्र प्रकृती-परीक्षणाचे तंत्र वेणीमाधवशास्त्री जोशी यांनी आपल्या लेखांमध्ये सुबोध रीतीने मांडलेले आहे. उदा., त्रिदोष विचारांबरोबर शरीराचे घटक सप्तधातूदेखील विचारात घेतले पाहिजेत आणि ते कसे विचारात घ्यावे याचे स्पष्टीकरण चरक आणि सुश्रुत या ग्रंथांमध्ये नीट रीतीने मिळते, ही गोष्ट त्यांनी आपल्या

अनुक्रमणिका

लेखांमध्ये समजावून सांगितली आहे. व्यक्तीचे आहार-विहार आणि आवडी-निवडी यांचा विचार केला तर त्रिदोष व सप्तधातू यांचा उलगडा करता येतो, असे त्यांनी सिद्ध केले आहे. आयुर्वेदामध्ये सुसाध्य, दुःसाध्य आणि असाध्य असे व्याधींचे वर्गीकरण केलेले आहे. वेणीमाधवशास्त्री यांनी अनुभवावरून असे निश्चित केले होते, की दुःसाध्य वा असाध्य यांची सीमारेषा निश्चित करणे कठीण आहे, म्हणून असाध्य व्याधीदेखील निवारणे शक्य आहे. वेणीमाधवशास्त्री हे नित्य प्रयोगशील होते. शास्त्रशुद्ध रीतीने तयार केलेली औषधे उपलब्ध व्हावी म्हणून स्वतःच्या व्यवसायाकरता लागणारी दुर्मिळ औषधेही त्यांनी आपल्या उमेदीच्या काळात बनवून ठेवली होती. त्या औषधांच्या योगाने असाध्य व्याधीने ग्रस्त झालेले अनेक रुग्ण त्यांनी बरे केल्याचीही उदाहरणे आहेत. देह कायम रोगमुक्त आणि जरामुक्त करता येतो, असा एक विचार आयुर्वेदाच्या रससिद्धान्त परंपरेमध्ये मांडलेला आढळतो. वेणीमाधवशास्त्री जोशी यांची या सिद्धान्तावर श्रद्धा होती. रस म्हणजे पारद. पारद (पारा) एक विष म्हणून असेवनीय आहे हे निश्चितपणे सांगता येते. त्या पारदाची विषमता नष्ट करण्याची शोधनप्रक्रिया रससिद्धान्ताच्या आयुर्वेद ग्रंथात सांगितली आहे. हा शुद्ध केलेला पारद सुवर्ण, लोह, ताम्र इ. धातूंच्या औषधांतून वापरला, तर ती औषधे अत्यंत प्रभावी बनतात आणि दुःसाध्य व्याधींचा निरास करतात; या विचारावर वेणीमाधवशास्त्री जोशी यांची श्रद्धा होती पारदशुद्धीचा प्रयोग करण्याकरिता वेणीमाधवशास्त्री जोशी यांची नागपूर विद्यापीठाने काही वर्षे प्रपाठकपदावर नियुक्ती केली होती. दीर्घकाल नियुक्ती केली असती तर पारदाचा प्रभावीपणा निश्चित रूपाने सिद्ध किंवा असिद्ध करता आला असता. आयुर्वेदाची औषधे निर्माण करणारे शेकडो कारखाने या देशात आहेत; परंतु त्या औषधांच्या प्रमाणशुद्धतेची खात्री देता येत नाही, याबद्दल वेणीमाधवशास्त्री जोशी हे नेहमी खंत व्यक्त करीत. आयुर्वेदाची उपेक्षा होण्याची जी अनेक कारणे आहेत, त्यांमध्ये प्रमाणशुद्ध औषधांची उपलब्धता नसणे हे एक कारण होय, असे ते म्हणत.

वेणीमाधवशास्त्री यांचा जन्म १८९६ मध्ये धुळे जिल्ह्यातील पिंपळनेर (ता. साक्री) या गावी झाला. त्यांनी प्रशिक्षण विद्यालयाची तीन वर्षे पूर्ण करून पदविका मिळविली होती. १९१६ साली ते धुळे जिल्ह्यात प्राथमिक शाळेचे मुख्याध्यापक म्हणून व्यवसाय करू लागले. १९२० मध्ये महात्मा गांधींनी सुरू केलेल्या असहकारितेच्या चळवळीत त्यांनी या सरकारी सेवेचा राजीनामा दिला. त्या वेळी त्यांचे वय २५ वर्षांचे होते. आयुर्वेदाचे शिक्षण सातारा आणि अहमदनगर येथे त्यांनी घेतले. १९४२ च्या भारत छोडो चळवळीत त्यांनी भूमिगत राहून काम करणाऱ्या स्वातंत्र्यसैनिकांना, मुंबई येथे व्यवसाय करीत असताना अनेक महिने आश्रय दिला होता. त्यांच्या पाठीमागे त्यांच्या दोन कन्या, पत्नी व एक पुत्र असा परिवार आहे.

दिवंगताच्या आत्म्यास सद्गती लाभो !



अनुक्रमणिका

# भारतापुढील पेचप्रसंगाचे यथार्थ स्वरूप

सतीश सभरवाल
(अनुवाद व निवेदन : वसंत पळशीकर)

आधुनिक राष्ट्रसत्ता म्हणून भारताची भक्कम उभारणी करण्यात आपणास यश येत नसल्याचे उत्तरोत्तर अधिकाधिक तीव्रपणे जाणवत आहे. भारताने स्वीकारलेली राज्यघटना लिखित स्वरूपाच्या राज्यघटनांमध्ये सर्वांत तपशीलवार व नमुनेदार मानली जाते. अनेकानेक घटनापंडितांनी जगभरच्या राज्यघटनांचा अभ्यास करून ती तयार केली. तिचा स्वीकार करणारी घटनापरिषदेतील बुजुर्गमंडळी विलक्षण, सुजाण व प्रागतिक होती. तरीपण, अवघ्या चाळीस वर्षांच्या कालावधीत इमले ढासळत चालल्याची, विघटनाच्या दिशेने पावले पडत असल्याची अनुभूती तीव्रपणे का येते ?

अगदी अलीकडील काही घटना नजरेसमोर आणा. अलीकडे नागपूर विद्यापीठात झालेल्या प्राध्यापकांच्या बढत्या/नेमणुकांच्या प्रकरणी इतका गैरव्यवहार झाला की न्यायाधीशांचा आयोग नेमून चौकशी करावी लागली. पुणे विद्यापीठांतर्गत लाथाळी व गैरव्यवहार यांची लक्तरे चव्हाटयावर परवापरवाच धुतली गेली. राजकारण, वशिलेबाजी/गटबाजी या गोष्टी फक्त भारतातच चालतात असे अर्थातच नाही. महत्त्वाचा फरक असा दिसतो की विद्यापीठांतील सर्वोच्च अधिकारी व्यक्ती व मंडळे स्वतःच गैरव्यवहारांची जनक असतात. म्हणजे कुंपणच शेत खाऊ लागते.

राजस्थानमधील देवराळा गावातील रूपकुंवरचे सतीप्रकरण घ्या. ती स्वतःहून सती गेली की तिला सक्तीने सती जाण्यास भाग पाडले गेले, हा मुद्दा वेगळा ठेवू. पण आजच्या कायद्यानुसार सतीला बंदी आहे. याचाच अर्थ, गावच्या पोलीसपाटीलापासून ते थेट राष्ट्रपतीपर्यंत प्रशासनयंत्रणेतील सर्वांचेच काही कर्तव्य आहे. अंतिमतः राज्यसत्ता ही दंडसत्तेची सर्वाधिकारी असते; आणि कायदा मोडणे ती खपवून घेत नाही ही गोष्ट लोकांना दिसावी लागते. पण देवराळात जे घडले त्या संदर्भात शासनाने आपले हे स्थान गमावले ही गोष्ट स्पष्ट होते.

'कायद्याचे राज्य' ही संकल्पना लिबरल लोकशाही राज्याच्या दृष्टीने मध्यवर्ती महत्त्वाची किंबहुना, ते लिबरल लोकशाही राज्याचे व्यवच्छेदक लक्षण मानले जाते. लिबरल लोकशाहीचे ते अधिष्ठान आहे. राजकीय बंडखोर वा अपराधी व्यक्ती यांना ('नक्षलवादी', पंजाबातील अतिरेकी, इ.) 'झटापटीं'ची खोटीच बतावणी करून ठार मारल्याची कैक उदाहरणे सर्रास घडत आहेत. रीतसर चौकशी न करता, खटले भरले न जाता शेकडो, का हजारो, कैद्यांना तुरुंगात डांबले गेले आहे. कायद्याचे राज्य देशात प्रस्थापित राहील हे पाहण्याची ज्या यंत्रणेची खास जबाबदारी ती पोलीसयंत्रणाच या तत्त्वाची राजरोस पायमल्ली करीत आहे. अलीकडच्या मीरत येथील दंगलीत सशस्त्र पोलीसदलाने दंगलखोर म्हणून भाग घेतल्याची घटनाही घडलेली आपण पाहिली.

सरकारी/निमसरकारी खाती, महामंडळे, यंत्रणा यांचा व्याप दिवसेंदिवस वाढतो आहे. नोकरशाहीची पोच आज कितीतरी पटींनी वाढलीय. व्यक्तिनिरपेक्ष भूमिकेतून नियमानुसार कामे करणाऱ्या नोकरशाहीच्या मार्फत शासन चालविले जाणे हे आधुनिक राज्यव्यवस्थेचे एक असेच व्यवच्छेदक वैशिष्टच. सर्व नागरिक समान दर्जाचे असतात, तसेच प्रकरणांचे निवाडे व्यक्तींकडे पाहून वा कर्मचारी / अधिकारी यांच्या आवडीनिवडीनुसार वा लहरीखातर करावयाचे नसतात तर काही सर्वमान्य नियमांना, पूर्वसंकेतांना अनुसरून करावयाचे असतात, ही नोकरशाहीमार्फत दैनंदिन कारभार चालविण्यामागची धारणा/ भूमिका आहे. आमदार, खासदार, मंत्री हा विवेक बाळगताना आढळत नाहीत. आणि नोकरशाहीत काम करणारे कर्मचारी / अधिकारी पण, सत्ता गाजविण्याची










अनुक्रमणिका

वा पदरात लाभ पाडून घेण्याची एक संधी म्हणून स्वतःच्या नोकरशाहीतील स्थानाचा उपयोग करून घेताना आढळतात. नियम व कायदेकानू यांना बगल देऊन वा त्यांना वाकवून स्वतःस हवा तसा निर्णय करतो वा हवी ती गोष्ट घडवून आणतो तो खरा कर्तबगार मंत्री, लोकप्रतिनिधी, वा कर्मचारी/अधिकारी अशी भावना लोकांमध्येही सार्वत्रिक आढळते.

राज्यघटनेची तोंडाने व्यासपीठावरून स्तुती करावयाची व व्यवहारात तिला लाथाडून आपल्या स्वार्थासाठी मनमानी कारभार करावयाचा, असे चित्र दिसते. आपण भारतात आधुनिक एकात्म राष्ट्रसत्तेची निर्मिती करण्यात अपयशी ठरलो आहोत असे म्हटले तर वावगे ठरणार नाही.

हे अपयश आपण एवढे मनावर घ्यायलाच हवे का ? समाजाचे रहाटगाडगे बंद पडलेले नाही; आणि, सर्वांचे भले जरी साधत नसले तरी, काहींचे उखळ तरी पांढरे वा पिवळे होत आहे ना; असे म्हणून, वाहत्या गंगेत आपणही हात धुवून घ्यायला काय हरकत आहे? इतकी स्वार्थी भूमिका निर्लज्जपणे जे घेऊ शकत असतील त्यांची गोष्ट सोडूनच द्यायला लागेल. पण आधुनिक राष्ट्रसत्तेची चौकट तर औपचारिकतः स्वीकारावयाची, जागतिक आर्थिक व्यवस्थेत त्या भूमिकेतून सहभागी तर व्हावयाचे, पण व्यवहारात ती धाब्यावर बसवायची यामधून समाज व राज्यसत्ता दोहोंच्या ठायी कमालीचे दुबळेपण उत्पन्न होते ही अनुभवाची गोष्ट आहे. कोणतीही समस्या असो, मग ती सर्वांना साक्षर करण्याची असो वा सर्वांना निवारा पुरविण्याची असो वा प्रकल्पग्रस्त विस्थापितांच्या पुनर्वसनाची असो वा अतिरेक्यांचा मुकाबला करण्याची असो, ती समाधानकारकपणे सोडविण्याची क्षमता आपण गमावून बसलो आहोत. या दुबळेपणामुळे आपले परकीय सत्तांवरचे अवलंबन वाढत आहे. सर्वसामान्य नागरिकांचे हाल वाढत चालले आहेत. साधनसंपत्तीचे स्रोत आटत तरी चालले आहेत वा उजाड बनत आहेत. १९४३ साली शासनाच्या अव्यवस्थेमुळे बंगालमध्ये लाखो लोक अन्नान्नदशा होऊन मेले. त्याची भयानक पुनरावृत्ती नजीकच्या भविष्यकाळात कधीही होऊ शकते. अनेक पटींनी होऊ शकते. किंवा आवरता न येणाऱ्या जातीय व धर्मीय दंगलींच्या साखळीप्रक्रियेने देश जर्जर होऊ शकतो. आपल्या समाजाचे वा देशाचे असे व्हावे ही गोष्ट ज्यांना सहन होत नाही त्यांनी निश्चितपणे अपयशाची बाब मनावर घ्यावी.

सामान्यतः असे होते की दोषारोप व्यक्तींवर, विवक्षित राजकीय पक्षांवर, वा यंत्रणेवर टाकला जातो. उदाहरणार्थ, काही वर्षांपूर्वी, विरोधी राजकीय पक्षांनी, देशाच्या सर्व समस्यांचे मूळ इंदिरा गांधींच्या हाती सत्ता असण्यात आहे अशी हवा निर्माण केली होती. आज, ' राजीव गांधी हटाओ ' मोहीम याच तर्काच्या आधारे काही पक्ष हाती घेत आहेत. उलटपक्षी, परकीय सत्तांना कधी पाकिस्तान तर कधी अमेरिका तर कधी सी. आय. ए. तर कधी वासाहतिक साम्राज्यसत्ता–छुप्या हस्तक्षेपामधून साऱ्या अडचणी उपस्थित होत आहेत असे भासविणे हा आजच्या राज्यकर्त्या पक्षाच्या पुढाऱ्यांचा नेहमीचा शिरस्ता बनला आहे.

समर्थ राष्ट्रसत्ता उभारण्यातले आपले वाढते अपयश हे व्यक्ती वा पक्ष वा परदेशसापेक्ष मीमांसेमधून स्पष्ट करण्याचे आपले प्रयत्न धूळफेक करणारे आहेत. प्रामाणिकपणे आपण अशी मीमांसा करीत असलो तर आपण केवळ दुसऱ्यांचीच नव्हे तर स्वतःचीही तेवढीच धूळफेक करीत आहोत असे होईल. या अपयशाची उकल लाचलुचपत, वशिलेबाजी, भ्रष्टाचार, अकायक्षमता याप्रकारची कारणे देऊन करू पाहणे हेही असमाधानकारक ठरते. इतक्या सार्वत्रिकपणे लोक इतके अदूरदर्शीपणाने, असमंजसपणाने का वागतात, या प्रश्नाचा मागोवा घेणे मग आवश्यक ठरते. म्हणजेच, हा प्रश्न ऐतिहासिक व समाजशास्त्रीय चिकित्सेच्या पातळीवरून हाताळावा लागतो. समजा, आपल्या मते देशाच्या आजच्या स्थितीला काँग्रेस पक्षाचे आमदार, खासदार, मंत्री व उच्चपदस्थ नेते जबाबदार असले, तरी मग असे नेते वर्षानुवर्षे निवडून कसे येतात व लोक त्यांची सत्ता कबूल का करतात, यांसारख्या प्रश्नांची उत्तरे शोधणे आवश्यक व महत्त्वाचे ठरते. मतदानकेंद्रे ताब्यात घेऊन, खोटे मतदान करवून, गुंडागर्दीची दहशत निर्माण करून, खाजगी सशस्त्र दले बाळगून मंडळी सत्ता हस्तगत करतात व राखतात असे कोणाचे म्हणणे असले तरीदेखील, आधुनिक लिबरल राज्यघटनेच्या चौकटीत या साऱ्या घडामोडी का घडून येऊ शकल्या, मान्यता व प्रतिष्ठा पावू शकल्या, हे प्रश्न उपस्थित होतात.

'इंडिया : रूट्स ऑफ क्रायसिस'* या छोटेखानी पुस्तकातील लेखांमध्ये प्रा. सतीश सभरवाल यांनी आधुनिक एकात्म राष्ट्रसत्ता भक्कमपणे उभारण्यात आलेल्या अपयशाची ऐतिहासिक-समाजशास्त्रीय चिकित्सा केली आहे. जातीयवादी तणावांच्या मुळाशी कोणत्या गोष्टी आहेत याचेही दिग्दर्शन करणारा एक लेख पुस्तकात समाविष्ट आहे. प्रा. सभरवाल दिल्लीच्या जवाहरलाल नेहरू विद्यापीठातील सेंटर फॉर हिस्टॉरिकल स्टडीज या विभागात समाजशास्त्राचे प्राध्यापक आहेत. त्यांच्या विश्लेषणाचा परिचय प्रस्तुत लेखात करून देण्याचे योजिले आहे.

प्रा. सभरवाल यांच्या पुस्तकात हिंदू-मुस्लिम धार्मिक तणावासंबंधी जे विवेचन आहे ते येथे तूर्त वगळले आहे. ते कमी महत्त्वाचे आहे अशातला भाग नाही. पण आधुनिक राष्ट्रसत्ता व अशा राष्ट्रसत्तची बैठक असलेला विशाल एकात्म समाज सुप्रतिष्ठित करण्यात येत असलेल्या अपयशाचे विवेचन हा पुस्तकाचा मुख्य भाग आहे. त्याचे विशेष महत्त्व ध्यानात घेऊन त्याचा परिचय करून दिला आहे.

त्यांच्या विवेचनातील काही भागाचे भाषांतर करण्याची पद्धत येथे अवलंबिलेली नाही. त्यांच्या प्रतिपादनाचा आशय व मुख्य रोख यांच्याशी प्रामाणिक राहून थोडी मोकळीक घेऊन मी स्वैर अनुवादाच्या पद्धतीने मांडणी केली आहे. कोठे थोडी भर घातली आहे. समाजशास्त्रीय परिभाषा व युक्तिवाद यांच्याशी अपरिचित असणाऱ्यांनाही त्यांचे विवेचन समजण्यास सोपे जाईल असे वाटते.

प्रा. सभरवाल यांच्या काही गृहीत कृत्यांविषयी माझे मतभेद आहेत. तसेच आजच्या परिस्थितीतून मार्ग कसा काढायचा याबद्दलही आमच्या भूमिका वेगळ्या आहेत. त्यांच्या चिकित्सांची चिकित्सा स्वतंत्रपणे करावी, ते अधिक युक्त होईल, असे वाटते. या लेखात त्यांच्या विवेचनाचा परिचय करून देण्याचाच तेवढा उद्देश समोर ठेवला आहे.

२

भारतावर ब्रिटिशांचा एकछत्री अंमल प्रस्थापित झाल्याने, समाजरचनेच्या मूलतः भिन्न असणाऱ्या दोन बैठकींची, त्या बैठकींमागील तत्त्वांची गाठ भारतात पडली. मागील बेंथॅम–मिल्लप्रणीत लिबरल–युटिलिटेरियन तत्त्वे आणि येथील पारंपरिक तत्त्वे यांच्यात असलेल्या विसंवादाविषयी प्रथमच लिहिले-बोलले जात आहे असे नाही. 'फ्रॉम स्टेटस टू कॉन्ट्रॅक्ट' या प्रकारे या स्थित्यंतराचे पूर्वी वर्णन केले गेले. ध्यानात घेण्याची गोष्ट अशी की सर्वस्वी भिन्न ठेवणीच्या या दोन प्रणालींची सांगड भारतात वळेच घातली गेली. भारत स्वतंत्र झाला तेव्हा पारंपरिक तत्त्वांच्या आधारे येथे राज्य, समाज व अर्थव्यवस्था यांची पुन्हा एकवार बांधणी करावयाचा निर्णय केला गेला नाही. तर ब्रिटिशांनी त्यांच्या राजवटीसाठी निवडलेली लिबरल–युटिलिटेरियन बैठकच कायम ठेवण्यात आली.

ब्रिटिशांनी भारतावर आपला एकछत्री अंमल प्रस्थापित केला असे इतिहासाच्या पुस्तकात पूर्वी एक वाक्य येई. सगळ्या हिंदुस्थानभर एका ब्रिटिशांचाच अंमल चालू झाला असा याचा एक साधा अर्थ होतो. पण याचा आणखीही एक अर्थ लावता येतो व तो अधिक महत्त्वाचा आहे. धर्म, जाती, जमाती यांच्यातल्या भेदांची, त्यांच्यातल्या पृथकत्वाची दखल न घेणारी, सर्वत्र सर्वांसाठी सारखी, तीच एक असलेली राजवट ब्रिटिशांनी प्रस्थापित केली. धार्मिक-सामाजिक जीवनाच्या क्षेत्रात त्यांनी वेगळेपणाला मान्यता दिली; पण बाकी सर्वांसाठी कायदेही तेच होते व न्यायही तोच होता. त्यांनी ज्या शाळा येथे सुरू केल्या त्यांत जात, जमात वा धर्म यांनुसार वेगळे शिक्षण नव्हते; किंवा, काहींना काही प्रकारचे शिक्षण घेण्यास बंदी नव्हती. सर्वांना सर्व प्रकारच्या नोकऱ्याचाकऱ्या व व्यवसाय खुले होते. संपूर्ण ब्रिटिश भारताची विभागणी जिल्ह्यांमध्ये केली गेली. प्रत्येक जिल्ह्यात एकाच धर्तीची प्रशासनयंत्रणा जारी करण्यात आली. प्रशासन असो की न्यायदान असो, व्यक्तिनिरपेक्ष, संदर्भनिरपेक्ष कायदेकानू, नियम, पूर्वसंकेत यांना अनुसरून कामकाज चालविण्याचे बंधन येथील गोऱ्या साहेबांवरही टाकले गेले. याही अर्थाने ब्रिटिशांनी हिंदुस्थानवर 'एकछत्री' अंमल प्रस्थापित केला असे सार्थपणे म्हणता येते.

ब्रिटिशांनी त्यांच्या राजकीय गरजेपोटी, साम्राज्यसत्तेच्या आर्थिक लाभ व सोयीसाठी अनेक गोष्टी

* ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, नवी दिल्ली, १९८६, पृष्ठे ९ + ८०, किंमत रु. ३२.००.

अनुक्रमणिका

केल्या. रस्ते बांधले, रेल्वेच्या रुळांनी देशाचे चारी कोपरे जोडले, विद्यापीठे स्थापन केली, आर्थिक व्यवहारांची व्याप्ती देशव्यापी केली, इत्यादी इत्यादी. सर्व देशभर या अर्थाने जे एकछत्र उभारले गेले त्याचा वेगळेपणा मुघलांच्या साम्राज्याशी तुलना करून आपणास जाणून घेता येईल. मुघल साम्राज्याचा ऱ्हास झाला त्या वेळी मुघल साम्राज्यातलेच सुभेदार, सरदार व मांडलिक राजे आपापल्या ठिकाणी स्वतंत्र झाले. ही गोष्ट शक्य झाली कारण जरी साम्राज्य विस्तीर्ण होते तरी अनेक वतने, जागिऱ्या, मांडलिक राजे यांचे जोडकाम करून केलेली साम्राज्याची बांधणी असे त्याचे स्वरूप बव्हंशी शिल्लक राहिले होते. ब्रिटिशांच्या राजवटीत समाजाची बांधणी व व्यवस्था अशी एकात्म होती की इंग्रजी राज्याला आव्हान देण्यासाठी अखिल भारतीय संघटना व चळवळींची निर्मिती आवश्यक ठरली. अशा चळवळी व संघटना निर्माण करणे हिंदी लोकांना शक्य झाले ही गोष्टदेखील ब्रिटिशांनी स्थापन केलेल्या नव्या प्रकारच्या बांधणीमुळेच शक्य झाली. १८५७ च्या उठावाचे उदाहरणही घेता येईल. ब्रिटिश राजवट ही नव्या धर्तीच्या राष्ट्रसत्तेची द्योतक होती. दिल्ली, कानपूर, लखनौ अशी महत्त्वाची ठाणी सर केल्यावरही ही राजवट पुन्हा मोर्चेबांधणी करून डाव उलटवू शकली. तर १८५७ चा उठाव घडवून आणणाऱ्यांना अशी सुसूत्र, एकात्म यंत्रणा उभी करण्यात घोर अपयश आले; जो तो आपल्या ठिकाणी स्वतंत्र होणे जणू पुरेसे मानीत होता.

भारतीय समाजाची पारंपरिक बांधणी, येथील ब्रिटिशपूर्वकालीन राज्यसत्तांची उभारणी या दोन्ही आधुनिक राष्ट्रसत्ता व अशा राष्ट्रसत्तेच्या पायाशी असलेला एकात्म समाज यांच्या निर्मितीच्या दृष्टीने प्रतिकूल आहेत, आणि हेच आपल्या अपयशाचे खरे मूळ कारण व स्पष्टीकरण आहे असा प्रा. सभरवाल यांचा मुख्य सिद्धांत आहे.

३

पारंपरिक सामाजिक बांधणीतल्या रचनात्मकदृष्ट्या महत्त्वाच्या मध्यवर्ती संस्था कोणत्या होत्या ? प्रामुख्याने हिंदू समाजाच्या बांधणीच्या अनुषंगानेच ही चर्चा करावी लागणार ही गोष्ट उघड आहे. कुटुंब, कुल, ज्ञाती/जात, गाव, पंचक्रोशी, वतन या संस्था मध्यवर्ती होत्या. जात व व्यवसाय यांची सांगड होती. देशव्यापी चातुर्वर्ण्यव्यवस्थेबद्दल बोलणे अगदीच निरर्थक नसले तरी, जात-जमातींचे परिणामकारक अस्तित्व वा त्यांची पोच खऱ्या अर्थाने स्थानिक होती. दैवते, आचारधर्म, जीवनातल्या महत्त्वाच्या 'संस्कारां'च्या वेळचे रीतिरिवाज, इतर चालीरीती यांच्या बाबतीत जातिजमाती म्हणजे स्वतंत्र छोटी छोटी विश्वेच जणू होती. आपापल्या विश्वात राहात असतानाही विभिन्न जातींचा, जमातींचा अन्योन्य संबंध अनेक सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक व्यवहारांच्या प्रसंगी येत होता, नाही असे नाही. पण मर्यादांच्या लक्ष्मणरेषा न ओलांडता नेमून दिलेल्या पद्धतीने हे परस्परसंबंध ठेवावयाचे असत. जात ही पूर्णपणे स्वयंपूर्ण व स्वावलंबी नसे ही गोष्ट तर उघड आहे. बृहत् 'समाजशरीरा'चा एकेक जातजमात ही घटक अवयव असे. आणि तरीही व्यापक समाजाच्या संदर्भातील नेमून दिलेल्या गोष्टी/कर्तव्ये/जबाबदाऱ्या सोडता जातीने स्वायत्तता, पृथकता व स्वयंपूर्णता जपावी, टिकवून धरावी अशी अपेक्षा असे. हीच गोष्ट ग्राम, पंचक्रोशी, वतन या वेगळ्या स्वरूपाच्या समाजघटकांचीही होती असे आपण म्हणू शकतो.

उपमाच द्यायची झाली तर असे म्हणता येईल, की जातिजमाती वा गावे हे मण्यांसारखे होते. काळाच्या ओघात त्यांची गुंफण बदलत गेलीच नाही असे नाही. तरीपण एक विलक्षण सातत्य टिकून राहिले. राज्यसत्तांचा कमीअधिक विस्तार आपणास आढळतो. पण राज्याचे घटकमणी फारसा बदल न होता तसेच राहतात. गोष्टी थोड्या अति-सोप्या करण्याचा दोष इथे उत्पन्न होतो हे खरे. पण एका मार्मिक सत्याला उठाव देण्याच्या दृष्टीने त्याचा उपयोग आहे. वतनदार, जागीरदार एक जाऊन दुसरे आले, राज्ये आली-गेली तरी रचना, बांधणी सामान्यतः तीच राहिली. जातजमातींच्या दर्जात चढउतार झाला. जातिजमातींचे टवके फुटून वेगळ्या पोटजाती अस्तित्वात आल्या; शूद्र जातींमधून राजे झाले व त्यांनी स्वतःला क्षत्रिय म्हणविले. पण जातिव्यवस्थेची तत्त्वे, व्यवहार व रचना टिकून राहिली. या रचनेत जीवनाचा, व्यवहाराचा परिघ, पल्ला स्थानिक राहण्यावरचा भर तसाच राहिला. पृथक्, स्वायत्त व स्वयंपूर्ण राहण्याच्या दृष्टीने तटबंद्या कायम राहिल्या. या दोन्ही रचनात्मक



अनुक्रमणिका

बांधणीच्या वैशिष्टयांमुळे येणारी कूपमंडुकता ध्यानात ठेवणे महत्त्वाचे आहे.

४

जात्यधिष्ठित हिंदू समाजाची ठेवण या समाजात जन्मणाऱ्या, वाढणाऱ्या माणसाच्या ठायी एक मानसिक पिंड निर्माण करते, त्याच्या वागण्याला एक वळण देत असते. प्रत्येकच समाजात अर्थात ही गोष्ट घडत असते. पण हा जो पिंड तयार होतो, वागण्याला जे वळण पडते त्या आधुनिक अर्थाच्या एकात्म समाजबांधणीच्या आड येणाऱ्या गोष्टी ठरतात असे प्रा. सभरवाल यांचे प्रतिपादन आहे.

जगण्याच्या ओघात हरघडीला माणसाला एका ना एका प्रसंगाला, समस्येला, आव्हानाला तोंड द्यावे लागते. अगदी साधी जेवणाची गोष्ट घ्या. नवख्या गावी एक सामान्य भाविक भारतीय माणूस गेला आहे असे समजा. जेवणाची वेळ झाल्यावर तो समोर दिसणाऱ्या कोणत्याही खानावळीत वा हॉटेलात जाईल का ? शाकाहारी असला तर तो मांसाहारी खानावळ व हॉटेल शक्यतोवर टाळेल. मांसाहारी असला तरी, गोमांस चालत असेलच असे नाही. किंवा त्याला मासळीचे जेवण विशेष आवडत असेल. शाकाहारी असला तरी काही कमी तऱ्हा नाहीत. महाराष्ट्रीय असला किंवा उत्तरेकडचा असला तर नुसता भात–सांबार–रस्समवाली 'मद्रासी' खानावळ त्याला चालायची नाही. यात पुन्हा कोणाच्या हातचे जेवण चालते तर कोणाच्या हातचे नाही. आजही, स्वयंपाकी व वाढपी पूर्वास्पृश्य आहेत असे, समजा, एखाद्या हॉटेल वा खानावळीच्या संदर्भात कळले, तर बरीच हिंदू माणसे तिकडे जायचे टाळतील. म्हणजे खाण्याचा प्रसंग आला तरी रीतिरिवाज, संस्कार, विधिनिषेध यांनी जे वळण पडलेले असते त्याला अनुसरून माणूस त्या प्रसंगी निर्णय घेतो. आणि आजही बहुतेक हिंदू माणसांचे हे निर्णय आधुनिक विशाल एकात्म समाजाच्या बांधणीच्या दृष्टीने कप्पे पाडणारे ठरतील असे म्हणता येते. आजही शहरात सामान्यतः, जुन्या मध्यभागातल्या हिंदू वस्तीत मुसलमान, किरिस्तांव माणसाची खानावळ मिळणार नाही. काही लोक मुद्दाम उठून अशा जागी जेवणखाण करण्यास जातील. पण बहुसंख्यजण जमेल तेथवर टाळतील. अन्यधर्मीय व्यक्ती अशा वस्तीत मुळात खानावळ टाकायलाही जाणार नाही.

दुसरे एक उदाहरण घ्या. एखाद्या ऑफिसात भारतीय माणसाला काम आहे, किंवा एखाद्या भारतीयाला नोकरी शोधायची आहे. तर, सामान्यतः, तो कसा विचार करील, वा पावले टाकील ? आपल्या नात्यातला, ओळखीतला, जातवाला, गाववाला कोणी त्या ऑफिसात काम करतो का याचा तो तपास करील. असा कोणी आहे असे त्याला कळले तर तो काहीसा निश्चिंत होईल. ऑफिसात गेल्यावर त्या माणसाची आधी भेट घेईल. मग कोण्या व्यक्तीस गाठल्यास, काय सांगितल्यास वा देऊ केल्यास काम होईल त्याची माहिती काढेल. नोकरी मिळवायची, शोधायची असली तरी, औपचारिक गरज म्हणून अर्ज टाकल्यावर नोकरीला लावून घेणे ज्याच्या हाती व मर्जीवर आहे असे त्याला वाटते त्याच्यापर्यंत 'पोचण्या' ची तो धडपड करील, त्यासाठी आखणी करील. औपचारिक नियम, कसोट्या वगैरे असतात; पण खरे म्हणजे व्यक्ती तिच्या इच्छेनुसार, लाभानुसार, लाग्याबांध्यानुसार निर्णय करीत असते अशी धारणा अजूनही मनात खोलवर रुजलेली आढळते. अधिकारपदस्थ माणसाने जात, नातेगोते, गावचा / परका, अशा पद्धतीने विचार करावा ही अपेक्षा असते. माणूस आपला काही ना काही लाभ पाहणारच, असेही गृहीत धरले जाते. ही मानसिक धारणा व वागण्याचे वळण सर्व व्यक्तींना समान लेखणाऱ्या कायदेकानू, नियम, कसोट्या यांवर आधारलेल्या नोकरशाही प्रशासनाची निर्मिती करण्याच्या आड येत राहणाऱ्या गोष्टी ठरतात.

आर्थिक-औद्योगिक व्यवहार औद्योगिक क्रांतीनंतरच्या आधुनिक, जागतिक चौकटीत संघटित झालेले आहेत. बँका, व्यापारी कंपन्या, पतपेढ्या, कारखाने अशा ठिकाणीसुद्धा, 'विश्वासा'ची म्हणून वा 'आपल्या लोकांचे आपण नाही पाह्यचे तर कोणी ?' असा युक्तिवाद पुढे करून, नाना प्रकारचे समर्थन देऊन, नात्यातली, कुटुंबातली, जातीतली, धर्माची माणसेच नेमण्याकडे कल कमी आढळत नाही. सरकारचा रेटा निर्माण होईपर्यंत, आत्ता आत्तापर्यंत स्त्रिया, पूर्वास्पृश्य, आदिवासी यांना किती ठिकाणी टाळलेच जात असे. आजही मुसलमान, ख्रिश्चन इत्यादी अल्पसंख्य वा परभाषिक माणसास नोकरी मिळवणे अनेक जागी अवघड जाते. यातून मग, आपल्याच जातिजमातीला, धर्मीयांना, भाषिकांना

सेवा देणाऱ्या, लाभ देणाऱ्या शिक्षणसंस्था, बँका, पतपेढ्या, कंपन्या, वगैरे काढल्या जातात. म्हणजे, ज्या व्यवहारांमधून वास्तविक पाहता विशाल एकात्म समाज निर्माण होण्याच्या दिशेने ठोस पाऊल पडावयास पाहिजे ते व्यवहारही स्थानिकता, तटबंद्या, पृथकता टिकवून धरण्यासच मदत करतात.

हिंदू समाजाची बांधणीच अशी होती ( आणि अजूनही आहे ) की जातिजमाती व धार्मिक समुदाय यांच्यात परस्परांमध्ये व्यवहार होत असतानाही, अन्योन्यसंबंध प्रस्थापित होत असतानाही अंतर ( व अंतराय पण ) कायम राहावे. ही बांधणी मूलतः उतरंडीच्या स्वरूपाची, उच्चनीचतेच्या कल्पनेला मूर्त रूप देणारी व लाभांचेही विषम वाटप करण्याविषयी आग्रही असलेली होती, ही गोष्ट आपणास परिचित आहे. पावित्र्य व विटाळ या संकल्पनांचाही तिच्या बांधणीमध्ये उपयोग करून घेतलेला होता. नीति-अनीती, योग्य-अयोग्य, चांगले-वाईट याच्या कल्पना ज्या त्या जातजमातीच्या वेगळ्या असाव्यात हे तर अध्याहृत होतेच. पण जीवनाचे परमोच्च श्रेय कशात आहे, ऐहिक जीवनात कशाची सर्वांत अधिक आकांक्षा बाळगावी, उद्दिष्टप्राप्तीसाठी साध्यसाधनविवेक कोणत्या प्रकारे करावा, कोणते आचारविचार, विधिनिषेध पाळावेत यांविषयीही ज्या त्या जातिजमातीच्या संहिता वेगळ्या असतील अशीच मान्यता होती. जातिजातीं-मधील परस्परवागणूक कशी असावी याविषयी त्या त्या क्षेत्राला तपशीलात जाऊन स्पष्टता केलेली आढळेल. पण जातिजमातीनुसार वेगळी वागणूक असणे न्याय्य व उचित मानलेले होते. म्हणजे, न्यायाची, औचित्याची संकल्पना होती. पण सर्वांना सारखा न्याय, ही कल्पना नव्हती. कृत्य एकच असेल, व ते गुन्हा म्हणूनही बघितले जाईल. पण शिक्षा मात्र गुन्हा करणाऱ्याची जात, त्याचे स्थान, त्याचे बलाबल, इत्यादी अनेक घटकांचा विचार करून ठरविणे योग्य अशी मान्यता होती व तसा व्यवहार होता.

प्रा. सभरवाल यांनी त्यांच्या विवेचनात वापरलेला काही संज्ञांचा येथे परिचय करून घेऊ. विशाल एकात्म समाजाला उद्देशून त्यांनी 'मेगासोसायटी' असा शब्द वापरला आहे. एका अंगाने पाहता, हिंदुस्थानभर पसरलेला हिंदू समाज हा विशाल होता. जीवनाची काही अंगे अशी होती की जिथे देशव्यापी व्यवहारही होत असे व संबंधही असत. उदाहरणार्थ, व्यापारी पेढ्या, धर्मसंप्रदाय, तीर्थक्षेत्रांच्या यात्रा करणारे लोक, ब्राह्मण पंडित व त्यांची अध्ययन केंद्रे, इत्यादी. पण स्थानिकता व तटबंद्या उत्पन्न करणारे अंतर व अंतराय यांना छेद देऊन निर्माण केलेली एकात्मता या समाजात नव्हती. सर्व व्यक्तींना एकाच नैतिक व कायदेकानूच्या व्यवस्थेत बांधणाऱ्या अशा सर्ववाची प्रमाण संहिता ( मास्टर कोड्स ) व अशा संहितांची अंमलबजावणी व्यवहारात करवून घेणाऱ्या यंत्रणा असल्याखेरीज प्रा. सभरवाल यांच्या व्याख्येतला एकात्म समाज आकारास येऊ शकत नाही. एका अर्थी, हिंदुस्थानात अशा संहिता होत्या असे म्हणता येईल. उदाहरणार्थ, मनुस्मृती ही हिंदूंच्या साठी अशी सर्ववाची प्रमाण संहिता होती असे म्हणता येईल. पण, जातिजमातींना उतरंडीमध्ये कायम ठेवून त्यांना वेगळी, विषम वागणूक देऊन, त्यांना कायम पृथक ठेवून समाजाचा व्यवहार चालविण्याला प्रामाण्य देणारी ती सर्ववाची प्रमाण संहिता होती; म्हणजेच, विशाल एकात्म समाज अस्तित्वात येण्याला बाधक अशीच ती संहिता होती, असे प्रा. सभरवाल म्हणतील. तात्पर्य असे की, केवळ कोणत्या तरी सर्ववाची प्रमाण संहिता (मास्टर कोड्स) असून पुरेसे नाही; व्यक्ती म्हणून समाजातील सर्वांना समान व एकाच कुळीच्या लेखणाऱ्या त्या संहिता असल्या पाहिजेत.

हिंदुस्थानात अशी मास्टर कोड्स तर नव्हतीच; पण, जातजमातविशिष्ट अनेक संहिता होत्या. यांना उद्देशून प्रा. सभरवाल यांनी 'मल्टीपल कोड्स' हा शब्दप्रयोग वापरला आहे. या संहितांमुळे जातिजमातीं-मध्ये जे अंतर निर्माण होत असे, अंतराय निर्माण होत असे ते अंतर व अंतराय यांचा भेद करून सर्वांची एकत्र घुसळण घडवून आणणाऱ्या सामाजिक संस्था नव्हत्या. या अभावाला उद्देशून त्यांनी 'सोशल ब्लँक्स' असा शब्दप्रयोग केला आहे.

ज्या समाजातील घटकसमुदायांची परस्पर-संबंधात्मक रचना/बांधणी अशी असेल की, सीमोल्लंघन करून एका घटकामधून इतर घटकसमुदायां-मध्ये प्रवेश करून सभासदत्व मिळविता येत नसेल त्या समाजाला विशाल एकात्म समाजाचे (मेगासोसायटी) रूप प्राप्त होऊ शकत नाही, हे प्रतिपादन प्रा. सभरवालांच्या विवेचनात अध्याहृत आहे. आर्थिक-सामा-



अनुक्रमणिका

जिक-राजकीय समता ही त्यांच्या मेगासोसायटीची कसोटी नाही ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. तसेच समाजातले सर्वजण एकाच धर्माचे, वंशाचे, वगैरे असले पाहिजेत असेही निष्पन्न होत नाही. मात्र, मेगासोसायटी होण्याच्या दृष्टीने, एकतर धर्म, वंश या भेदरेषा अत्यंत गौण व तटस्थ तरी असल्या पाहिजेत ( जशी उंची, वजन, डोळयांचा, केसांचा रंग, इत्यादी भेदरेषा 'तटस्थ' असतात ), किंवा धर्मांतराच्या, वेटीव्यवहाराच्या मार्गाने सीमोल्लंघन शक्य असले पाहिजे. हिंदू समाजरचनेत व पारंपरिक व्यवहारात जातजमातींमधील अंतरे कमी न होतील याबद्दल आग्रह होता, संहिता जातजमातगणिक वैशिष्टयपूर्ण असाव्यात या अपेक्षेचे ( व क्वचित आग्रहाचे पण ) ते एक प्रयोजन होते. प्रा. सभरवाल यांच्या अर्थाचा विशाल एकात्म समाज निर्माण न व्हावा अशीच योजना होती असे म्हणता येईल.

रंगीबेरंगी मणी घेऊन मुली वेगवेगळया डिझाइनच्या माळा गुंफतात किंवा ठोकळे जुळवून वा तुकडे एकमेकांमध्ये अडकवून लहान मुले वेगवेगळया आकाराच्या रचना करतात. माळा बनवायला सूत्र व सूत्रकार लागतो किंवा इमला तयार करायला रचनाकार, वास्तुशिल्पी लागतो. तसे कोणी मिळाले नाही तर मणी, ठोकळे वा तुकडे इतस्ततः विखुरले जाण्याची शक्यता सर्वांत अधिक. सूत्र व सूत्रकार/रचनाकार **बाहेरूनच** हे काम करू शकतो. मण्यांचे वा ठोकळयांचे वा तुकडयांचे ते काम नाही. हिंदू समाजाची बांधणी अशी केलेली होती (व अद्यापिही आहे) की, ब्राह्मणांच्या सल्ल्याने क्षत्रियांनी हे काम करावे; इतरांनी त्यात दखल देण्याचे काम नाही. (याचा एक परिणाम असाही दिसतो की, जो राज्य करील तो क्षत्रिय व त्याला सल्लामसलत देईल तो ब्राह्मण अशी मान्यता मिळू शकत होती. मात्र बांधणी बदलायची नाही ही गोष्ट अध्याहृत होती.) आंतरिक सामर्थ्याने व प्रेरणेने राज्यसत्तेची निर्मिती करण्याची, तिचा विस्तार करण्याची, ती टिकवून धरण्याची क्षमता समाज बाळगीत नव्हता. प्रा. सभरवाल यांचे म्हणणे असे की, हिंदुस्थानचा आजवरचा इतिहास पाहिला तर याचा पुनःपुन्हा पडताळा मिळतो. येथे लहानमोठी राज्ये कमीअधिक काळ टिकली, प्रसंगी त्यांचा विस्तार युरोपमधील एकेका देशापेक्षा मोठाही होता, या दोन्ही गोष्टी खऱ्या. पण या राज्यसत्तांचे स्वरूप घराणेशाही असेच राहिले. लोक व समाज यांच्यात राज्यसत्तेला अधिष्ठान प्राप्त झाले नाही. कारण तसे ते होण्याच्या दृष्टीने आवश्यक ते घटक समाजाच्या बांधणीतून वगळलेलेच राहिले.

हिंदू धर्म, संस्कृती, परंपरा, समाज यांचे सातत्य, त्यांच्या विशाल उपखंडव्यापी परिसीमांचे सातत्य प्रा. सभरवालांना अमान्य नाही. त्यांचा रोख विशिष्ट आहे. येथे लोक व प्रदेश यांवर अधिष्ठित अशी राष्ट्रसत्ता निर्माण का झाली नाही, व आजही तिची निर्मिती इतकी अवघड का ठरावी, याचे ऐतिहासिक-समाजशास्त्रीय उत्तर ते शोधीत आहेत. या संदर्भात सर्वांत जास्त महत्त्व हिंदू समाजव्यवस्था व मानस यांना असल्याने त्यांची चिकित्सा ते प्रामुख्याने करीत आहेत.

५

युरोपच्या जडणघडणीशी तुलना करून ते तौलनिक चिकित्सा करतात. युरोपात आधुनिक राष्ट्रसत्ता सोळाव्या-सतराव्या शतकात निर्माण झाल्या. तेथेही विसाव्या शतकाच्या आरंभी बहुतेक सर्वत्र राजेशाह्याच अस्तित्वात होत्या. पण राजाचे घराणे हे एका राष्ट्रसत्तेचे प्रमुखपण करीत आहे; एकवेळ घराणे बदलले जाईल पण राष्ट्रसत्ता तीच अखंड, अभंग टिकून राहील, टिकवून धरली जाईल याची स्पष्टता होती. युरोपीय समाजाची बांधणी अशा कोणत्या तत्त्वांच्या आधारे व घटक-संस्थांच्या साहाय्याने केली गेली ज्यामुळे तेथे ही गोष्ट स्वाभाविकपणे घडून आली ? दोन महायुद्धांमध्ये जी राज्ये संपूर्णपणे पराभूत झाली तीही राष्ट्रसत्ता म्हणून मात्र नष्ट झाली नाहीत. किंबहुना, त्या समाजांची बांधणीच अशी होती की, जित राष्ट्रसत्तांना त्यांचे राष्ट्रसत्ता म्हणून पुनरुज्जीवन करावे लागले. याचे रहस्य काय ?

विशाल एकात्म समाज (मेगासोसायटी) आणि तिच्या आधारे आकारास येणारी केंद्रीय राज्यसत्ता या दोन्हींसाठी तीन गोष्टींची आवश्यकता असते असे प्रा. सभरवाल यांचे म्हणणे आहे. बुद्धिप्रामाण्याधिष्ठित ज्ञानसाधना व त्या ज्ञानाचे उपयोजन. संकल्पनांची टोकाला जाऊन तार्किक स्पष्टता करून घेणे, तसेच ज्याचा लौकिक व्यवहारात पडताळा मिळू शकतो व ज्या आधारे कृती करता येते असे बाह्य जगाचे ज्ञान

प्राप्त करून घेणे, या दोन्ही गोष्टी ज्ञानसाधनेत समाविष्ट आहेत. काही सामान्य संकल्पनांच्या व तत्त्वांच्या आधारे नागरिक व्यक्तींचे हक्क व कर्तव्ये, राज्यसत्तेचे अधिकार, जबाबदाऱ्या व मर्यादा यांची सुसंगत स्पष्टता करून तिच्या आधारे व्यक्ती व राज्यसत्ता यांच्यामधील संबंध नियमित करणारे कायदेकानू तयार करणे व त्यांची न्यायदानव्यवस्थेमार्फत अंमलबजावणी करणे ही दुसरी आवश्यक गोष्ट होय. सामान्य तत्त्वे, कायदेकानू व नियम यांच्या आधारे सुनिश्चित रीतींनी, पूर्वसंकेतांना अनुसरून समाजव्यवहाराचे व्यवस्थापन व नियमन करणारी शासनयंत्रणा / नोकरशाही ही तिसरी गोष्ट होय. या नोकरशाहीची पोच सर्वदूर असली पाहिजे. ती लहरीपणाने काम करीत नाही, अशी विश्वासार्हता तिने किमान प्रमाणात संपादित केली असली पाहिजे. या गोष्टी ओघानेच आल्या. प्रत्येक मुद्द्याचा टोकापर्यंत जाऊन तर्कसंगत विचार काटेकोरपणे करणे, म्हणजेच सर्व गोष्टींची तार्किक स्पष्टता करून घेणे हा वारसा युरोपला ग्रीक संस्कृतीकडून मिळाला असे प्रा. सभरवाल म्हणतात. प्रजासत्ताक रोमचा विस्तार जसा साम्राज्यसत्तेत झाला तसा विस्तीर्ण साम्राज्याचे शासन कोणत्या तत्त्वांनुसार, कायद्यांनुसार चालावे, त्याच्या शासनाची व्यवस्था कशी लावावी या प्रश्नांना रोमला सामोरे जावे लागले. साम्राज्यसत्ता बनण्याअगोदर रोम हे प्रजासत्ताक राज्य असल्याने त्यांना राज्यसत्तेचा तात्त्विक आधार, तिची उद्दिष्टे व कार्यपद्धती, नागरिकांची कर्तव्ये व हक्क, प्रशासनाच्या रीती, इत्यादी गोष्टींची स्पष्टता करून घेऊन मांडणी करणे गरजेचे बनले. या कामी ग्रीकांकडून मिळालेल्या बुद्धिप्रामाण्यनिष्ठ तार्किक विचारपद्धतीचा वारसा फार उपयोगी पडला. साम्राज्यभर पसरलेल्या प्रशासनयंत्रणेकडून कायद्यानुसार राज्यकारभार करवून घेण्याचे आव्हान रोमन राज्यकर्त्यांपुढे होते. ज्याला प्रा. सभरवाल 'मास्टर कोड्स' (सर्ववाची प्रमाण संहिता) म्हणतात त्यांचा विकास रोमन साम्राज्यांतर्गत झाला. विस्तीर्ण भूप्रदेशावर पसरलेल्या समाजाला एकात्म व्यवस्थेत बांधण्यासाठी आवश्यक भौतिक साधनांची पायाभूत संरचना ( टेक्नोसोशल फ्रेम ) विकसित करण्यात रोमन साम्राज्याने प्रतिभा प्रकट केली. युरोपला मिळालेला हा दुसरा मोठा वारसा होय. रोमन साम्राज्याच्या अस्तानंतर काही काळ युरोपची घडी पार विस्कटल्यासारखी झाली. परत जेव्हा राज्यसत्ता काही आकार घेऊ लागल्या तेव्हा रोमच्या वारशाशी जोडून घेऊन 'पवित्र रोमन साम्राज्या'चे संघटन केले गेले. या वेळी युरोपला 'मेगासोसायटी' बनविण्यात महत्त्वपूर्ण भूमिका बजावली ती रोमन कॅथॉलिक चर्च या धर्मपीठाने. युरोपभरही एके काळी लहानमोठे टोळीसमाजच अस्तित्वात होते. रोमन साम्राज्याने या टोळ्यांना आपल्या कवेत घेतले तरी त्यांचे टोळीपण घालविण्याचे कार्य चर्चनेच खऱ्या अर्थाने पार पाडले. रोमन साम्राज्याचा अंतही अशाच इतर काही टोळीसमाजांच्या धाडींमधूनच झाला होता. या वेगवेगळ्या टोळ्या युरोपच्या भूमीवर स्थिरावल्या. या टोळ्यांनाही त्या अवस्थेतून चर्चनेच बाहेर काढले.

ख्रिश्चन समाजाच्या पोप या सर्वोच्च धर्मगुरूंच्या प्रभुत्वाखालील चर्च हे प्रथमपासूनच सुसंघटित धर्मपीठ होते. धार्मिक बाबींमध्ये चर्चची मक्तेदारी होती. पूजनीय प्रतीके, मूल्यनिष्ठा, श्रद्धा, आचारविचार, कर्मकांड, प्रत्येक गोष्ट चर्च प्रमाणित करीत असे. पाखंड निर्घृणपणे मोडून काढीत असे. ऐहिक क्षेत्रातील सत्तेशी तिची प्रथमपासून सांगड होती. सर्व युरोपभर धर्माचे कार्य करणाऱ्या मंडळींचे जाळे अंथरलेले होते. हे जाळे म्हणजे एक श्रेणीबद्ध संघटन होते. एका केंद्रातून सारी सूत्रे हलविली जात. चर्चच्या ताब्यात युरोपभर मोठमोठ्या जमिनी व इतर मालमत्ता होती. ऐहिक आर्थिक जीवनावरही चर्चचे प्रभुत्व होते. लोकांच्या राजकीय निष्ठाही चर्चनियंत्रित असल्याकारणाने राजेलोकांनाही चर्चशी जुळवून घ्यावे लागत होते. पोप वा पोपच्या अधिकाऱ्यांकडून अभिषेक करून घेऊन सत्ताग्रहण करावे लागे.

विभिन्न टोळीसमाजांना रोमन कॅथॉलिक चर्चने एका मुशीत घातले. त्यांचा पृथक्‌पणा, त्यांच्यातल्या तटबंदी मोडून काढल्या. एकच एक सामाजिक नीतिप्रणाली प्रसृत केली. सर्व ख्रिश्चन ही एकाच प्रभूची लेकरे असा भ्रातृबंध प्रस्थापित केला. धार्मिक शिकवण सर्वत्र एकच. रीतिरिवाज, कर्मकांड, आर्थिक व्यवहार, राजकीय रचना व व्यवहार सगळीकडे एकसारखे व प्रमाणित. यामुळे ख्रिश्चन माणूस, तो कोणत्याही स्थानिक राज्यात राहात असो, महत्त्वाच्या अर्थाने युरोपव्यापी एकात्म समाजाचा नागरिक बनला.

अनुक्रमणिका

रोमन कॅथॉलिक चर्च ही युरोपव्यापी शिक्षणसंस्था, युरोपव्यापी आर्थिक उत्पादन करणारी व आर्थिक उलाढाली करणारी कंपनी, युरोपभरच्या लहानमोठ्या राज्यांचे प्रशासन चालविण्यासाठी प्रशिक्षित, शिक्षित माणसे पुरविणारी एजन्सी अशी तिची विविध रूपे होती. इतकेच काय पण शेती व उद्योग या क्षेत्रांत शिस्तबद्ध तंत्रवैज्ञानिक संशोधन व उपयोजन करणारी तीच त्या काळातली प्रमुख संस्था होती. ज्ञानसाधना करणे व तिच्या आधारे धर्मशास्त्राची तपशीलवार मांडणी करणे हे तर तिचे कार्य होतेच.

साऱ्या युरोपसाठी, 'ख्रिश्चन करूनि राखावे सकळ जन' अशी प्रतिज्ञा घेऊन अनेक शतके 'ओसाड व उजाड' युरोपात चर्चचे संघटन निष्ठेने, कुशलतेने, प्रसंगी कावेबाजपणे काम करीत राहिले. लोकांना एकसारखे व एकात्म करण्यासाठी व एकात्म अवस्थेत बांधून ठेवण्यासाठी अनेकविध रीतींचा, मार्गांचा, साधनांचा, तंत्रांचा, क्लृप्त्यांचा चर्चने वापर केला.

तीन संस्थांचा प्रा. सभरवाल विशेषत्वाने उल्लेख करतात. न्यायदान, दैनंदिन प्रशासन आणि विद्यापीठे. ज्याला आपण सरंजामशाही राजकीय-आर्थिक व्यवस्था म्हणतो, ज्या व्यवस्थेत राजा, त्याचे उमराव, व्यावसायिक श्रेष्ठी-महाजन, शेतकरीकुळे, मजूर, कारागीर या सर्वांची परस्परांच्या संदर्भातील स्थाने, कामे, कर्तव्ये, जबाबदाऱ्या यांची निश्चिती केलेली होती, त्या व्यवस्थेचाही प्रा. सभरवाल यांना उल्लेख करता आला असता. यातली महत्त्वाची गोष्ट अशी की टोळीसमाजाची पूर्वकालीन पृथक अस्मिता ज्या संस्कृतीवर व समाजबांधणीवर अवलंबून होती ती पद्धतशीरपणे तुडवून मातीचा मऊसूत गोळा बनविणे व मग त्याला एक नवा घाट देणे या दोन्ही प्रक्रिया रोमन कॅथॉलिक चर्चने जाणीवपूर्वक अनेक शतके चालविल्या. चर्चने भक्कमपणे घातलेल्या पायावर १३/१४ व्या शतकानंतर अनियंत्रित राजेशाहीच्या भूमिकेतून आधुनिक राष्ट्रसत्तांचे इमले रचले गेले.

हिंदुस्थानातही, या उपखंडाच्या चतुःसीमांमध्ये असलेल्या समाजाला एका समान धार्मिक-सांस्कृतिक व्यूहामध्ये एकत्र बांधण्याची प्रक्रिया प्राचीन काळापासून चालविली गेली. त्या प्रक्रियेची बैठक अगदी वेगळी राहिली, आणि स्वाभाविकपणे, अटळपणे एका वेगळ्या घाटाचा समाज आकारास आला. प्रा. सभरवालांना हे म्हणणे अमान्य होणार नाही. पाश्चात्त्य धाटणीच्या आधुनिक राष्ट्रसत्तांना जन्म देण्यास, त्यांची यशस्वीपणे धारणा करण्यास स्वभावतःच अशक्य अशी या समाजाची बांधणी राहिली असे ते म्हणतील.

हिंदू समाजाची बांधणी अगदी वेगळ्या धाटणीची आहे ही गोष्ट आपण वर पाहिली आहे. रोमन कॅथॉलिक चर्चशी तुलना करता येईल असे एकमुखी देशव्यापी धर्मपीठ येथे कोणत्याच कालखंडात अस्तित्वात नव्हते. येथे पुरोहितवर्ग होता आणि राज्यसत्तांना समर्थन प्राप्त करून देण्याचे, सल्लामसलत देण्याचे कार्य हा वर्ग करीत असे, असेही आढळते. पण युरोपात एका प्रदीर्घ कालखंडामध्ये तेथील विभिन्न 'क्षत्रिय' राज्यकर्त्यांवर चर्चचा ज्या प्रकारचा अंकुश होता, चर्चकडे ज्या प्रकारचे ज्येष्ठत्व व अधिकार होता तसा येथील पुरोहितवर्गाकडे नव्हता. कारण त्यांचे एकमुखी संघटन नव्हते आणि रोमन कॅथॉलिक चर्चप्रमाणे त्यांचा एकछत्री अंमलदेखील नव्हता. युरोपमधील कोणत्याही राज्यसत्तेपेक्षा अधिक मोठ्या प्रदेशावर चर्चची सत्ता चालत होती. तिच्यापाशी अनेक पटींनी जास्त संख्येने तिच्या आदेशांची अंमलबजावणी होत आहे हे पाहणारे अधिकारी/कर्मचारी होते व त्यांची व्यवस्थित बांधणी केलेली यंत्रणा होती. येथे साधू, संन्यासी, बैरागी, भिक्षू इत्यादिकांची संख्या कमी नसेल. पण त्यांची अनेक संप्रदायांमध्ये विभागणी झालेली होती. काही प्रमाणात जातजमातवारही विभागणी होती. हा फरक निर्णायक ठरणारा होता.

६

त्यांच्या मुख्य प्रतिपादनाच्या पुष्टचर्थ हिंदुस्थानातल्या मध्ययुगीन तीन प्रकारच्या राज्यसत्तांची त्यांनी चिकित्सा केली आहे. कोणत्याही समाजाला आकार देणाऱ्या ज्या महत्त्वाच्या, निर्णायक महत्त्वाच्या रचना/यंत्रणा असतात, व्यवहार असतात त्यांमध्ये शासनसंस्था या यंत्रणेचा/रचनेचा आवर्जून समावेश करावयास हवा असे त्यांचे म्हणणे आहे. राजकीय स्वरूपाचा अधिकार व दंडसत्ता (ऑथॉरिटी अँड पॉवर) यांची व्यवस्था (यात वाटप व राबवणूक, दोन्ही आल्या) समाजात कशी लावलेली असते, शासनसंस्थेची बैठक कोणती असते, तिची उद्दिष्टे कोणती असतात, या साऱ्यांमुळे समाजाच्या व्यवहारांना दीर्घकालीन वळण प्राप्त होत असते. समाजाचे भवितव्य ठरत असते. शासनसंस्था ही

दुय्यम वा गौण नसून ती स्वतंत्रपणे महत्त्व असलेली मध्यवर्ती संस्था आहे, ही प्रा. सभरवाल यांची भूमिका. आज जर भारताला आधुनिक राष्ट्रसत्तेची भक्कम उभारणी करण्यात अपयश येत असेल तर त्याच्या मुळाशी शासनसंस्थेच्या क्षेत्रातला आपला विशिष्ट वारसाही आहे, असा बोध त्यातून निघतो.

मुसलमानी सत्ता दिल्लीवर प्रस्थापित होण्या-अगोदरच्या काळात सर्व उत्तर भारतात एके काळी राजपूत घराण्यांची राज्ये होती. मुसलमानी वर्चस्वाच्या कालखंडात राजस्थानात राजपूत राज्येच, सार्वभौम नसली तरी, मांडलिक स्वरूपात राहिली. ' राजपूत ' हा शब्दच आपणास सांगतो की, राजपुत्रांची जमात ती राजपूतजमात. अर्थ असा की, लहानमोठ्या राज्यांवर आरूढ असणाऱ्या राजघराण्यांमध्ये बेटीव्यवहारा-द्वारे आप्तसंबंध प्रस्थापित करण्यामधून, अशा आप्तसंबंधापासून जे राजघराण्यांमधील नाहीत त्यांना वर्तुळाच्या बाहेर ठेवून, राजपूत ही क्षत्रिय जमात घडविली गेली. घराण्यांमधील आप्तसंबंध हा राजपूत राज्यसत्ता व राज्यपद्धती यांचा कणा होता. मुलगी देणारा आणि मुलगी करून घेणारा यांपैकी जो मुलगी करून घेतो तो श्रेष्ठ, वरचढ अशी मान्यता होती. काही आप्तसंबंध हे बरोबरीचे तर बरेचसे श्रेणीबद्ध असत. ही रचना अनेकस्तरीय उतरंडीसारखी असे हे उघड आहे.

अगदी तळच्या स्तरावरील, म्हणजे पंचक्रोशी पातळीवरचा ठाकूर हा राजा असण्याऐवजी मोठा जमीनदारच वास्तविक असे. ज्याच्या नावाने राज्य ओळखले जाई तो किती पायऱ्या वरचा असेल हे त्या त्या वेळच्या प्रादेशिक स्तरावरील परिस्थितीवर अवलंबून राही. आपापल्या प्रभुत्वक्षेत्राचा विस्तार करण्यासाठी राजपूत घराण्यांमध्ये सतत स्पर्धा व कलह चालत असे. त्या त्या कालखंडात जे चारदोन कर्तृत्ववान पुरुष निपजत, त्यांच्या मर्दुमकीनुसार त्यांच्या राज्यांचे आकारमान ठरे. राज्य मोठे होई म्हणजे मांडलिक नाते पत्करणारी घराणी, घराण्यांच्या शाखा यांच्यात भर पडे. यातील अनेकांचे परस्परांशी नवे-जुने आप्तसंबंध असतच.

कोणत्याही राज्याची स्थिरता व सातत्य त्या विवक्षित राजघराण्यात एकापाठोपाठ कर्तृत्ववान पुरुष निपजण्यावर किंवा बृहत्तर राज्याने / साम्राज्याने (जसे पुढच्या काळातील मुघल साम्राज्य, मराठा राज्य वा इंग्रजी राज्य ) त्या राज्याला स्वतःच्या बळाचा व मान्यतेचा टेकू देण्यावर अवलंबून राही. आप्तसंबंधदेखील बव्हंशी मतलबी राजकारणी संबंध असल्याने निष्ठा ना राज्यावर असे, ना राजघराण्यावर. प्रत्येकालाच आकांक्षा असे आणि जो तो संधीची वाट पाहत राही. अंतिमतः शस्त्रसामर्थ्य व युद्धनेतृत्व यांवर गोष्टी ठरत. राज्य संपादणे, राखणे तसेच ते कोलमडणे या साऱ्या व्यक्तिगत बाबी होत्या. कोणत्याही अधिक व्यापक व दीर्घकालीन संकल्पनेचे, तत्त्वाचे, भावनेचे, अस्मितेचे अधिष्ठान कधी प्राप्त झालेच नाही. त्यामुळे एके काळी राजपूत घराणी साऱ्या उत्तर भारतात राजघराणी म्हणून पसरली तरी व्यक्ती/घराणेनिरपेक्ष अशी विशाल राजपूत राज्यसत्ताही प्रस्थापित झाली नाही.

इस्लाम धर्माचा स्वीकार केलेल्या मध्य आशियातील विभिन्न टोळीसमाजांपैकी कोणा ना कोणा घराण्याच्या हाती दिल्लीचे तख्त अनेक शतके राहिले. मुघलांचे एकच घराणे तीनसाडेतीनशे वर्षे राज्य करीत होते. मुघल साम्राज्याचा विस्तारही अकबराच्या वेळेपासून खूप मोठा झाला. या कालखंडात राज्याची बांधणी वेगळ्या पायावर झाली का ?

मुघलांआधीची जी वेगवेगळी ' सुलतान ' घराणी राज्य करून गेली, त्यांची सारी मदार शस्त्रबळाच्या जोरावर प्रजेला धाकात ठेवून अंकित करण्यावर होती. ज्या सैन्याच्या जोरावर लहानमोठी स्थानिक राज्ये मोडून स्वतःचे प्रभुत्व या सुलतानांनी प्रस्थापित केले, त्या सैन्याची निष्ठा सुलतान बनलेल्या व्यक्तीला, त्या व्यक्तीचे कर्तृत्व व नेतृत्व टिकून राहीपर्यंतच असे. नवनव्या प्रदेशांतून लूट भरपूर आणण्याच्या संदर्भातले प्रामुख्याने हे नेतृत्व व कर्तृत्व असे. जिंकून घेतलेल्या प्रदेशात राज्याची घडी बसविण्याइतकी स्थिरता कोणत्याच घराण्याला प्राप्त झाली नाही.

मुघलांच्या बाबतीत, निदान अकबरापासून पुढे तरी असे म्हणता येत नाही. असे दिसते की, शस्त्रबळाचा धाक ही बैठक राज्याला स्थिरता प्राप्त करून देण्याच्या दृष्टीने पुरेशी नाही, तसेच हिंदुस्थानात जर मुघलांची सत्ता स्थिर करावयाची असेल तर येथील हिंदूंनाही राज्यात सन्मानाचे स्थान असले पाहिजे, मुघल राज्य ही इस्लामी धर्मसत्ता बनता कामा नये,

या गोष्टींचे भान अकबराला होते. नवनवे प्रदेश जिंकून प्रचंड लूट आणून तिच्या जोरावर सरदारांची व सैन्याची निष्ठा टिकवून धरणे, लूट हा राज्यकर्त्यांच्या समृद्धीचा, वैभवाचा पाया मानणे श्रेयस्कर नाही, याचीही जाण अकबराला दिसते. त्याने प्रशासनाची घडी बसविली, केंद्रीय सत्तेचे नियंत्रण साम्राज्यभर प्रस्थापित केले, हिंदू व मुसलमान दोघांनाही समान लेखणारे ‘कायद्याचे राज्य’ निर्माण करण्याच्या दिशेने पावले टाकली. पण या सर्व प्रयत्नांच्या गाभ्याशी जाणीवपूर्वक, विधिवत सम्राट अकबर या व्यक्तित्वाला बांधून घेतलेली प्रत्येक वरिष्ठ अंमलदाराची स्वामिनिष्ठा होती. अकबराच्या हयातीत त्याची ही नीती यशस्वी झाली. इतकेच नाही तर, पुढच्याही काळात सम्राटाच्या हाती, त्याच्या मर्जीवर वरिष्ठ अंमलदारांचे भवितव्य फार मोठ्या प्रमाणात अवलंबून राहिले.

दोनतीन कारणांमुळे मुघल साम्राज्यही अस्थिरतेच्या भोवऱ्यातून बाहेर पडू शकले नाही. लढयामध्ये विजयश्री खेचून आणणाऱ्या सरदारांचे स्थान वरचढ राहिले. हे सरदार साम्राज्याचे सेवक असले तरी त्यांनी बाळगलेल्या फौजफाटयाची निष्ठा त्या त्या सरदारांनाच राही. या सरदारांची आपापसातील चुरस, हेवेदावे, गटबाजी यांचा कौशल्याने उपयोग करून सम्राट राज्यावरील आपली पकड घट्ट ठेवू शकत असे ही गोष्ट खरी. पण सम्राटाच्या ठायी काही कारणाने (वृद्धत्व, आजारपण, इ.) दुबळेपण निर्माण झाले तर प्रमुख सरदारांच्या सुंदोपसुंदीने राज्य अस्थिर बनायला वेळ लागत नसे. सरदार साम्राज्याच्या सीमांवर स्वतंत्रपणे राज्य स्थापन करू पाहतील वा आपलीच मनमानी चालवितील हा धोका कायमचाच असे. सम्राटाच्या मृत्यूनंतर वारशाने राज्य कोणाकडे जावे याचा काही सर्वमान्य नियम नव्हता. सगळीच मुले स्वतःला तेवढीच वारसदार मानीत व आपापल्या बाजूने सरदारांची/सैन्याची ताकद उभी करीत. परिणामी, वृद्धापकाळ वा मृत्यू यामुळे सत्तांतराचा प्रसंग निर्माण होई तेव्हा काही काळ राज्यात निर्नायकी, यादवी माजे. तिसरी गोष्ट, जागिऱ्यांची. वरिष्ठ अंमलदार हे साम्राज्याचे पगारी नोकर असावेत असा प्रयत्न अकबराच्या काळात झाला. पण नंतर परत जागिरी देण्याची प्रथा पडली. त्या वंशपरंपराही दिल्या जाऊ लागल्या. इकडची जागिर काढून दुसरीकडे दिली जाई वा सम्राटाची गैरमर्जी झाल्यास साराच सरंजाम सरकारजमा होई. या गोष्टी खऱ्या असल्या तरी, जागिऱ्यांच्या पद्धतीमुळे, राज्याला एकनिष्ठ असलेली साम्राज्यव्यापी श्रेणीबद्ध नोकरशाहीयंत्रणा आकारास येऊ शकली नाही.

मुघल साम्राज्य हे कुल, घराणे, आप्तसंबंधांचे गोतावळे या आधारावर उभारलेले नव्हते. पण व्यक्तिप्रधान राजवट असेच तिचे स्वरूप राहिले. असे असले तरी, अकबराने लावून दिलेल्या व्यवस्थेमुळे असेल, त्याची पुण्याई म्हणून, व नंतर गादीवर बसलेल्या शहाजहाँ व औरंगजेब यांच्या कर्तबगार व्यक्तिमत्त्वामुळेही, मुघल साम्राज्याला देशभर राजेरजवाड्यांमध्ये आणि जनमानसातही प्रामाण्य व वैधपण (लेजिटिमसी) प्राप्त झाले ही गोष्ट खरी. औरंगजेबानंतर दिल्लीचे तख्त अगदी दुबळे बनलेले असूनही, त्या तख्ताच्या व सम्राटाच्या नावेच परस्परांवर कुरघोडी करण्याचे राजकारण प्रमुख सरदार खेळत राहिले. १८५७ सालीही बादशहाच्या नावेच द्वाही फिरवली गेली. पण, तरीही, मुघल साम्राज्य ही हिंदुस्थानातली आधुनिक अर्थाने राष्ट्रसत्ता बनू शकली नाही. कारण ती एक तर सम्राटकेंद्री राहिली व दुसरे म्हणजे शस्त्रबळाच्या जोरावरच अंतिमतः, सत्तेसाठी कुरघोडी करणे चालू राहिले. ज्याला दिल्ली स्वतःच्या ताब्यात घेणे जमले नाही तो दिल्लीपासून दूर जाऊन आपला स्वतंत्र सवतासुभा निर्माण करीत गेला. परदेशांमधून येणारे मुसलमान सरदार, देशी बनलेले पण आपणास या देशाचे न मानणारे मुसलमान सरदार, आणि येथील हिंदू सरदार, राजेरजवाडे यांच्यातील अंतर अकबरानंतरच्या काळात वाढतच गेले. या सगळ्यांच्या वैयक्तिक आकांक्षांची व पृथक् मानसिकतेची शिंगे मोडून त्यांना एका विशाल एकछत्री व्यवस्थेत नीटपणे शिस्तीत बांधणाऱ्या सामाजिक संस्था, राजकीय यंत्रणा वा धार्मिक-सांस्कृतिक-बौद्धिक परंपरा अस्तित्वात नव्हत्या.

दक्षिण भारतातल्या शासनसंस्थेच्या काहीशा वेगळ्या वैशिष्टयपूर्ण इतिहासाचेही धावते परीक्षण प्रा. सभरवाल यांनी केले आहे. पल्लव, चोल व विजयनगर ही तीन राज्ये त्यांनी निवडली आहेत. या तीन राजवटी मिळून एकंदर काळ सुमारे चौदाशे-पंधराशे वर्षांचा आहे. पण यांचा एकत्रित विचार करता येतो; कारण शासनसंस्थेची जडणघडण, तिचे स्वरूप, व

अनुक्रमणिका

त्याविषयीच्या परंपरा यांच्यात एक विलक्षण सातत्य आढळते.

निकटच्या नात्यातल्या कुटुंबांमध्येच आपापसात लग्नसंबंध करीत राहणे हे दक्षिण भारतातील समाजांचे एक समाजशास्त्रीय वैशिष्टच आहे. तुलनेत, उत्तरेकडे बेटीव्यवहाराद्वारे लांबपर्यंतच्या व आधीपासून संबंधी नसलेल्या कुटुंबांमध्ये संबंध जोडण्याची प्रथा आहे. लग्न-संबंध हा राजकारणी दोस्ताना म्हणूनपण पाहिला, वापरला जाई. आप्तसंबंधाचा दूरपर्यंत फैलावलेल्या राजकीय गोतावळयाच्या सांगाडयाभोवती राज्याची उभारणी दक्षिणेत आढळत नाही.

राज्याचा विस्तार दक्षिणेतही स्वाऱ्यांच्या द्वारा नव्या प्रदेशावर स्वामित्व प्रस्थापित करण्याच्या पद्धती-नेच झालेला आढळतो. पण नव्या मुलखात जाऊन योद्धे प्रभुत्व स्थापित करून तेथे स्थायिक झाले की, पूर्वी ज्या केंद्रीय राज्यातून ते आलेले असत त्या राज्याची एक स्थानिक प्रतिकृती ते निर्माण करीत. अशी राज्ये बव्हंशी स्वयंपूर्ण असत. म्हणजे, राज्याचा खर्च चालविण्यासाठी जो करभार, खंडणी वसूल करायची ती त्या त्या स्थानिक क्षेत्रातून गोळा केलेली पुरेशी ठरत असे. मूळ केंद्रसत्ताही या अर्थाने स्वयंपूर्ण होत्या असे दिसते. मग पल्लवांचे, चोलांचे वा विजयनगरचे राज्य/साम्राज्य म्हणावयाचे ते कोणत्या अर्थाने, व त्या त्या राज्यांना एका सूत्रात बांधणाऱ्या संस्था/यंत्रणा कोणत्या होत्या, असा प्रश्न पडतो.

दक्षिणेतील राज्ये या धर्मसत्ता नव्हत्या तरीपण राजा आणि राज्य यांना स्थैर्य व बळकटी प्राप्त करून देण्यासाठी धर्माचा वापर पद्धतशीरपणे करून घेतला जात होता असे आढळते. मध्यवर्ती केंद्रसत्तेला मांडलिक राज्यांची, वा राज्याच्या वेगवेगळया विभागांतील अंमल-दारांची निष्ठा बांधून घेण्यासाठी देऊळ, व देवळात चालणारी पूजाअर्चा, सण, उत्सव यांचा उपयोग करून घेतला जाई. आपले प्रभुत्व व वैभव प्रकट करण्याचा मार्ग म्हणजे भव्यदिव्य देऊळ बांधणे, त्या देवस्थानला जमिनी तोडून देणे, वर्षासने नेमून देणे, मोठया पूजा, उत्सव चालू करणे आणि त्या देवळाचा अधिकार प्रस्थापित करणे हा राहिल्याचे दिसते. म्हणजे, एक-प्रकारे, राजाचे व राज्याचे सामर्थ्य प्रकट करण्याचाच हा मार्ग होता. मग त्या राज्याचे मांडलिक राजे वा राज्यातील प्रमुख नागरिक, महाजन, अंमलदारदेखील राजाचे अनुकरण करून आपापल्या भागात/गावात देवळे बांधीत. थोडक्यात, एका दैवताची प्रतिष्ठा वाढ-वून, त्या दैवताच्या द्वारा राज्यास प्रजाजनांच्या मनात रुजविले जात होते. राजा आणि दैवत यांच्यात एकरूपता रुजविली जात होती. देवस्थानच्या क्षेत्रात दैवताचा जसा सार्वभौम अधिकार चालतो तसा राज्यात राजाचा चालतो; राजा दैवताच्या पाठीशी आपल्या वैभवानिशी व सामर्थ्यानिशी जसा उभा आहे तसे दैवतही राजाच्या पाठीशी उभे आहे, असे सूचन त्यात असे.

विजयनगरच्या साम्राज्यात केंद्रसत्तेची पकड राज्याच्या दूरदूरच्या क्षेत्रांवर टिकवून धरण्यासाठी जागोजाग भक्कम तटबंदीचे किल्ले उभारले गेले व ब्राह्मण किल्लेदारांच्या हाती त्यांचा ताबा असे. पण विजयनगरच्या राज्यातदेखील राज्याला स्थिरता प्राप्त करून देण्यासाठी आणि निष्ठा बांधून घेण्यासाठी देऊळ या संस्थेचा महत्त्वपूर्ण उपयोग करून घेतला जाताना दिसतो.

पण विजयनगर साम्राज्यातही राज्यभर पसरलेली शासनयंत्रणा नव्हती. कायदेकानू व नियम यांच्या आधारे आदेश जारी होत व त्यांचे पालन केले जाई असे आढळत नाही. श्रेणीबद्ध नोकरशाही नव्हती. त्या त्या पेचप्रसंगी तेवढयापुरता मार्ग काढून देण्यावर, समस्या सोडविण्यावर भर असे. राज्यभर पसरलेली देवळे व त्यांचे पुजारी/कारभारी वा व्यवस्था पाहणारी पंचमंडळी यांच्यामधूनही रोमन कॅथॉलिक चर्चसारखे, राज्याला भक्कम पाया व बैठक प्राप्त करून देणारे धर्मपीठ निर्माण झाले नाही. दक्षिणेत 'ब्रह्मदेय' ग्रामांची एक दीर्घ परंपरा आहे या गावांमध्ये ब्राह्मण मंडळी अध्ययन-अध्यापनाचे काम करीत असत. पण युरोपमध्ये जे कार्य चर्चच्या आधिपत्याखालील मठांनी पार पाडले तसे या गावांनी पार पाडल्याचे आढळत नाही.

यामुळे दक्षिणेकडील राज्यांमध्येही त्याच प्रकारचा ठिसूळपणा आपणास आढळतो जसा तो राजपूत राज्यां-मध्ये वा मुघल साम्राज्याच्या ठिकाणी आढळत होता. राजा समर्थ असेल तोवर राज्याचे स्थैर्य टिकून राही, राज्याचा विस्तारही होई. पुरुषार्थ प्रकट करणारी मोठी कामेपण होत. योगायोगाने राज्याला एकामागोमाग एक असे कर्तबगार वारस मिळाले तर घराण्याची सत्ता






चार-सहा पिढ्यापण टिकून राही. पण सामान्यतः उदय–उत्कर्ष–ऱ्हास अस्त या फेऱ्यात राज्ये सापडलेली आढळतात.

७

राजा आणि प्रजा यांचा संबंध तेवढा खरा; अमूक एक प्रदेश अमूक लोकांचा, आणि त्या प्रदेशातले राज्य त्या लोकांचे, फार तर लोकांसाठी प्रतिनिधी म्हणून राजाने राज्य चालवावे, अशी धारणा युरोपमध्येही दीर्घकाळपर्यंत अस्तित्वात नव्हती. विशेषतः रोमन साम्राज्याच्या अस्तापासून ते पंधराव्या-सोळाव्या शतकापर्यंत प्रा. सभरवाल म्हणतात ते खरे आहे. ग्रीस व रोम यांचा वारसा रोमन कॅथॉलिक चर्चमुळे जिवंत राहिला, आणि चर्च व राजे यांच्यातील सततच्या तणावपूर्ण पण सहकार्याच्या संबंधांमुळे व्यवहारातही तो वारसा लागू करण्याचे प्रसंग येत राहिले. त्यांनी न्यायदानव्यवस्थेच्या संदर्भात सांगितलेली एक गोष्टही महत्त्वाची आहे. मध्ययुगात युरोपमध्ये राजे व त्यांचे उमराव यांच्यामध्ये सत्तासंघर्ष दीर्घकाळ चालला. शाही न्यायालये (जी राज्यभर फिरती पण असत) अधिक निःपक्षपाती न्याय देतात, ती आपल्या बाजूने न्याय देतात अशी लोकांची भावना दृढ होत गेली व त्यामुळे केंद्रीय राज्यसत्तेला लोकांची निष्ठा बांधून घेता आली. यावरून एक बोध असा निघतो की, उमरावांच्या विरोधात, समाजविभागांची निष्ठा परस्पर आपणास कशी मिळविता येईल याचा विचार करून काही संस्थांची, प्रघातांची, रीतिरिवाजांची व अनुरूप तात्त्विक मांडणीची निर्मिती करण्याचा दूरदर्शीपणा युरोपमध्ये राजांनी दाखविला. केंद्रीभूत अनियंत्रित राज्यसत्ता निर्माण करण्याच्या त्यांच्या प्रयत्नांत त्यांना ग्रीस व रोम यांच्या वारशाची, रोमन कॅथॉलिक चर्च या पीठाची आणि समाजातील अन्य काही शक्तिप्रवाहांची (तत्कालीन शहरे व त्यांच्यातील व्यापारी/उद्योजक वर्ग, राजाचा पक्ष घेऊन सत्ता, प्रतिष्ठा व मालमत्ता संपादण्याची आकांक्षा बाळगणारे उमराव व शिलेदार, इ.) मदत झाली. उमरावांना वेसण घालून आपली पकड पक्की करण्यासाठीच्या प्रयत्नांमधून केंद्रीय नोकरशाही आकारास आली. तसेच वेगवेगळ्या मार्गांनी केंद्रीय सत्तेचे उत्पन्नाचे स्वतंत्र स्रोत वाढविण्याच्या प्रयत्नांत समाजाला एकछत्री अमलात बांधणारी वित्तीय धोरणे व वसूलीयंत्रणा अस्तित्वात आल्या. प्रा. सभरवाल यांनी या ऐतिहासिक प्रक्रियेवर भर दिला असता तर त्यांचे विवेचन अधिक परिपूर्ण झाले असते.

हिंदुस्थानातील समाजाची जडणघडण व बांधणी वेगळी आहे, वेगळ्या तत्त्वांनुसार झालेली आहे, आणि येथील शासनसंस्थेचा इतिहासही वेगळा राहिला आहे, हे प्रा. सभरवाल यांचे प्रतिपादन मान्य करायलाच हवे. आपली आजची लोकशाही राज्यव्यवस्था आपण पाश्चात्यांना अनुसरून स्वीकारली. आर्थिक-औद्योगिक क्षेत्रांतही आपण राष्ट्रव्यापीच नव्हे तर जागतिक चौकटीशी बांधून घेणारी तंत्रविद्या व व्यवस्था यांचा स्वीकार केला आहे. इंग्रजांनी त्यांच्या हेतूंसाठी म्हणून जे वळण घालून दिले तेच आपण इष्ट व आवश्यक ठरवून पुढे चालू ठेवले आहे. आपली ऐतिहासिक-समाजशास्त्रीय जडणघडण, परंपरा, मानसिक ठेवण आणि व्यवहार भिन्न असल्याने खोलवर व दूरवर परिणाम करणारा विसंवाद उत्पन्न झाला आहे, ही त्यांची मुख्य मीमांसाही मान्य व्हायला हरकत नाही.

८

आजच्या पेचप्रसंगात आपण कसे सापडलो त्याची पार्श्वभूमी म्हणून अलीकडचा इतिहास थोडा पहायला हरकत नाही. (प्रा. सभरवाल यांनी तो विषद करायला हवा होता.) अव्वल इंग्रजीतील राज्यकर्त्यांची (मेकॉले हा ज्यांचे मूर्तिमंत प्रतीक म्हणता येईल) प्रतिज्ञा अशी होती की, या हिंदी समाजाची आमूलाग्र पुनर्रचना करून येथील लोकांना आपल्या बरहुकूम बनवून सोडायचे. लिबरल-युटिलिटेरियन विचारप्रणाली आत्मसात केलेला, ख्रिस्ती धर्म स्वीकारलेला हिंदी समाज निर्माण झाला म्हणजे, कृतकृत्य होऊन, अशा सुधारलेल्या, आपलीच प्रतिकृती असलेल्या हिंदी बांधवांच्या हाती राज्याची सूत्रे सोपवून आपण निरोप घेऊ, अशी या मंडळींची धारणा होती. पण १८५७ च्या उठावानंतर त्यांनी राज्याच्या स्थैर्याच्या दृष्टीने आपल्या आकांक्षेला मुरड घातली. ब्रिटिश साम्राज्याच्या हितसंबंधांच्या दृष्टीने जरूर तेथे व तेवढा हस्तक्षेप करण्याचा त्यांचा निर्णय ठाम राहिला. पण बाकीच्या बाबतीत आमूलाग्र, सर्वांगीण सुधारणेविषयी, पुढाकार तर नाहीच, पण बरीचशी उदासीन भूमिका त्यांनी घेतली. पण त्यांनी सुरू केलेल्या नव्या शिक्षणाने प्रभावित झालेल्या सुशिक्षितांच्या पिढीपैकी एका गटाला सर्वांगीण सुधारणा हवी होती. नव्या धर्तीची आर्थिक-औद्योगिक व राज-

अनुक्रमणिका

कीय व्यवस्था हिंदुस्थानात मूर्त करावयाची असेल तर इथला समाज, संस्कृती, धर्म या साऱ्यांची जुनी बांधणी बदलून घ्यायला हवी; किंबहुना, अशा दूरगामी सामाजिक सुधारणेच्या अभावी राजकीय सुधारणा पोकळ ठरेल, असे या गटातल्या मंडळींचे म्हणणे होते. ' आधी राजकीय की सामाजिक ( सुधारणा ) ?' हा वाद महाराष्ट्रात तर चांगलाच गाजलेला आहे. सामाजिक सुधारणा झालेली नाही या सबबीवर राजकीय हक्कांची/सुधारणांची गाडी अडून राहण्याचे कारण नाही; राजकीय हक्क मिळत जातील तसा उलट सामाजिक सुधारणेला जोर चढेल, अशा भूमिकेतून राजकीय चळवळ करणाऱ्या पक्षाचे पारडे जड झाले ही गोष्ट आपल्या परिचयाची आहे.

गौरवशाली प्राचीन हिंदू इतिहास-परंपरेचा अभिमान जागृत करणाऱ्या जहाल पक्षालाही जुन्या राजेशाही/सरंजामशाहीचे, गावगाड्याचे वा जातपाताधिष्ठित समाजव्यवस्थेचे पुनरुज्जीवन करावयाचे होते असे मानणे गैर होईल. नव्या धर्तीची राज्यव्यवस्था, समाजव्यवस्था स्वीकारावयाची म्हणजे विचाराचे व वागणुकीचे वळण किती व कोठे कोठे बदलायला हवे आहे याची त्यांना पुरेपूर कल्पना मात्र नव्हती. सामाजिक सुधारणांचा पक्ष घेणाऱ्यांनाही पुरेपूर कल्पना होती अशातला भाग नाही.

१९२० नंतर महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालील काँग्रेसने सामाजिक सुधारणांचे महत्त्व मान्य केले. पण या बाबतीतल्या गांधींच्या कल्पना व मार्ग यांच्यावर फार थोड्यांची मनापासून निष्ठा होती. आधुनिकीकरणाच्या आर्थिक-औद्योगिक व राजकीय प्रक्रियेद्वाराच समाजाची व संस्कृतीची बैठक आमूलाग्र बदलेल, व ती बदलली की लोकमानस व व्यवहारही नव्या व्यवस्थेनुरूप बदलतील अशी धारणा प्रचलित झाली. समाजवादी, साम्यवादी विचारांनी प्रभावित पिढीला तर सर्व गोष्टींचे मूळ आर्थिक असते हे एकशेएक टक्के पटलेले होते.

याचाच स्वाभाविक व अटळ परिणाम आपणास स्वातंत्र्योत्तर काळात झालेला आढळतो. आधुनिक लिबरल पण त्याच वेळी समाजवादी विचाराचा थोडा आशय असलेली एक नमुनेदार राज्यघटना स्वीकृत केली व नियोजनबद्ध आर्थिक विकासाचा कार्यक्रम नेटाने राबविला की काम फत्ते होईल असे सर्वांनीच मानले. खोलवर पाळेमुळे गेलेल्या सामाजिक संस्था, परंपरा, रीती, मन:पिंड, इत्यादी गोष्टी दीर्घकालीन हुकूमशाही राजवटीच्या साहाय्याने पण निपटून काढता येत नाहीत; वैचारिक प्रबोधनाची, मने संस्कारित करण्याची, नव्या संस्था, रीती, परंपरा निर्माण करण्याची व धीराने, दक्षतेने, चोखपणे रुजविण्याची गरज असतेच, याचे भान राहिले नाही. तेवढी प्रौढ समजच नेत्यांच्या व एकंदरीतच सुशिक्षित वर्गात नव्हती असे म्हणणे अधिक योग्य होईल. ( दुर्दैवाने, आजही ही उमज पुरेशा प्रमाणात पडली आहे असे आढळत नाही.)

लोकशाही राज्यघटना ज्यांनी बनविली, स्वीकारली त्यांनी ती गंभीरपणे बनविली, स्वीकारली यात शंका नाही. पण सर्वसामान्य जनतेच्या दृष्टीने विचार करता, त्यांना न कळलेला तो एक उपचार होता असे म्हटले पाहिजे. सर्वसामान्य जनता असे आपण म्हणतो तेव्हा खेड्यापाड्यांतील अडाणी जनता तर आपण त्यात समाविष्ट करूच. पण, प्रा. सभरवाल असे म्हणतील की काँग्रेसच्या चळवळीत सहभागी झालेल्या बहुसंख्य शिक्षित पुढारी व अनुयायी मंडळींच्या बाबतीतही तो वास्तविक एक उपचारच होता, आणि ही गोष्ट आपणास सखेद पण कबूल करावी लागेल. काँग्रेसच्या बाहेर ब्रिटिशांशी हातमिळवणी करून स्थानिक व वरिष्ठ पातळ्यांवर राजकारण करणाऱ्या सरंजामशाही वा सनातनी वळणाच्या इतरांची तर गोष्ट स्पष्टच आहे.

ज्यांना आपण लोकशाही राजकीय संस्था म्हणतो त्या आपल्या वळणाने व्यवहार करून कशा काबीज करता येतात, 'वाकविता' येतात, वापरून घेता येतात, वा त्यांना कशी बगल देता येते व धाब्यावर बसविता येते हे हिंदी लोकांना अपरिचित नव्हते. ब्रिटिश येथे असतानाच लोकल बोर्डे, म्युनिसिपालिट्या, विधिमंडळांतील राजकारण या सर्व ठिकाणी याचे वस्तुपाठ वर्षानुवर्षे मिळालेलेच होते. ब्रिटिशांनीही स्वत:च्या राजकीय स्वार्थापोटी या सर्व गोष्टी केल्या होत्या. स्वातंत्र्याची चळवळ खच्ची करण्यासाठी अनेक प्रसंगी त्यांनी त्यांना उत्तेजनही दिले होते.

स्वातंत्र्योत्तर काळात आरंभीची काही वर्षे वातावरण वेगळे होते. आपल्या जुन्या परिचित कोषांमधून, तटबंद्यांआडून बाहेर यायला लोकांचे मानस अनुकूल होते. समाजाची, माणसांच्या मनाची बैठक आणि

अनुक्रमणिका

आपण निवडलेल्या राज्यव्यवस्थेसाठी आवश्यक असलेली बैठक यांत मोठे अंतर आहे याची जाण होती. पण योग्य नेतृत्वाने काहीशा कठोरपणे स्वतःस शिस्त लावून लोकांना वळण दिले नाही तर लोकशाहीची चौकटच आपले मनसुबे उधळून टाकण्यासाठी वापरता येईल; प्रौढ मताधिकाराचा कावेबाज व कुशल उपयोग त्यासाठी फार चांगल्या प्रकारे करता येईल, ही समज नसावी असे मात्र दिसते. प्रौढ मताधिकार व निवडणुका, लोकप्रतिनिधींमार्फत चालणारे राज्य यांच्याविषयी अकारण अतिभावड्या समजुती रुजल्या होत्या हे याचे कारण असू शकेल. अकारण म्हणण्याचे कारण असे की, मतदान, निवडणुका, लोकप्रतिनिधी या साऱ्यांचा वस्तुनिष्ठ अनुभव कॉंग्रेसच्या ज्येष्ठ नेतृत्वाला पुरेसा होता. की, अदूरदृष्टी राजकीय स्वार्थापोटी बेरकीपणे कॉंग्रेसी नेत्यांनी जाणूनबुजून आरंभालाच ही सारी प्रक्रिया नासवली ? याचे उत्तर शोधावे लागेल. पण नेतृत्वाने स्वतःस कठोर शिस्त लावून लोकांना वळण लावण्याचे काम केले नाही. 'मिठानेच खारटपणा सोडल्यावर पाणी खारट बनवायचे कसे ?' असा प्रकार झाला.

आधुनिक लिबरल/लोकशाही समाजवादी राष्ट्रसत्तेला आधारभूत असलेल्या सर्व वैशिष्टयपूर्ण मध्यवर्ती संस्था आज भ्रष्ट झालेल्या आहेत. दीर्घकालीन इतिहासाने व समाजाच्या जडणघडणीमुळे, संस्कृतीमुळे बनलेले मानस घेऊन, अंगवळणी पडलेल्या रीतींनी, तंत्रांनी लोक आपापल्या जातजमातनिष्ठ संहितांना व संस्कारांना अनुसरून आपल्यापुरत्या वाटा शोधत आहेत, स्वार्थ साधीत आहेत. प्रा. सभरवाल यांनी मांडलेला एक मुद्दा येथे महत्त्वाचा आहे. आपली राज्यघटना, कायदेकानू, नियम, आधुनिक राष्ट्रसत्तेला अनुरूप अशी दिली जाणारी शिकवण यांनुसार व्यक्तीने वागावे असे म्हणणे कधीच पुरेसे ठरत नाही. जगण्याच्या त्या त्या क्षणी वा टप्प्यावर त्याचा जो व्यावहारिक प्रश्न असतो, वा गरज असते, त्याची सोडवणूक वा तिची पूर्तता, प्राप्त परिस्थितीत आणि त्याला त्याच्या परिस्थितीत उपलब्ध असलेल्या मार्गांनी, साधनांनी करावी लागते. विशेषतः तो जर एक सामान्य माणूस असला तर. समजा त्याला नोकरीची, घराची, शाळेत प्रवेशाची, वा अशीच कसली गरज आहे. त्याची संस्कृती व त्याचा समाज यांनी त्याच्यावर केलेले संस्कार त्याला 'सांगतात' की जातवाल्याकडे जा, ओळख काढ, वशिला लाव, काम होत असेल तर थोडी चिरीमिरी दे. आता, समजा, त्याने यांपैकी कोणतीही गोष्ट करू नये, आधुनिक लिबरल लोकशाही राज्यातल्या नागरिकाला साजेसे वर्तन करावे, अशी आपली अपेक्षा आहे. ही गोष्ट कधी घडून येईल ? कायदा व नियम यांना अनुसरण्याने, आपली या प्रकारची रास्त कामे होतात असे त्याच्या अवतीभवती, त्याच्याच परिस्थितीत असलेली अनेक माणसे जेव्हा त्याला त्यांच्या अनुभवाचा हवाला देऊन सांगतील तेव्हा हे घडून येईल. किंवा या नव्या राजवटीत नागरिक म्हणून या साऱ्या गरजांची पूर्तता होणे हा त्याचा हक्क आहे, व झगडल्यास, सामुदायिकपणे झगडल्यास तो त्याचा हक्क बजावू शकतो असे सांगणारे, आश्वासन देणारे, असे घडते याचा हवाला देणारे, त्याला त्याच्या जगात कोणीकोणी भेटत राहिले तर हे कळून येईल. पण यांपैकी कोणतीच परिस्थिती नसेल तर ? तर तो स्वाभाविकपणे, अनिवार्यपणे पारंपरिक संस्कारांच्या वळणाने वागेल. आज मोठ्या प्रमाणावर असेच घडते आहे.

आपला राजकीय इतिहास आणि त्याने घडलेले लोकमानस यांचा ठळक पडछाळा आपणास दोन बाबतीत येत आहे. राज्य घराण्यात वारशाने चालत येते हा अनुभव लोकमानसात खोल रुजलेला आहे. तसे घडणे योग्यच आहे अशीही समजूत आहे. राज्यकर्ता आपले राज्य वारशाने आपल्या मुलाबाळांना देईल ही अपेक्षा आहे. यामुळे पं. नेहरूंच्या नंतर इंदिरा गांधी व त्यांच्या पश्चात राजीव गांधी यांना त्यांच्या पक्षातल्या मंडळींनी स्वाभाविकपणे निवडले. राजकारणात नसलेल्या आपल्या मुलाला इंदिरा गांधींनी, संजय गांधी यांच्या अपघाती मृत्यूनंतर, वारसदार बनविण्याच्या इराद्याने खासदार बनविले, कॉंग्रेस पक्षाचे वरिष्ठ नेतृत्व हाती दिले याचा चटकन स्वीकार झाला. पण ध्यानात घेण्याची गोष्ट या पुढची आहे. नवऱ्याच्या जागेवर, त्याच्या निधनानंतर त्याच्या बायकोला तिकीट देण्याचे प्रकार आपल्याकडे सहजपणे घडतात. आपली खासदारकी आपल्या मुलाकडे चालत यावी अशी पुढाऱ्याची इच्छा असते, व तसे घडून येते. सत्तेवर आल्यावर त्याचा लाभ आपल्या निकटवर्ती नातेवाईकांना, आप्तेष्टांना

अनुक्रमणिका

वेगवेगळ्या प्रकारे करून देणे हे कर्तव्य मानले जाते. नातेवाईकांचीही तशी अपेक्षा असते. घराणेशाहीचाच हा परिचित प्रकार आहे. समाजात त्याविरूद्ध तीव्र प्रतिक्रिया उमटत नाही हे ध्यानात घेणे महत्त्वाचे आहे.

घराणेशाहीचे राज्य असते तेथे आढळणारी, त्याच नाण्याची दुसरी बाजू असलेली गोष्टही आपणास आढळते. घराण्यातला गादीवर बसलेला पुरुष (वा कर्तबगार स्त्री) यांच्यात काही कारणाने दुबळेपण आले आहे असे लक्षात येताच, कालपर्यंत एकनिष्ठ असल्याचे भासविणारी माणसे आपापली स्वतंत्र सुभेदारी प्रस्थापित करू पाहतात. निष्ठा पाहता पाहता बदलतात. आज अनेक प्रांतांमध्ये स्थानिक पातळीवर राजकीय पुढाऱ्यांचा व्यवहार हा जुन्या वतनदार वा मांडलिक राजांसारखाच असतो. आणि अशा स्थानिक 'राजे' मंडळींचा फौजफाटा आपल्या पाठीशी गोळा करून मुख्यमंत्रीपदासाठी बंडाचे झेंडे फडकावले जाताना आपण पाहतो. नव्या बाटलीत दारू जुनीच आढळावी तसेच हे आहे.

आजच्या स्थितीला कोण दोषी आहेत हे प्रा. सभरवाल सांगत नाहीत. तसेच, या परिस्थितीतून बाहेर पडण्याचा मार्गही ते दाखवीत नाहीत. आपण राष्ट्र व समाज म्हणून कोणत्या विचित्र चक्रव्यूहात अडकलेले आहोत व ते भेदून बाहेर पडण्याच्या दृष्टीने विचार करता कोणत्या प्रकारच्या एकात्मतेची उणीव आपल्यात का आहे याचे दिग्दर्शन ते करतात. त्यांनी उपस्थित केलेले मुद्दे महत्त्वाचे आहेत. त्यांची साधक-बाधक चर्चा व्हायला हवी.










# अतिसंवाहक द्रव्ये : अभूतपूर्व व अनाकलनीय प्रगती

अशोक नारायण ठाकूर

दिनांक १९ मार्च १९८७, वेळ सायंकाळी साडे-पाच वाजताची आणि स्थळ न्यूयॉर्क हिल्टनचे सटन बॉलरूम सभागृह. तेव्हा लोक जमा होण्यास नुकतीच सुरुवात झाली होती. आणि पावणेसात वाजता जेव्हा सभागृहाची दारे उघडली तेव्हा तोबा गर्दीमुळे परिस्थिती बिकट झाली होती. या मानवी लोंढयाच्या पुढील फळीत होते भौतिकीविद रँडी सायमन. सभागृहात दाखल होण्यासाठी त्यांना स्वतःच्या पायांना कष्ट देण्याची गरजच पडली नाही; मागील भौतिकीविदांच्या रेटयाने त्यांना अलगद आत आणून सोडले; तर विल्यम लिट्ल या दुसऱ्या भौतिकीविदांनी आपल्या विषयातील तज्ज्ञांची अशी झुंबड व रेटारेटी पूर्वी कधी पाहिली नव्हती वा अनुभवली नव्हती.

अशा जल्लोषाच्या वातावरणात अमेरिकन फिजिकल सोसायटी या संस्थेची वार्षिक बैठक सुरू झाली. ही बैठक इतकी खळबळजनक, एवढी आनंददायक आणि इतकी भावनोत्कट होती की 'सायन्स' या प्रतिष्ठित ज्ञानपत्रिकेने तिचे वर्णन 'एक ऐतिहासिक घटना' असे केले. या बैठकीला वैज्ञानिक मंडळींच्या गंभीर परिषदेऐवजी जणू एखाद्या लोकप्रिय रॉक संगीताच्या जलशाची अवकळा आली होती. पंधराशे आसनांची व्यवस्था असलेल्या या सभागृहात तीन हजार शास्त्रज्ञांनी गर्दी केली होती. एवढेच नाही तर आत घुसू न शकलेले शास्त्रज्ञ सभागृहाबाहेर व दूरचित्रवाणीच्या पडद्यावर हा सोहळा पाहण्यासाठी दाटीवाटीने ताटकळत उभे राहिले होते. रात्रीचे तीन वाजून गेले, तरी बैठकीतील उत्साह सुरुवातीसारखाच होता. एकापाठोपाठ एकेक शास्त्रज्ञ श्रोत्यांसमोर येई, पाच मिनिटांत आपले म्हणणे मांडी व शक्य झाल्यास प्रयोग दाखवी. तेथील सर्वजणच हे सर्व लक्ष देऊन ऐकत व पाहात. आणि बहुतेक वक्ते प्रेक्षकांकडून उत्साहाने मिळालेली प्रोत्साहनपर पसंतीची पावती घेऊन जात. आपण जे काही पाहिले व ऐकले त्यावर उत्साहाने चर्चा करण्यात दंग झालेले काहीजण तर पहाटेपर्यंत तेथे रेंगाळले होते.

नवीन प्रकारची अतिसंवाहक मृत्तिका द्रव्ये हा या खळबळ उडवून देणाऱ्या बैठकीसमोरील विषय होता. उच्च तापमानाला अतिसंवाहकता (सुपरकंडक्टिव्हिटी) हा गुणधर्म दर्शविणाऱ्या या द्रव्यांचा हा शोध विलक्षण सनसनाटी निर्माण करणारा असाच होता. कारण या शोधामुळे मानवी जीवनात आमूलाग्र परिवर्तन घडून येण्याची शक्यता निर्माण झाली आहे. यामुळे विश्वास बसणार नाही एवढ्या प्रमाणात ऊर्जेची बचत होऊ शकेल; विजेवर चालणारी मोटारगाड्यांसारखी वाहने किंवा चुंबकीय गिरद्यांवरून धावू शकणारी आगगाडी ही नित्याची बाब होईल; तर छोटे पण शक्तिशाली संगणक व कणवेगवर्धक, तसेच अणुभंजनाऐवजी अणुसंयोगावर चालणाऱ्या अधिक सुरक्षित अणुभट्ट्या प्रत्यक्षात येऊ शकतील शिवाय आपल्या ध्यानीमनी न येऊ शकणारे असे असंख्य फायदे व उपयोग या शोधामुळे शक्य होतील.

२८ मार्च १९८७ रोजी नागोया येथे जपानच्या भौतिकीय संस्थेची षण्मासिक बैठक झाली. दुपारच्या अतिसंवाहकतेविषयीच्या सत्रात शासन, उद्योगसमूह व विद्यापीठे यांतून आलेले ५० पेक्षा अधिक तज्ज्ञ बोलले. प्रत्येकाला दहाच मिनिटे देण्यात आली होती. या बैठकीलाही तुडुंब गर्दी झाली होती आणि मर्यादित वेळ देऊनही बैठकीचे कामकाज मध्यरात्रीपर्यंत चालले होते. या बैठकीच्या आधी चार महिने टोकियो विद्यापीठातील संशोधकांनी ३० के संक्रमण तापमानाचे अतिसंवाहक द्रव्य शोधले होते. या बैठकीत या द्रव्याची संरचना व त्यामागील सिद्धांत यांवर काहीजण बोलले. आणि बहुतेकजणांनी अतिसंवाहक द्रव्यांच्या व्यावहारिक उपयोगांवर अधिक भर दिला. एनईसी कार्पोरेशनमधील संशोधकांनी ९० के तापमानाला जोसेफसन परिणाम दर्शविला; तर निप्पॉन टेलिफोन








व टेलिग्राफ येथील संशोधकांनी लँथॅनम, बेरियम, तांबे ऑक्साइडात ९० के तापमानाला अतिसंवाहकता दाखविली. हे महत्त्वाचे संयुग ठरेल. कारण लँथनम हा धातू इट्रियमपेक्षा पुष्कळच स्वस्त आहे. फुजिकुरा डेनसेन या विद्युत केबल निर्मात्याने नवीन अतिसंवाहक द्रव्याच्या ओबडधोबड वलयाचे चित्र बैठकीत दाखविले.

अतिसंबाहकतेवरील 'वर्कशॉप ऑन नॉव्हेल मेकॅनिझम ऑफ सुपरकंडक्टर्स' या कार्यशाळेचे आयोजन करणाऱ्या संघटकांनाही वरील प्रकारच्या उत्साहाचा अनुभव आला. त्यांनी या कार्यशाळेची योजना एक वर्षापूर्वी आखली व तेव्हा त्यांना हिला जेमतेम चाळीसजण येतील असे वाटले होते; पण प्रत्यक्षात रशिया, इस्राइल, इंग्लंड, दक्षिण कोरिया येथूनही तज्ज्ञ आले व त्या सर्वांची एकूण संख्या चारशेच्यावर गेली.

बर्कली (कॅलिफोर्निया) येथे १९८७ सालच्या जून महिन्यात भरलेली परिषद तर विज्ञानकथेवरील एखाद्या जुन्या चित्रपटासारखी भासली. या परिषदेचाही प्रमुख विषय होता ही नवीन अतिसंवाहक द्रव्ये हाच. तेथे दाखविण्यात आलेली अतिसंवाहक द्रव्ये खडूसारखी, काळी, झिलई न देता येणारी व अभूतपूर्व उच्च तापमानाला अतिसंवाहकतेचा गुणधर्म असलेली अशी होती. या द्रव्यांमुळे जागतिक उद्योगधंद्यांत क्रांती घडवून आणता येऊ शकेल हे लक्षात घेऊन शेकडो संशोधकांनी त्यांचे महिनोन्महिने निरीक्षण केले होते आणि आपले अनुभव, निष्कर्ष एकमेकांना सांगण्यासाठी ते तेथे जमले होते. कार्ल अलेक्स म्यूलर (आयबीएम झुरिच संशोधन प्रयोगशाळा, स्वित्झर्लंड) यांनी या द्रव्यांची पटले (फिती) तर आर्. जे. काव्हा व बर्ट्रॅम बॅटॅलॉग (बेल प्रयोगशाळा) यांनी या द्रव्यांची वेटोळी परिषदेत दाखविली. यामुळे या द्रव्यांच्या व्यावहारिक-तांत्रिक वापराच्या दृष्टीने पूर्वतयारी झाली असे म्हणता येईल. कारण वेटोळे हा चुंबकासाठीचा सर्वसाधारण आकार असून परिनलिका म्हणजे दंडाकार चुंबकाचे कार्य करणारी युक्ती (सोलेनॉईड) बनविण्यातील हा पहिला टप्पा आहे. या द्रव्याचे पटल बनविल्याचा दावा माल्कम बिझ्ली (स्टॅनफोर्ड विद्यापीठ) यांनीही केला. तथापि या परिषदेमुळे या अतिसंवाहक द्रव्यांविषयीचे गूढ उकलले जाण्याऐवजी अधिक गडद झाले. कारण या विलक्षण द्रव्यांचे कार्य कसे होत असते, हे प्रतिपादणारा एकही परिपूर्ण सिद्धांत परिषदेपुढे आला नाही. म्हणजे आपण समजतो त्याहून काहीतरी जादा त्यांच्यात आहे, हेच खरे.

झाग्रेबपासून ते हुस्टनपर्यंतच्या वैज्ञानिकांनी ही तऱ्हेवाईक द्रव्ये आश्चर्यकारक गोष्टी करताना पाहिली होती. द्रवरूप नायट्रोजनच्या तापमानाला म्हणजे ७७ के (किंवा – १९६° सेल्सियसला वा – ३२० फॅरनहीटला) अतिसंवाहक असणाऱ्या द्रव्यांच्या कल्पनेची १९८६ साली टर उडविण्यात येत असे; तर कोठी (नेहमीच्या) तापमानाला अतिसंवाहकता हे निखळ दिवास्वप्न वाटत असे; परंतु या परिषदेमध्ये अभूतपूर्व अशा उच्च तापमानाला अतिसंवाहकता दर्शविणारी द्रव्ये असल्याचे उघड झाल्याने एकूण सगळे चित्रच पालटले. याविषयी रॉबर्ट डाइक्स म्हणतात, "जाहीर करण्यात आलेले दावे हे म्हणजे पाण्याच्या बाहेर दिसणारी हिमनगाची केवळ शिखरे आहेत. त्यांच्याजवळ याहून पुष्कळच जास्त काही तरी आहे!" या परिषदेतही चर्चा पहाटेपर्यंत चालली होती. अशा प्रकारे कोठी तापमानाला अतिसंवाहकता दर्शविणाऱ्या द्रव्यांचा शोध घेण्याची तीव्र स्पर्धा सुरू झाली असून जगभर यांविषयीचे संशोधन जोमाने सुरू आहे.

## पार्श्वभूमी

तांबे, चांदी इत्यादी धातू विजेचे सुसंवाहक आहेत. म्हणजे त्यांच्यामधून वीजप्रवाह सुलभ रीतीने जातो. म्हणजेच विजेच्या प्रवाहाला या धातूंकडून कमी प्रमाणात विरोध होतो. या धातूंच्या अणूंमधील संवाहक (किंवा सर्वांत बाहेरचे) इलेक्ट्रॉन अणूला सैलसरपणे बद्ध झालेले असतात. त्यामुळे विद्युतदाब लावला असता या इलेक्ट्रॉनांचा प्रवाह वा वीजप्रवाह सुरू होतो. या इलेक्ट्रॉनांच्या एकमेकांशी टकरी होतात व त्यांतून उष्णता निर्माण होऊन तिच्या रूपात वीज वाया जाते. अशी उष्णता ही द्रव्याच्या विद्युतरोधाचे माप असते.

उलट रबर, काच यांसारख्या विद्युतनिरोधक द्रव्यांचा विद्युतरोध अतिशय जास्त असतो. कारण त्यांच्या अणूंतील संवाहक इलेक्ट्रॉन अणूंना घट्टपणे बद्ध झालेले असतात. परिणामी ते सहजपणे सैल न झाल्याने वीजप्रवाह चालू होणे अवघड होते. याशिवाय आणखी एक प्रकारची द्रव्ये आहेत. सिलिकॉन, जर्मेनियम ही त्यांची उदाहरणे असून अशा द्रव्यांचा







अनुक्रमणिका

विद्युतरोध सुसंवाहक व निरोधक या द्रव्यांच्या विद्युत-रोधांच्या दरम्यानचा असतो. आणि म्हणून त्यांना अर्धसंवाहक (सेमीकंडक्टर) असे म्हणतात.

काही धातू निरपेक्ष शून्य या तापमानाच्या जवळ-पास इतके थंड केले असता त्यांचा विद्युतरोध नाहीसा म्हणजे शून्य होतो. म्हणून अशा द्रव्यांना अतिसंवाहक म्हणतात. (निरपेक्ष शून्य हे आपल्याला कल्पना करता येईल असे सर्वांत थंड तापमान असून त्या तापमानाला उष्णतेचा लवलेशही नसतो. कारण तेव्हा रेणूंची हाल-चाल पूर्णतया थांबलेली असते. हे तापमान ० के असे दर्शवितात आणि ते– ४५९°·६९ फॅरनहीट किंवा– २७३°·१६ सेल्शियस एवढे असते.) अतिसंवाहक द्रव्याच्या अणूमधील इलेक्ट्रॉनांच्या जोड्या तयार (बद्ध) होऊन एकमेकींबरोबर शिस्तीत पुढे जातात; त्यामुळे त्यांच्यात टकरी होत नाहीत. त्यामुळे त्या पुढे जाताना उष्णता निर्माण होत नाही. म्हणजे विजेची हानी न होता प्रवाह चालू राहतो, असे मानले जाते. अशा तऱ्हेने जसजसे या द्रव्याचे तापमान या थंड ताप-मानाच्या मर्यादेकडे नेण्यात येते, तसतसा त्याचा विद्युत-रोध अचानकपणे नाहीसा होत जाऊन द्रव्य अति-संवाहक बनते. ज्या तापमानाला द्रव्य अतिसंवाहक बनते, त्या तापमानाला त्या द्रव्याचे संक्रमण तापमान म्हणतात व ते तापमान Tc या चिन्हाने दर्शवितात. शुद्ध धातूपेक्षा त्याच्या मिश्रधातूचे संक्रमण तापमान सामान्यतः जास्त असते. उदाहरणार्थ, शुद्ध कथिल व निओबियम धातूंचे संक्रमण तापमान अनुक्रमे ३·७ व ९·०९ के तर निओबियम व कथिल यांच्या मिश्रधातूचे ($Nb_3Sn$) १८·०५ के एवढे आहे. काही बाबतींत अतिसंवाहकांमुळे अतिप्रचंड विद्युतक्षेत्रे निर्माण होऊ शकतात. अशा प्रकारे तत्त्वतः तरी अतिसंवाहक द्रव्याच्या तारेच्या वेटोळ्यातून विजेचा प्रवाह त्यात घट न होता अनिश्चित काळपर्यंत चालू राहतो. काही अतिसंवा-हकांच्या संदर्भात काढण्यात आलेला असा कालावधी विश्वाच्या वयाहूनही जास्त येतो.

अतिसंवाहकतेचा शोध हाइके कामर्लिंग-ऑनेस (लायडेन विद्यापीठ, नेदर्लंड्स) यांनी १९११ साली लावला. त्यांना पाऱ्यामध्ये ४·२ के (–४५२° फॅरनहीट) तापमानाला अतिसंवाहकता आढळली, या तापमानाला हीलियम या वायूचे द्रवात रूपांतर होते. अति-संवाहकता या गुणधर्माचे लाभ मोठ्या प्रमाणावर होऊ शकतील हे वैज्ञानिकांनी केव्हाच ओळखले होते. या आविष्काराचा व्यवहारात अधिक सहजपणे उपयोग करून घेता यावा म्हणून निरपेक्ष शून्यापेक्षा पुष्कळच वरच्या तापमानाला तो घडवून आणण्याचे प्रयत्न शास्त्रज्ञ करीत आहेत. अशा प्रकारे निरनिराळी अति-संवाहक द्रव्ये शोधण्यात आली. कथिल, शिसे, जस्त व कॅडमियम हे शुद्ध धातू तसेच लँथनम-इंडियम व निओबियम-कथिल यांचे मिश्रधातू यांचे संक्रमण ताप-मान अनुक्रमे ३·७, ७·१९, ०·८७, ०·५६, १०·४ व १८·०५ के असल्याचे आढळले. काही अर्धसंवाहक ऑक्साइडे व कार्बनी संयुगे पुरेशा कमी तापमानाला अतिसंवाहक होतात असेही आढळले; मात्र तांबे, चांदी व सोने हे सुसंवाहक धातू ५० के तापमानापर्यंत तसेच रहातात.

अतिसंवाहक द्रव्यांचा व्यवहारात उपयोग करून घेण्यामध्ये एक मोठा अडथळा आहे; तो म्हणजे द्रव्य अतिसंवाहक होण्यासाठी लागणारे अतिशीत तापमान मिळविणे व ते टिकविणे, हा होय. आणि हे काम अतिशय खर्चाचे व अवघडही आहे. त्यामुळेच आपल्या आवाक्यात असलेल्या तापमानाला अतिसंवाहक होणारी द्रव्ये शोधून काढणे हे शास्त्रज्ञांचे एक स्वप्न होते आणि ते प्रत्यक्षात आणण्याची त्यांची धडपड तेव्हापासूनच चाललेली आहे. तथापि १९८३ सालापर्यंत यात विशेष प्रगती झाली नाही. या काळात संक्रमण तापमान अतिशय सावकाशपणे वाढत गेले. उदाहरणार्थ, १९२० साली ५ के, १९४१ साली १५ के, १९६० साली २० के व १९७३ साली २३·२ के (जॉन गव्हालर). याच वेगाने प्रगती होत राहिली असती, तर ९४ के एवढे संक्रमण तापमान मिळविण्यासाठी २१९० साल उजाडावे लागले असते. मात्र १९८६ सालानंतर या क्षेत्रामधील प्रगती इतकी झपाट्याने झाली की, १९८७ सालाच्या मध्यास अतिसंवाहकता ही कोठी ताप-मानाच्या (सुमारे ३०० के) उंबरठ्यावर येऊन ठेप-ल्याचे दावे करण्यात आले. उदाहरणार्थ, सप्टेंबर १९८६ ३० के, जानेवारी १९८७ ३६ के, फेब्रुवारी १९८७ ९८ के, एप्रिल १९८७ २४० के (जुएई-टेंग चेन; वेन राज्य विद्यापीठ, डेट्रॉइट) तर जून १९८७ ३०० के (ए. व्ही. नारळीकरांचा गट, नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी, नवी दिल्ली). यांपैकी शेवटच्या दोन दाव्यांची अजून खातरजमा व्हायची आहे.

विज्ञानात क्रांतिकारक किंवा सनसनाटी निर्माण करणारे शोध क्वचितच लागतात. ह्यूस्टन (टेक्सस), अलाबामा (हंट्व्हिल) येथील संशोधन तसेच वरील दोन दावे खरे ठरले, तर अशा एका शोधाची नोंद विज्ञानाच्या इतिहासात होईल. १९५०–६० या दशकातील ट्रँझिस्टरच्या शोधाइतकाच (काहींच्या मते यापेक्षा जास्त) हा १९८०–९० या दशकातील अत्यंत महत्त्वाचा शोध ठरेल. आणि यामुळे संशोधकांना अनेक नवीन क्षेत्रे खुली होतील. विज्ञानाच्या भाषेत अलीकडचा काळ याचा अर्थ गेली काही थोडी वर्षे असा करण्यात येतो; अतिसंवाहकतेविषयीच्या शोधाचा वेग पाहता अलीकडचा काळ याचा अर्थ गेला दिवस असाही होऊ शकेल. खळबळ उडवून देणाऱ्या अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या संशोधनाचा हा झपाटा पाहून या क्षेत्रातीलच एका तज्ज्ञाची पुढील प्रतिक्रिया बोलकी आहे : "यामुळे तर माझी दातखीळच बसण्याची वेळ आली आहे." तर सीमान इश्चेंको हे एर्लांगर विद्यापीठातील प्राध्यापक या द्रव्यांच्या औद्योगिक उपयुक्ततेची संभाव्यता पाहून चक्रावून गेले आहेत. या संशोधनात जगभरच्या शास्त्रज्ञांचे इतके गट गुंतले आहेत की, उद्या कोणत्या गटाने कोणती गोष्ट सर्वप्रथम केली याविषयी दीर्घकाळ वादविवाद होत राहील, अशी परिस्थिती निर्माण झालेली आहे.

या शोध-मालिकेमध्ये बऱ्याच उच्च तापमानाला अतिसंवाहक बनणारी अनेक नवीन द्रव्ये आढळली आहेत. ही तापमाने जरी घरगुती शीतकपाटातील तापमानापेक्षा बरीच कमी असली, तरी ती मिळविणे अधिक सोपे काम आहे. या शोधांमुळे एका वर्षापूर्वी (१९८६ साली) ज्या गोष्टी अशक्य वाटत होत्या, त्या आता आपल्या आवाक्यात आल्यासारख्या दिसतात. कारण न्यूयॉर्क येथील बैठकीनंतर असा एखादा आठवडा गेला नाही की, ज्यामध्ये नवीन व तेही अधिक वरच्या तापमानाला अतिसंवाहक असणाऱ्या द्रव्याची नोंद झाली नाही. एके काळी जो आविष्कार केवळ सुविकसित अशा साधनसामग्रीच्याच साहाय्याने ओळखता येणे शक्य झाले असते, तो परिणाम या बैठकीत एका सर्वसामान्य आनुषंगिक प्रयोगाच्या रूपात दाखविण्यात येत होता. या प्रयोगात नव्या द्रव्याचा नमुना द्रवरूप नायट्रोजन ( तापमान ७७ के ) असलेल्या ताटलीत ठेवून त्याच्यावर चुंबक धरण्यात येई. अतिसंवाहक पदार्थ चुंबकीय क्षेत्राला दूर सारत असल्याने हा चुंबक हवेत तरंगत वा लोंबकळत राही. १९३३ साली डब्ल्यू. माइसनर व आर्. ऑक्सेनफेल्ड यांनी शोधून काढलेल्या या परिणामाला 'माइसनर परिणाम' म्हणतात. यानुसार अतिसंवाहक द्रव्याचा नमुना दुर्बल चुंबकीय क्षेत्रात ठेवून थंड करीत गेल्यास जेव्हा त्याचा विद्युतरोध शून्य होतो (म्हणजे तापमान जेव्हा त्याच्या संक्रमण तापमानाच्या खाली जाते), तेव्हा त्यातील चुंबकीय क्षेत्राचे वितरण एकदम बदलते. त्यात मुळात असलेल्या चुंबकीय प्रेरणारेषा ( चुंबकीय स्रोत ) त्यातून बाहेर घालविल्या जातात. मात्र प्रत्येक अतिसंवाहक द्रव्याच्या बाबतीत चुंबकीय क्षेत्राचे एक विशिष्ट क्रांतिक मूल्य असते; यापेक्षा जास्त चुंबकीय क्षेत्र त्या पदार्थाला लावल्यास या प्रेरणारेषा परत आत घुसून अतिसंवाहकता नष्ट होते. उदाहरणार्थ, पारा, कथिल, शिसे यांच्या मानाने निओबियम-कथिल, निओबियम-टिटॅनियम या मिश्रधातूंच्या बाबतीत हे क्रांतिक मूल्य अधिक आहे.

अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या संशोधनातील स्पर्धा अधिकाधिक तीव्र होत आहे. जगभरचे संशोधक आपापल्या सुट्या (रजा) रद्द करून प्रयोगशाळेकडे धाव घेत आहेत; त्यांचे कुटुंबाकडे दुर्लक्ष होत आहे; काही महाभागांनी तर प्रयोगशाळेतच ठिय्या देता यावा म्हणून खाटाच प्रयोगशाळेत आणून ठेवल्या आहेत (उदाहरणार्थ, इलिनॉय विद्यापीठातील डॉनल्ड गिन्सबर्ग यांनी रात्रीही प्रयोगशाळेत मुक्काम ठोकण्याची सर्व तयारी केली आहे). आणि पुष्कळ संशोधकमंडळी थोडचा, आयत्या खाद्यपदार्थांवरच भागवून नेत आहे. जे. टी. चेन हे भौतिकीविद म्हणतात : "१९८६ च्या नाताळनंतर लगेचच आम्ही कामाला लागलो असून आम्ही जवळजवळ रोजच प्रयोग करीत असतो. कधीकधी फक्त तीन-चार तास झोपतो. हे वातावरण ट्रँझिस्टरचा शोध लागला तेव्हाच्या वातावरणासारखे असू शकेल; परंतु माझा हा एकमेवाद्वितीय अनुभव आहे." कोइजी किशिको हे जपानी रसायनशास्त्रज्ञ म्हणतात, "ही स्पर्धा नोबेल पारितोषिकासाठी आहे."

जगातील औद्योगिक दृष्टचा पुढारलेले देश एका अन्य प्रकारच्या शर्यतीत गुंतले आहेत. या नव्या अतिसंवाहक द्रव्यांमुळे होणारे संभाव्य व्यापारी फायदे

झटपट शोधून काढण्यासाठी ही स्पर्धा आहे. जपान शासनाच्या विज्ञान व तंत्रविद्या आस्थापनाने फेब्रुवारी १९८७ मध्ये एक समिती स्थापन केली असून तिच्यात शासनातील तज्ज्ञांप्रमाणेच उद्योगसमूह व विद्यापीठ यांतील तज्ज्ञांचाही समावेश करण्यात आलेला आहे. चर्चासत्रे व कार्यशाळा आयोजित करणे; संशोधनातील कल कोणते आहेत ते पाहूम त्यांचे विश्लेषण करणे व नवीन अतिसंवाहक द्रव्यांविषयीचे अहवाल प्रसिद्ध करणे ही या समितीची कामे आहेत. हिचे पहिले चर्चासत्र १ मे १९८७ रोजी झाले व बेडनॉर्झ हे मुख्य वक्ते होते. निरनिराळ्या ४० उद्योगसमूहांकडून या समितीला निधी उपलब्ध होतो. अशीच एक समिती तेथील आंतरराष्ट्रीय व्यापार व उद्योग खात्याने स्थापली असून या खात्याच्या ऊर्जा वाचवा कार्यक्रमातील 'मूनलाइट प्रकल्पा'तही अतिसंवाहक द्रव्ये वापरण्याचा खाते विचार करीत आहे. अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या संशोधनामागील प्रेरणा व निधी मुख्यत्वे उद्योग-समूहांकडूनच मिळत आला आहे. मात्र आता या खाजगी क्षेत्राला अर्थसाहाय्य करण्याची एक योजना या खात्याने आखली आहे; तसेच अतिसंवाहक द्रव्यां-पासून बनविण्यात येणाऱ्या साधनसामग्रीचे परीक्षण करण्यासाठी किंवा चाचणी घेण्यासाठी हे खाते नागोया येथे एक केंद्र उभारणार आहे.

अमेरिकेच्या ऊर्जा खात्याने अतिसंवाहक द्रव्यां-विषयीच्या संशोधनाला प्रोत्साहन देण्यासाठी १९८७ साली आधीच्या वर्षाच्या मानाने दुप्पट म्हणजे ४ कोटी डॉलर रक्कम मंजूर केली आहे. तसेच हे खाते देशा-तील प्रयोगशाळा, विद्यापीठे व उद्योगसमूह यांच्यामध्ये समन्वय साधण्यासाठी परिषदा आयोजित करते. या विषयीच्या सर्व माहितीचे संकलन करून ती संगणकात साठविण्याचे कामही या खात्याने हाती घेतले आहे. यामुळे अमेरिकन संशोधक अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या झपाट्याने होत असलेल्या संशोधनाबरोबर राहू शक-तील. शिवाय १९८८ च्या उन्हाळ्यात अतिसंवाहक द्रव्यांवर होणारी 'व्हाइट हाऊस परिषद' घेण्याच्या कामी हे खाते सहभागी होणार आहे. अमेरिकेचे ऊर्जा-मंत्री म्हणतात, "हा लेसरएवढ्या श्रेष्ठ दर्जाचा महत्त्वपूर्ण विषय आहे." अरगॉन राष्ट्रीय प्रयोगशाळेला येत्या ५ वर्षांत द्रवरूप नायट्रोजनात अतिसंवाहक अशी वीज प्रेषण तार निर्माण करण्याचा आदेशही या खात्याने दिला आहे. ॲमीस व ब्रुक हॅव्हन प्रयोगशाळा हिला मदत करतील. जपानने या क्षेत्रातही श्रेष्ठत्व प्राप्त केल्याचे नुसते पाहत बसण्यापेक्षा या विषयाच्या संशोधनामध्ये समन्वय साधण्यासाठी राष्ट्रीय पातळी-वरचा आयोग स्थापण्याचा प्रस्तावही मांडण्यात आला आहे. या स्पर्धेमध्ये अमेरिका टिकून राहण्यासाठी साहाय्य करण्याच्या उद्देशाने राष्ट्रीय विज्ञान प्रतिष्ठानाने मे १९८७ मध्ये १६ लाख डॉलर एवढे अनुदान मंजूर केले आहे.

कार्मलिंग-ऑनिस यांच्या शोधापासून ते हल्लीच्या शोध-मालिकेपर्यंतच्या ७५ वर्षांच्या काळात अति-संवाहकता निर्माण करण्यासाठी योग्य तो धातू आणि नंतरच्या काळात मिश्रधातू द्रवरूप हीलियममध्ये ठेवणे हा एकच मार्ग उपलब्ध होता. हीलियम हा विरळाच आढळणारा वायू असल्याने महाग पडतो. तो ४·२ के इतक्या कमी तापमानाला द्रवरूप होतो. म्हणजे त्याचे द्रवात रूपांतर करायचे झाल्यास या तापमानापर्यंत तो थंड करावा लागतो. यासाठी जास्त ऊर्जा लागते म्हणजेच खर्च वाढतो. त्याची द्रवीभवन करण्याची प्रक्रियाही अवघड आहे. शिवाय तो द्रवरूपात टिकवून ठेवण्यासाठी पुष्कळ खर्च येतो. कारण तो तसाच राहण्यासाठी अत्यंत उष्णतानिरोधक अशा पात्रात पक्केपणी सीलबंद करून न ठेवल्यास गरम होऊन तो जलदपणे उडून जातो. अशा तऱ्हेने द्रवरूप हीलियम हाताळणे हे कठीण काम आहे. शिवाय शीतनक म्हणजे थंड करणारा पदार्थ म्हणून हा द्रव विशेष प्रभावी नसतो. त्याच्या अशा क्षणभंगूर व खर्चिक स्वरूपामुळे अतिसंवाहक द्रव्यांचा उपयोग अगदी थोड्याच साधनां-मध्ये करणे शक्य होते. उदाहरणार्थ, रूळमार्गाच्या किंचित वरून व चुंबकीय गिरद्यांवरून अत्यंत वेगाने धावणारी जपानची तरती प्रायोगिक आगगाडी, काही थोडेच प्रचंड कणवेगवर्धक व तीव्र चुंबकीय क्षेत्रावर चालणारी वैद्यकातील चुंबकीय अनुस्पंदन प्रतिमाकरण (एम आर आय) यंत्रे.

१९८६ सालानंतर मृत्तिका संयुगांचा असाधारण असा एक वर्ग सापडला आहे. त्यामुळे अतिसंवाहकते-विषयीच्या प्रत्येक बाबतीत मोठा फरक पडला आहे. अतिसंवाहक होण्यासाठी ही संयुगे ९८ के (–२८३° फॅरनहीट) तापमानापर्यंतच थंड करावी लागतात. यामुळे अतिसंवाहकतेचा व्यावहारिक उपयोग करून

अनुक्रमणिका

घेण्याच्या शक्यतेत अचानकपणे खूपच वाढ झाली आहे. कारण एवढे थंड तापमान निर्माण करण्यासाठी द्रवरूप हीलियमाऐवजी द्रवरूप नायट्रोजन वापरता येऊ शकेल. कारण द्रवरूप नायट्रोजनाचे तापमान यापेक्षा कमीच म्हणजे ७७ के असते. नायट्रोजन हवेत मुबलक (सुमारे ७१ टक्के) असून तो सहजी उपलब्ध होतो. तो सहजपणे द्रवरूप करता येतो व त्यासाठी कमी खर्च येतो. म्हणजे तो दुधाएवढा स्वस्त पडतो. नायट्रोजन द्रवरूपात टिकवून ठेवणे हे काम सोपे असल्याने तो सहज हाताळता येतो व साध्या थर्मासमधून नेता येतो. अशा प्रकारे द्रवरूप नायट्रोजन द्रवरूप हीलियमापेक्षा दहापट स्वस्त पडतो. तसेच द्रवरूप नायट्रोजनाची बाष्पीभवनाची सुप्त उष्णता (म्हणजे द्रव अवस्थेतून वायू अवस्थेत जाताना लागणारी जादा उष्णता) द्रवरूप हीलियमाच्या मानाने पुष्कळच जास्त असल्याने तो शीतनक पदार्थ म्हणून द्रवरूप हीलियमाच्या मानाने वीसपट प्रभावी आहे.

अशा प्रकारे जर या अतिसंवाहक द्रव्यांना वापरण्यायोग्य रूपे ( उदाहरणार्थ, तार, फीत, पटल) देता आली, तर अतिसंवाहक तंत्रविद्येत क्रांतीच घडून येईल. म्हणून बेल लॅबोरेटरीजमधील आर्नो पेन्झियास म्हणतात, " अतिसंवाहकतेच्या क्षेत्रात अलीकडच्या काळात झालेल्या प्रगतीला तोडच नाही. " घरगुती शीतकपाटातील तापमानालाच नव्हे तर जेथे द्रवरूप नायट्रोजनाचीही गरज भासणार नाही अशा कोठी तापमानाला अतिसंवाहक होणारी द्रव्येही लवकरच सापडतील, अशी आशा शास्त्रज्ञांना वाटते. असे घडत गेल्यास जसजसे संक्रमण तापमान वाढत जाईल तसतसे अतिसंवाहक तंत्रविद्येचे भवितव्य उज्ज्वल होत जाईल. परिणामी पूर्वी केवळ कल्पनेतच शक्य वाटत असलेल्या अशा पुष्कळ ठिकाणीही या अतिसंवाहक द्रव्यांचा प्रत्यक्ष उपयोग करता येऊ शकेल अशी परिस्थिती निर्माण झाली आहे, असे पॉल सी. डब्ल्यू च्यू ( ह्स्टन विद्यापीठ ) यांना वाटते ( उदाहरणार्थ, अपव्यय न होता वीज वाहून नेणाऱ्या प्रेषण तारा ).

### अलीकडील शोध

स्वित्झर्लंडमध्ये आय बी एम झुरीक संशोधन प्रयोगशाळा असून गेल्या वर्षी तेथील संशोधकांना सुरंग इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शकाच्या शोधाबद्दल नोबेल पारितोषिक मिळाले होते. याच प्रयोगशाळेतील कार्ले अलेक्स म्यूलर यांनी अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या संशोधनास १९८३ साली सुरुवात केली. त्यांनी आपले लक्ष धातूंऐवजी त्यांच्या ऑक्साइडांकडे वळविले. धातूंची ऑक्साइडे कोठी तापमानाला अतिशय वाईट विद्युत संवाहक वा निरोधक द्रव्ये असली, तरी ती अतिसंवाहक असू शकतील, असे काही सैद्धांतिक भौतिकीविदांनी पूर्वीच सुचविले होते. खरे तर ही द्रव्ये विद्युतनिरोधक म्हणूनच वापरण्यात येतात. उदाहरणार्थ, उच्च विद्युतदाबाच्या प्रेषण तारा ज्यांवरून नेतात ते चिनी मातीचे गड्डे.

म्यूलर व त्यांचे सहकारी योहानेस जॉर्ज बेडनॉर्झ यांनी परिसाचा शोध घेणाऱ्या पूर्वीच्या किमयागारांप्रमाणे शेकडो ऑक्साइड संयुगांवर प्रयोग केले; त्यासाठी भिन्नभिन्न ऑक्साइडे निरनिराळ्या प्रमाणांत घेऊन पाहिली. शेवटी डिसेंबर १९८६ मध्ये त्यांना लँथॅनम, बेरियम, तांबे यांचे असे एक ऑक्साइड सापडले आणि बेडनॉर्झ यांना हे संयुग ३५ के तापमानाला अतिसंवाहक होत असल्याचे आढळले. हे तापमान त्या पूर्वीच्या कोणत्याही ज्ञात संक्रमण तापमानापेक्षा सुमारे १० अंशांनी तरी जास्त होते. त्यामुळे आपले काही चुकत तर नाही ना, अशी शंका त्यांना आली. त्यामुळे त्यांनी पुनःपुन्हा परिश्रमपूर्वक व काटाकाळजीने प्रयोग केले. आपल्या संशोधनाविषयी खात्री पटल्यानंतर त्यांनी एप्रिल १९८६ मध्ये ह्या शोधावरचा लेख एका जर्मन ज्ञानपत्रिकेकडे पाठविला व तो पाच महिन्यांनी प्रसिद्ध झाला. इतरांना या शोधाविषयी शंका वाटत होती. जपानी संशोधकांनी मात्र याची खातरजमा करून घेतली व नंतर अमेरिकन संशोधक जागे झाले. १९८६ अखेरपर्यंत अमेरिकेत व चीनमध्ये या शोधाची खात्री करून घेण्यात आली. परिणामी प्रमुख विद्यापीठे व मोठमोठ्या प्रयोगशाळा या संशोधन क्षेत्रात उतरल्या. दरम्यान बर्ट्रॅम बॅटॅलॉग व आर. जे. काव्हा यांनी ३८ के संक्रमण तापमान असलेले यासारखेच संयुग शोधून काढले. या शोधांमुळे जगभर खळबळ उडाली व या क्षेत्रातील संशोधनात जणू प्रगतीची लाटच आली असून तिचा जोर वाढत आहे. जपान, चीन, अमेरिका, दक्षिण कोरिया, ब्रिटन, पश्चिम जर्मनी, भारत इत्यादी देशांत ही प्रगती होत असून संक्रमण तापमान ५२·५, ९४, ९८ के असे वाढत गेलेले दिसते. या वाढत्या संक्रमण ताप-

अनुक्रमणिका

मानामुळे आता म्यूलर यांनी शोधून काढलेल्या संयुगाच्या जवळपास संक्रमण तापमान (सुमारे ३५ के) असणाऱ्या संयुगांना 'नीच तापमान अतिसंवाहक' असे म्हणण्यात येते; तर ७७ ते ९० के संक्रमण तापमान असलेल्या द्रव्यांना 'उच्च तापमान अतिसंवाहक' आणि ९० के पेक्षा जास्त संक्रमण तापमान असलेल्या द्रव्यांना 'ऊष्म अतिसंवाहक' संबोधिण्यात येते.

पॉल च्यू १९६५ सालापासून अतिसंवाहकतेचे अध्ययन करीत आहेत. त्यांच्या हूस्टन प्रयोगशाळेत द्रव्य उच्च दाबाला पारखण्याची सोय म्हणजे खास साधनसामग्री आहे. म्हणून संयुगावर दाब दिला असता काय परिणाम होतो ते पाहण्याचे त्यांनी ठरविले. ते म्हणतात, "ज्ञात सिद्धांतानुसार दाबामुळे संक्रमण तापमान जलदपणे वाढत जाईल अशी अपेक्षा करता येत नाही. परंतु प्रत्यक्षात हे तापमान रॉकेटप्रमाणे वर गेले. यावरून यामागे दुसरी कोणती तरी उपपत्ती वा यंत्रणा असावी, अशी आमची धारणा झाली." ही अनपेक्षित निरीक्षणे पाहून ते उद्गारले, "इतर काही संशोधक गटांच्या आम्ही पुढे आहोत याचे कारण आम्ही केवळ परंपरागत विचारांना चिकटून न राहता अधिक व्यापकपणे विचार केला हे असावे."

च्यू यांच्या तुकडीने ५२·५ के संक्रमण तापमानाचे द्रव्य सर्वप्रथम तयार केले. या द्रव्याची (लँथॅनमयुक्त व बेरियमयुक्त तांब्याचे ऑक्साइड) रासायनिक घडण व रचना लक्षात घेऊन त्यांनी त्यावरचा दाब वातावरणाच्या दाबाच्या १० ते १२ हजारपट वाढविला असता हे द्रव्य त्यांना मिळाले होते. याहून जास्त दाब दिला असता फायदा होत नाही असे त्यांना आढळले. तेव्हा निराळ्या तऱ्हेने विचार करायला हवा असे च्यू यांच्या लक्षात आले व त्यांनी पुढीलप्रमाणे विचार केला : उच्च दाबामुळे संयुगाची रेणवीय रचना दाबली जाते. म्हणून तो उपयुक्त ठरतो. कारण यामुळे कोणत्या तरी मार्गाने संक्रमण तापमान वाढते. अधिक दाब लाभदायक ठरत नसल्याने त्यांनी रेणू अन्य प्रकारे दाबण्याचा म्हणजे आतून संकुचित करण्याचा निश्चय केला. यासाठी बेरियमाच्या जागी स्ट्रॉंशियम हे मूलद्रव्य आणण्याचा निर्णय त्यांनी घेतला. कारण ही दोन्ही मूलद्रव्ये रासायनिक दृष्टीने सारखी असली, तरी स्ट्रॉंशियमचा अणू बेरीयमच्या मानाने छोटा आहे. यामुळे संक्रमण तापमान खरोखरच पुन्हा वाढले. म्हणून त्यांनी स्ट्रॉंशियमपेक्षा अधिक छोटे अणू असलेले कॅल्शियम त्याच्या जागी आणून पाहिले. तथापि याने फायदा झाला नाही व हा मार्गही बंद झाला.

मग त्यांनी आपले लक्ष या संयुगातील लँथनम या विरल मृत्तिका मूलद्रव्याकडे वळविले व त्यावर प्रयोग करून पाहण्याचे ठरविले (१७ मूलद्रव्यांच्या गटाला विरल मृत्तिका म्हटले जाते. प्रत्यक्षात ही मूलद्रव्ये विरळपणे आढळत नाहीत. उदाहरणार्थ, यांपैकी इट्रियम हे शिशापेक्षा विपुलपणे आढळते. मात्र ही मूलद्रव्ये सर्वप्रथम खऱ्याखुऱ्या विरळ खनिजांमध्ये आढळल्याने त्यांना हे चुकीचे नाव पडलेले आहे). हे नवे द्रव्य फारच आशादायक ठरले व १२ मे १९८७ रोजी त्याच्या एकस्वासाठीं (पेटंटसाठी) त्यांनी अर्जही केला. त्यांची ही आशा लगेच फळाला आली. कारण त्याच महिन्याच्या शेवटी म्हणजे आधीच्या शोधानंतर दोन महिन्यांच्या कालावधीतच एक नवे द्रव्य पुढे आले. मा– कूएन वू वगैरे त्यांच्या सहयोगी संशोधकांनी या द्रव्यावर पुष्कळ वेळा उष्णतेचे संस्करण व रासायनिक क्रिया केल्या. नंतर त्यांनी हे द्रव्य द्रवरूप नायट्रोजनात बुडवून ते थंड करण्यास सुरुवात केली; तेव्हा त्यांच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. कारण ९३ के तापमानाला या द्रव्याचा विद्युतरोध एकदम खाली आला. वू म्हणतात, "आम्ही इतके उत्तेजित झालो होतो व इतके सुन्न होऊन गेलो होतो की, आमचे हातपाय थरथर कापत होते. प्रथम आम्हाला काही तरी चूक झाली असावी अशीच शंका आली होती." पण थोड्याच दिवसांनी या दोघांनी हा प्रयोग हूस्टन येथे परत करून पाहिला व त्यांना या वेळी संक्रमण तापमान ५ अंशांनी वाढल्याचे म्हणजे ९८ के (– २८३° फॅरनहीट) असल्याचे आढळले. एकस्व घ्यायचे असल्याने च्यू यांनी या नव्या संयुगाचे नेमके रासायनिक संघटन व रचना उघड केली नव्हती. मात्र इतर संशोधकांना या संयुगाच्या स्वरूपाविषयी सहजपणे अंदाज बांधता येईल असे वाटले व त्यानुसार ते कामाला लागले. च्यू व वू यांचे दोन लेख 'फिजिकल रिव्ह्यू लेटर्स' या नियतकालिकाकडे २ मार्च १९८७ रोजी आले व चार आठवड्यांनी ते प्रसिद्ध झाले. मात्र च्यू यांनी मार्च १९८७ मध्ये प्रथम घोषणा केल्यावर तीनच दिवसांत १२ प्रयोगशाळांनी याच्यासारखे द्रव्य तयार केले.

अनुक्रमणिका

या द्रव्यात दोन भाग इट्रियम व बेरियम, एक भाग तांबे व ४ भागांपर्यंत ऑक्सिजन असतो. प्रकाशकीय सूक्ष्मदर्शकामध्ये या द्रव्यात एक काळी व एक हिरवी अशा दोन प्रावस्था (मूलद्रव्यांचे प्रमाण वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळे असल्याने होणाऱ्या भिन्न प्रकाराला प्रावस्था म्हटले जाते) असल्याचेही दिसून आले. च्यू यांचा हा शोधही लवकरच जुना ठरेल असे दिसते आहे. कारण त्यांच्या तुकडीला एका मृत्तिका द्रव्यात यापेक्षा पुष्कळच अधिक तापमानाला अतिसंवाहकतेची प्रारंभिक लक्षणे आढळल्याचे च्यू यांनी यू. एस. काँग्रेशनल समितीला जून १९८७ च्या शेवटच्या पंधरवड्यात कळविले होते.

वरील संयुगात लँथॅनमाच्या जागी इट्रियम हे दुसरे विरल मृत्तिका मूलद्रव्य आणले होते. अशाच प्रकारे ब्रुकहॅव्हन येथील संशोधकांनी इट्रियमच्या जागी ल्युटेशियम व सँडिया प्रयोगशाळेत इट्रियमच्या जागी गॅडोलिनियम हे विरल मृत्तिका मूलद्रव्य वापरून पाहण्यात आले. अशा तऱ्हेने एकाच्या जागी दुसरे विरल मृत्तिका मूलद्रव्य आणून या संयुगांची पूर्ण मालिकाच निर्माण करणे शक्य आहे, असे सँडिया प्रयोगशाळेतील डेव्ह जिनली यांचे मत आहे.

सान जोस (कॅलिफोर्निया) येथील आय बी एम अल्माडेन संशोधन केंद्रातील शास्त्रज्ञांना च्यू यांना सापडलेल्या संयुगाची नक्कल करण्यात यश आले. त्यांनी या संयुगाच्या स्फटिकरचनेचे विश्लेषण करून ही माहिती या कंपनीच्या यार्क टाउन हाइट्स (न्यूयॉर्क) प्रयोगशाळेकडे पाठविली तेथील सहकाऱ्यांनी एका रात्रीत या द्रव्याची पातळ पटले तयार केली. सान जोस येथील पी. एम. ग्रँट यांच्या गटाने इट्रियम-बेरियम-तांबे ऑक्साइडाची स्फटिकरचना उलगडली व हे संयुग पेरोव्हस्काइट म्हणजे मुळात अष्टफलकीय आकाराचा स्फटिक असल्याचे जाहीर केले. हा स्फटिक संवाहक व निरोधक अशा द्रव्यांच्या एकाआड एक थरांचा बनलेला असून विरल मृत्तिका हा यातील महत्त्वाचा घटक असल्याचे त्यांनी सांगितले. तर सान जोस येथील एडवर्ड एम. एंग्लर यांनी या संयुगाचे आठवडाभर संशोधन करून त्यातील प्रमुख प्रावस्था पेरोव्हस्काइट या सुपरिचित अकार्बनी स्फटिकरचनेचे बदललेले रूप असल्याचे सांगितले. हे संयुग शुद्ध रूपात बनविण्याची रीत त्यांनी विकसित केली आहे. तीमध्ये हवेऐवजी शुद्ध ऑक्सिजन वायूत हे द्रव्य भाजून सावकाशपणे थंड करण्यात येते. यामुळे संक्रमण तापमान जास्तीत जास्त येते.

अतिसंवाहक द्रव्यात विरल मृत्तिका मूलद्रव्य हे काहीसे विसंगत वाटते. कारण विरल मृत्तिका चुंबकीय असून चुंबकत्व व अतिसंवाहकता या परस्परविरुद्धधर्मी गोष्टी आहेत. लॉस ॲलॅमॉस येथे शोधून काढण्यात आलेल्या संयुगात वापरण्यात आलेले गॅडोलिनियम हे विरल मृत्तिका मूलद्रव्य विशेष चुंबकीय आहे. ते अतिसंवाहकता घालविण्यासाठी वापरले जाते असे मानण्यात येत असले, तरी याच मूलद्रव्यामुळे येथे अतिसंवाहकतेत वाढ झाल्याचे दिसून आले.

बीजिंग (चीन) येथील विज्ञान अकादमीच्या भौतिकीय संस्थेतील झोंगाक्सियन झाओ यांनी २४ फेब्रुवारी १९८७ रोजी ९४ के तापमानाला अतिसंवाहक होणारे द्रव्य शोधून काढले. त्यांच्या मते रासायनिक दृष्ट्या विरळाच असणाऱ्या विरल मृत्तिका भूवैज्ञानिक दृष्टीने विपुल आहेत; चीनमध्ये तर त्या विपुलपणे आढळत असल्याने तेथे अशा अतिसंवाहक द्रव्यांच विकास अधिक फायदेशीर ठरेल. जेव्हा च्यू यांनी आपल्या संयुगाचे संघटन उघड केले नव्हते, तेव्हा झोंगाक्सियन यांनी ते बेरियमवर आधारलेले ऑक्साइड असून त्यात इट्रियम व तांबे असल्याचे जाहीर केले होते. त्यांना व अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या संशोधनातील अग्रणी चेंग गेंका हुआ यांना सांस्कृतिक क्रांतीची (१९६६-७६) झळ पोचली होती. सध्या त्यांच्या तेथील संशोधनासाठी असलेली परिस्थिती अजिबात समाधानकारक नाही. इमारत गरम ठेवण्याची यंत्रणा बंद पडलेल्या एका इमारतीत उसनवारीने आणलेल्या सामग्रीनिशी तेथे १३ भौतिकीविद संशोधन करीत असून या संशोधनासाठी पुरेसा निधीही उपलब्ध नसतो.

४ मार्च १९८७ रोजी जपानमधील विज्ञान व तंत्रविद्या अस्थापनेच्या त्सुकुबा येथील धातूंसाठीच्या राष्ट्रीय संशोधन संस्थेतील संशोधकांनी ९३ के संक्रमण तापमानाचे संयुग बनविल्याचे घोषित केले. नंतर या संशोधनात पूर्णतया गढून गेलेल्या सोजी टनाका यांच्या नेतृत्वाखालील टोकियो विद्यापीठातील संशोधकांचा गटही यात सहभागी झाला. त्यांनी अतिसंवाहकतेस कारणीभूत असणारी संयुगातील प्रावस्था ओळखून काढून ती थरयुक्त पेरोव्हस्काइट असल्याचे म्हटले.








तसेच या संयुगात तीन भाग इट्रियम व बेरियम, दोन भाग तांबे व सात भागांपर्यंत ऑक्सिजन असल्याचे सांगितले. टनाका यांच्या तुकडीने इट्रियमऐवजी एर्बियम व होल्मियम ही मूलद्रव्ये वापरूनही तेवढ्याच संक्रमण तापमानाची द्रव्ये तयार केली. यामुळे टनाकांचा उत्साह खूप वाढला. कारण यामुळे उच्च सीमांत वीजप्रवाहाची अतिसंवाहक द्रव्ये मिळू शकतील. त्यांच्यामुळे अतिसंवाहक चुंबक, ऊर्जा साठविण्याची साधने, अतिजलद पण छोटे संगणक व स्वस्त मॅग्लेव्ह आगगाड्या यांमधील उपयोगांचा खजिनाच खुला होईल, असे त्यांना वाटते. याच सुमारास म्हणजे मार्च १९८७ च्या अखेरीस परंपरागत अतिसंवाहक चुंबकावर आधारलेल्या अशा राष्ट्रीय जपानी आगगाडीच्या एम एल ५०० या मूळ नमुन्याची चाचणी घेण्यात आली. ही तयार करण्यासाठी १५० कोटी येन (१ कोटी डॉलर) एवढा खर्च झाला आहे. प्रथम फुजिकुरा डेनसेन यांनी उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्याची (लँथॅनम-स्ट्रॉंशियम, तांबे ऑक्साइडाची) तार बनविली; तर नंतर २ एप्रिल १९८७ रोजी तोशिबा कंपनीने इट्रियम, बेरियम, तांबे ऑक्साइडाच्या तारेचे चित्र प्रसिद्ध केले.

टोकियो विद्यापीठातील संशोधकांना १९८६ अखेरीस ३० के संक्रमण तापमानाच्या अतिसंवाहक मृत्तिका द्रव्याची खात्री पटली. तेव्हापासून जपानमधील या नवीन द्रव्यांविषयीच्या संशोधनाला भरती येत गेली आहे. 'जपानीज जर्नल ऑफ अॅप्लाइड फिजिक्स' या ज्ञानपत्रिकेच्या एप्रिल व मे (१९८७) या विशेषांकांमध्ये या नवीन अतिसंवाहक द्रव्यांवरचे सुमारे २०० लेख आले; ते जपानभरच्या ८० प्रयोगशाळांमधील कित्येकशे वैज्ञानिकांनी लिहिले होते. आणि तदनंतर असा एक दिवस गेला नाही की ज्या दिवशी 'अत्यंत महत्त्वाच्या' किंवा 'सनसनाटी' शोधाची घोषणा झाली नाही.

या स्पर्धेत अमेरिका व जपान यांना गाठण्यासाठी ब्रिटिश संशोधकांची धडपड चालू आहे; पण मुळात निधीच पुरेसा उपलब्ध नाही ही खरी अडचण आहे. १९८७ मध्ये मार्चच्या शेवटच्या आठवड्यात बर्मिंगहॅम येथे झालेल्या बैठकीत देशातील या संशोधनाचा आढावा घेण्यात आला. वार्विक, डऱ्हॅम व केंब्रिज ही विद्यापीठे आणि रदरफर्ड अॅपल्टन प्रयोगशाळा येथील संशोधकांनी सहकार्य करून लँथॅनम, बेरियम, तांबे ऑक्साइड या संयुगाच्या स्फटिकरचनेची वैशिष्टये निश्चित केली; तर बर्मिंगहॅम व केंब्रिज (क्लेरडॉन प्रयोगशाळा) या विद्यापीठांतील संशोधक तुकड्यांनी उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्यांचे नमुने तयार करण्यास व इट्रियमयुक्त संयुगांच्या गुणधर्मांचे मापन करण्यास सुरुवात केली आहे. यांशिवाय इंपिरियल महाविद्यालय (लंडन) व ब्रिस्टॉल विद्यापीठ येथेही याविषयीचे संशोधन चालू आहे. तथापि निधीची चणचण सर्वत्र जाणवत असून त्यामुळे अधिक उच्च संक्रमण तापमानाऐवजी मूलभूत भौतिकीय अध्ययनावर लक्ष केंद्रित करण्याची एकूण प्रवृत्ती आढळते.

पश्चिम जर्मनीतील डार्मस्ट्राट येथील टेक्निशे होक्शूल येथील संशोधक अतिसंवाहकतेविषयीच्या संशोधनात आघाडीवर आहेत. तेथील फ्रांक स्टेग्लिख यांच्या नेतृत्वाखालील तुकडी या नवीन द्रव्यांपासून जोसेफसन जोड (जंक्शन) बनविण्याची शक्यता पडताळून पाहत आहेत, त्यांनी काढलेला तात्पुरता निष्कर्ष असा आहे : मृत्तिका द्रव्यांमध्ये अतिसंवाहकता असण्याला बहुतकरून या द्रव्यांच्या कणांमधील सीमा कारणीभूत असतात. या द्रव्यांचे अधिक मोठे स्फटिक बनण्याच्या दृष्टीने हा आविष्कार महत्त्वाचा आहे. म्युनिख, गिसेन व कार्लस्रूव्हे (अणुकेंद्रीय संशोधन केंद्र) येथेही असे संशोधन चालू असून एका विरल मृत्तिका द्रव्याच्या जागी दुसरे आणण्याचे त्यांचे प्रयत्न चालू आहेत. कार्लस्रूव्हे येथील सी. पॉलिटिस यांनी १२५ के संक्रमण तापमानाचे द्रव्य शोधल्याचा दावा केला असून येथील संशोधक या द्रव्यांचे विद्युतीय गुणधर्म पडताळून पाहत आहेत.

न्यूयॉर्क येथील बैठकीनंतर ऊष्म अतिसंवाहक (९० के पेक्षा अधिक संक्रमण तापमानाची) द्रव्ये शोधल्याचे अनेक दावे करण्यात आले असून त्यांपैकी काही असे आहेत : मिशिगन येथील संशोधकांना इट्रियम, बेरियम, तांबे, फ्ल्युओरीन व ऑक्सिजन यांच्या बहुप्रावस्था संयुगात ११५ के तापमानाला अतिसंवाहकता आढळली. तर कॅलिफोर्निया विद्यापीठ (बर्कली) व लॉरेन्स बर्कली प्रयोगशाळा येथील अलेक्स झेट्ल, अंजेलिका स्टॅसी व मार्विन यांनी २३४ के (– ३८° फॅरनहिट) संक्रमण तापमानाचे द्रव्य सापडल्याचा

दावा केला आहे. मात्र याची खात्री पटलेली नाही. झेट्ल म्हणतात, "आम्ही सर्व तारा व्यवस्थित जोडलेल्या आहेत की नाही ते तपासून पाहिले व सर्व सुरळीत चालू होते. पण नमुना तापवून थंड केल्यावर हा गुणधर्म नाहीसा झाला व तो परत आला नाही." १९८७ मधील मार्च महिन्याच्या शेवटच्या आठवड्यात वेन राज्य विद्यापीठ (डेट्रॉइट) येथील संशोधकांनी २४० के तापमानाला अतिसंवाहकता मिळविल्याचा दावा केला. लॉवेल ई. वेगनर, जे. टी. चेन, एल्थेरियस एम्. लॉंगऑथेटिस, चार्ल्स जे. मॅक्इवान व विगस्टन विन हे या तुकडीतील संशोधक असून त्यांच्या मते या द्रव्यातील एक प्रावस्था (भाग) २४० के तर दुसरी ९० के तापमानाला अतिसंवाहक होते. पैकी २४० के ला अतिसंवाहक होणाऱ्या प्रावस्थेचे अचूक संघटन शोधून काढण्याचे वेगनर यांनी ठरविले असून हिचा शुद्ध नमुना तयार करता येईल, अशी उमेद त्यांना आहे. न्यूयॉर्क बैठकीच्या दुसऱ्याच दिवशी टोकियो विद्यापीठातील कोइची किटाझावा यांनी कोगाशिमा विद्यापीठातील कोझो ओहारा यांच्या नेतृत्वाखालील संशोधकांना १४° सेल्सियस (२८७ के) तापमानाला अतिसंवाहकता आढळल्याची घोषणा केली होती. १८ मार्च रोजी जपानी वर्तमानपत्रांनी हे वृत्त छापले होते. या संशोधकांना खरीखुरी अतिसंवाहकता नसली तरी निदान जोसेफसन परिणाम आढळला असावा, असे दिसते. हा परिणाम म्हणजे कोठी तापमानाला आढळणारा आविष्कार असून यामध्ये दोन अतिसंवाहक द्रव्यांमधील पातळ निरोधक अडथळ्यामधून इलेक्ट्रॉनची जोडी पार जाते. अशाच प्रकारे नवी दिल्लीतील राष्ट्रीय भौतिकीय प्रयोगशाळेतील संशोधकांना ३००के तापमानाला अतिसंवाहक असलेले द्रव्य आढळले आहे. अशा तऱ्हेने कोठी तापमानाला अथवा निदान उत्तर डकोटा वा सायबीरियातील हिवाळ्यातील रात्री असलेल्या तापमानाला अतिसंवाहक असणारी द्रव्ये आढळली आहेत. काहींच्या मते उच्च वा ऊष्म तापमान अतिसंवाहक द्रव्ये ही भावी कथानकाची केवळ नांदी आहे. अशा द्रव्यांच्या अनेक प्रावस्था व भिन्न रचना असतात. तसेच त्यांच्यात मूलमूत घटक द्रव्ये वेगवेगळ्या प्रमाणांत असू शकतात व त्यांतील एकच प्रावस्था अतिसंवाहक असते म्हणून संशोधक त्यांचे संघटन उघड करण्यास नाखूष असतात.

या संशोधनातील झपाट्यावरून एक मोठी शक्यता सूचित होते. वेल लॅबोरेटरीजमधील पेन्झियास म्हणतात, "गेल्या वर्षात अतिसंवाहक द्रव्यांच्या संक्रमण तापमानात चारपट वाढ झाली. जर एवढ्याच कालावधीत पुनश्च एवढीच वाढ झाली. तर एका वर्षाच्या आत (१९८८ साल संपण्यापूर्वीच) कोठी तापमानाला अतिसंवाहक द्रव्ये आपल्याला उपलब्ध झालेली असतील." तर आय बी एम मधील प्रवीण चौधरी हे यात पुढील भर टाकतात: "आपण सर्व मानसिक अडथळे पार केले आहेत. यापुढे हे संक्रमण तापमान किती वर जाईल हे आता कोणी विचारीनासे झाले आहे." (या संदर्भात एका नियतकालिकात आलेले व्यंगचित्र फारच बोलके होते. दूरदर्शनवरून ज्या प्रमाणे रोज चार महानगरांतील तापमान सांगण्यात येते; त्याच धर्तीवर या चित्रात निवेदिका रोजचे संक्रमण तापमान सांगताना दाखविली होती.) अशा प्रकारे येत्या एका वा अधिक वर्षांत कोठी तापमानाला अतिसंवाहकता साध्य झाल्यास तिचे मानवी जीवनावर होणारे परिणाम हे आपल्या तर्कापलीकडील असतील. मग अतिसंवाहक द्रव्यांसाठी गोठणक्रिया, निरोधन व द्रवरूप नायट्रोजन यांची गरजच उरणार नाही. आणि ही भावी तंत्रविद्या अत्यंत स्वस्त असू शकेल. आय बी एम मधील पॉल ग्रँट म्हणतात, "आम्ही केवळ अवलोकन करीत आहोत; प्रत्येकजण अवाक् होऊन नुसते पाहात राहिला आहे." तेथीलच विल्यम गॅलाघर यापुढे जाऊन म्हणतात, "सध्या आपल्याला माहीत असलेल्या बाबींमुळे आपल्या कल्पनाशक्तीवर मर्यादा पडू देता कामा नयेत. आपण करू शकत असलेल्याच गोष्टींविषयी केवळ कल्पना करून आपण थांबू शकत नाही."

अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या संशोधनपर लेखांची स्थितीही या द्रव्यांच्या संक्रमण तापमानाच्या स्थितीहून वेगळी नाही. 'फिजिकल रिव्ह्यू लेटर्स' या नियतकालिकाचे सहसंपादक फ्रँक फ्रेडीन म्हणतात, "तीन आठवड्यांपूर्वी या विषयावरचे ९८ लेख आमच्याकडे आले होते आणि यांपैकी थोडेच लेख व तेही केव्हातरी प्रसिद्ध होतील. या विषयातील प्रगतीचा वेग इतका आहे की, दोन वा तीन आठवड्यांपूर्वीचा निष्कर्ष जुनाट झालेला असतो. त्यामुळे प्रकाशनाच्या प्रक्रियेला गती देण्यासाठी आम्हाला पूर्णपणे नवीन पद्धती अवलंबावी लागेल."

पूर्वीही संशोधनपर लेख छापून येण्यास बराच जास्त कालावधी लागत असे; परंतु आता अशा लेखांच्या संख्येत झपाटचाने वाढ झाल्याने आणखीनच पंचाईत झाली आहे. त्यामुळे संशोधक आपले लेख परस्पर एक-मेकांना मोठ्या प्रमाणावर सरळच पाठवू लागले आहेत. त्यामुळे यावर ' अर्धवट विज्ञान ' असा आरोप करण्यात येतो. यावरून बनलेले एका तज्ज्ञाचे मत असे आहे : "या क्षेत्रातील कोठलेही मत (वा कल्पना) मागे घेण्यात येत नाही; तर ती व्यक्ती केवळ त्या मताचा आग्रह धरण्याचे सोडून देते."

धातवीय अतिसंवाहक द्रव्ये अतिसंवाहक मृत्तिका-द्रव्यांपेक्षा अधिक पसंत केली जातात. कारण धातवीय द्रव्यांपासून वस्तू सहजपणे बनविता येतात व ती सहज हाताळताही येतात. मॅसॅच्यूसेट्स इन्स्टिटचूट ऑफ टेक्नॉलॉजीमधील ग्रेगरी जे यांनी ११ जून १९८७ रोजी यूरोपियम, बेरियम व तांबे या धातूंपासून ९० के संक्रमण तापमानाचे द्रव्य बनविल्याचे जाहीर केले. म्हणजे यासाठी स्वस्त द्रवरूप नायट्रोजन शीतनक म्हणून वापरता येऊ शकतो. यूरेक व त्यांच्या सहकाऱ्यांनी या मिश्रधातूच्या रसाची धार एका फिरत्या चाकावर सोडली असता त्यांना त्याची पातळ फीत मिळाली. नंतर तिचे ऑक्सिडीभवन करून तिचे अतिसंवाहकात परिवर्तन करण्यात आले. अशा तऱ्हेने त्यांनी कोणत्याही अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्याच्या फितीपेक्षा अधिक बळकट, घन व लवचीक फीत मिळविण्याचे खात्रीशीर तंत्र विकसित केल्याचा दावा केला आहे.

## सैद्धांतिक उपपत्ती

अतिसंवाहकतेच्या व अतिसंवाहक द्रव्यांच्या क्षेत्रांत निरनिराळी प्रायोगिक तंत्रे वापरून दररोजच नवनवे प्रायोगिक निष्कर्ष पुढे येत आहेत, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. सैद्धांतिक शास्त्रज्ञही या बाबतीत जास्त मागे राहिलेले नाहीत. अतिसंवाहक द्रव्यांचे रासायनिक संघटन माहीत झाले असले, तरी ती द्रव्ये अशी का वागतात, हे अजून निश्चितपणे माहीत झालेले नाही. उच्च संक्रमण तापमानाचे स्पष्टीकरण देण्यासाठी अनेक उपपत्ती मांडण्यात आलेल्या आहेत. मात्र त्यांचे गुणावगुण किंवा सत्यता एवढचात ठरविणे अकाली ठरेल.

गॉर्टर व कॅझिमी (१९३१), एफ. आणि एच. लंडन (१९३५), गिंझबर्ग व लेंडा (१९५०), तसेच जॉन बार्डीन, लेऑं कूपर व रॉबर्ट श्रीफर (हे तिघे १९७२ सालच्या भौतिकीच्या नोबेल पारितोषिकाचे मानकरी आहेत) यांनी अतिसंवाहकतेचे स्पष्टीकरण देण्याचे प्रयत्न केले आहेत. आणि ज्या नेमक्या रेणवीय रचनेमुळे अतिसंवाहकतेचे कार्य चालते, ती उलगडण्याचे शास्त्रज्ञांचे प्रयत्न अजूनही चालू आहेत.

धातूच्या अणूंमधील संवाहक म्हणजे सर्वांत बाहेरच्या कक्षकातील वा कवचातील इलेक्ट्रॉनांवर अणुकेंद्राची ओढ सापेक्षतः कमी असते. बाहेरून विद्युतीय क्षेत्र लावल्यास हे इलेक्ट्रॉन एका दिशेकडून दुसरीकडे प्रवाहित होतात वा सरकत पुढे जातात. उलट, रबरासारख्या निरोधक द्रव्यात हे इलेक्ट्रॉन पक्के असल्याने त्यांना हलण्यास पुरेशी मोकळी जागा राहात नाही व ते न हलल्याने विद्युतप्रवाह वाहू शकत नाही. धातूसारख्या संवाहकात प्रवाहित झालेल्या इलेक्ट्रॉनांच्या आपापसात टकरी होतात. त्यामुळे उष्णतानिर्मिती होऊन वीज वाया जाते. अशा तऱ्हेने चांदी, तांबे यांसारख्या सुसंवाहक धातूंमध्येही विजेला रोध निर्माण होऊन टिकून राहतो. धातूचे तापमान कमी करीत गेल्यास इलेक्ट्रॉनांवरील प्रतिसारणावर (एक-मेकांना दूर लोटण्याच्या क्रियेवर) मात केली जाते व इलेक्ट्रॉनांची गती कमी होते. त्यानुसार विद्युतरोधही कमी होत जातो. काही धातू व मिश्रधातूंमध्ये विशिष्ट म्हणजे संक्रमण तापमानाला हा रोध नाहीसा किंवा शून्य होतो. म्हणजेच धातू वा मिश्रधातू अतिसंवाहक होतो.

अतिसंवाहक स्थितीमध्ये संवाहक इलेक्ट्रॉनांची स्थिती सांघिक प्रकारची होते म्हणजे या स्थितीत इलेक्ट्रॉनांच्या स्थिर (पक्कचा) जोडचा बनतात व त्यांना ' कूपर जोडचा ' म्हणतात. अशा तऱ्हेने इलेक्ट्रॉनांमधील टकरी टाळून विनाअडथळा विद्युतप्रवाह चालू राहण्यासाठी द्रव्यातील संवाहक इलेक्ट्रॉनांच्या स्थिर जोडचा व्हाव्या लागतात. इलेक्ट्रॉनांवर एकाच प्रकारचा म्हणजे ऋण विद्युतभार असल्याने त्यांच्यात नैसर्गिक रीत्याच प्रतिसारण होत असते. म्हणून त्यांची जोडी बनण्यास साहाय्यक ठरणाऱ्या मध्यस्थाची गरज असते. बार्डीन, कूपर व श्रीफर यांनी मांडलेल्या आणि त्यांच्या नावांतील आद्याक्षरांवरून ज्याला बीसीएस सिद्धांत असे म्हणण्यात येते, त्या सिद्धांतानुसार फोनॉन हा असा मध्यस्थ मानला आहे. फोनॉन म्हणजे स्फटिक-जालका








तील आंदोलन किंवा ऊर्मी होय. या आंदोलनामार्फत संवाहक इलेक्ट्रॉन संयुग्मित होऊन त्यांच्या जोड्या बनतात, असे हा सिद्धांत मानतो. बार्डीन ही गोष्ट पुढीलप्रमाणे स्पष्ट करतात. '' प्रावस्थाबदलाने द्रव्य अतिसंवाहक बनते व येथे इलेक्ट्रॉन एका नव्या अवस्थेत एकत्रित होत असतात, अशी कल्पना करता येते.'' या अवस्थेत इलेक्ट्रॉनांच्या जोड्या निर्माण होऊन त्यांच्यात एक प्रकारची सांघिक शिस्त निर्माण होते.

निरपेक्ष शून्य तापमानाच्या जवळपास वरील बीसीएस सिद्धांत चांगला लागू पडतो. मात्र अधिक उच्च म्हणजे ४० के पेक्षा अधिक तापमानाला हा लागू पडण्यासाठी यात काही सुधारणा केल्या पाहिजेत अथवा हा सिद्धांत टाकून देऊन अतिसंवाहकतेमागील भौतिकीय यंत्रणांचा अन्य प्रकारे शोध घेतला पाहिजे म्हणजे नवीन सिद्धांत मांडला पाहिजे, असे काही भौतिकीविदांचे मत आहे. बार्डीन यांच्या मते त्यांचा सिद्धांत ४०के तापमानापर्यंत अतिसंवाहकतेचे स्पष्टीकरण देऊ शकतो; पण ९० के तापमानाला तो लागू पडणे शक्य वाटत नाही आणि त्याच्या स्पष्टीकरणासाठी नवीन यंत्रणेची गरज आहे, याबद्दल शंका नाही. श्रीफर यांच्या मते पडसे होण्याला जशी अनेक कारणे असू शकतात, त्याप्रमाणे अतिसंवाहकतेमागेही अनेक कारणे असू शकतील, असे आढळून येईल.

ऑक्साइडे सर्वसाधारणपणे अर्धसंवाहक अथवा निरोधक असतात. तथापि काही थोडीच ऑक्साइडे (उदाहरणार्थ, तांब्याची ही नवी ऑक्साइडे ) उच्च म्हणजे ७७ के पेक्षा अधिक तापमानाला अतिसंवाहक का होतात, याचे आश्चर्य वाटते. अशा उच्च तापमान अतिसंवाहकतेमागील यंत्रणा जाणून घेण्याची धडपड शास्त्रज्ञ करीत आहेत व त्यासाठी नवीन यंत्रणा शोधणे आवश्यक असल्याचे पुष्कळांना वाटते. त्यातूनच अधिक संक्रमण तापमानाची द्रव्ये तयार करण्याविषयीचे काही धागेदोरे हाती येऊन ती शोधण्यासही हातभार लागू शकेल, असा अंदाज करण्यात येतो. अशा अनेक उपपत्ती मांडण्यात आल्या असून त्यांपैकी काही पुढे दिल्या आहेत.

एप्रिल १९८७ च्या दुसऱ्या आठवड्यात अमेरिकन केमिकल सोसायटीची वासंतिक बैठक डेन्व्हर येथे झाली. तेव्हा या ऑक्साइडांच्या रसायनशास्त्राविषयीची चर्चा झाली. या बैठकीत उच्च तापमानाला अतिसंवाहकतेचे गुणधर्म तसेच अशा द्रव्यांच्या उत्पादनाची तंत्रे या गोष्टींचा धन-अवस्था रसायनशास्त्राच्या दृष्टीने मागोवा घेण्याचा प्रयत्न करण्यात आला. यामुळे ही बैठक महत्त्वाची होती, असे आर्थर स्लेट स्लाइट यांना वाटते. त्यांनी या द्रव्यांचा एक नवीन गुणधर्म शोधल्याचे नमूद केले आहे. तो असा आहे : या द्रव्यांमधील पूर्वीच्या निओबियमसारख्या आवश्यक मूलद्रव्याच्या अणूच्या बाहेरील कक्षकात एक वा दोन इलेक्ट्रॉन असतात. नवीन उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्यांतील तांबे या आवश्यक मूलद्रव्यात असे नऊ इलेक्टॉन आहेत. याचा अर्थ ज्यांचे बाहेरील कक्षक जवळजवळ रिकामेऐवजी जवळजवळ भरलेले आहे अशी ही नवी द्रव्ये आहेत. यावरून यांमध्ये प्रतिष्ठापन योग्य नवीन गट असावा असावा असे सूचित होते, असे त्यांचे मत आहे.

पी. डब्ल्यू. अँडरसन यांनी स्फटिकजालकाविषयीची उपपत्ती मांडली आहे. स्फटिकातील अणू वा अणुगटांच्या अवकाशातील मांडणीच्या त्रिमितीय आकृतिबंधाला स्फटिकजालक म्हणतात. हे जालक स्थिर असते म्हणजे त्याच्या हालचाली थांबलेल्या असतात. असे असले, तरी काही विशिष्ट स्फटिकरचनांमध्ये इलेक्ट्रॉनांच्या जोड्या होणे शक्य असल्याचे त्यांनी दाखवून दिले आहे. त्यांचे म्हणणे रास्त असल्यास या अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्यांमध्ये सर्वसाधारण म्हणजे १६ अणुमार असलेल्या ऑक्सिजनाच्या जागी जड म्हणजे १८ अणुभार असलेल्या ऑक्सिजनाचे अणू आले, तरी त्यांचे संक्रमण तापमान बदलायला नको.

या नवीन द्रव्यांच्या सूक्ष्मरचनेचे विश्लेषण करण्यात आले आहे. त्यावरून ही द्रव्ये उच्च तापमानाला अतिसंवाहक का होऊ शकतात, याविषयीचे काही धागेदोरे मिळतात. या संयुगांची रेणवीय रचना निश्चित करून त्यांचे मूलभूत एकक पेरोव्हस्काइट हे असल्याचे आढळले आहे. हे एकक तांब्याचे ऑक्साइड तसेच बेरियम व इट्रियम यांच्या स्तरांचे बनलेले असते. शिवाय या रचनेतील ऑक्सिजन अणूंची स्थिती असाधारण असून तिचा अतिसंवाहकतेशी महत्त्वपूर्ण संबंध असावा, असा अंदाज आहे. असमदिकता हे या रचनेचे दुसरे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. याचा अर्थ केवळ तांब्याच्या ऑक्साइडाच्या थरात संवहन होते पण दरम्यानच्या इतर दोन थरांत संवहन होत नाही. यावरून अतिसंवाहकता द्विमितीय प्रणालीत निर्माण होत अस-





त्याचे सूचित होते. काहींच्या मतानुसार अशा प्रणालींमध्ये इलेक्ट्रॉन व जालक यांच्यातील परस्परक्रियांमध्ये वाढ होऊन इलेक्ट्रॉन जोडचा बनू शकतात. आणि त्या सापेक्षतः उच्च तापमानाला टिकून राहू शकतात.

ही द्रव्ये अतिसंवाहक का होतात, हे अधिक चांगल्या प्रकारे समजून घेण्याचा प्रयत्न इतरही शास्त्रज्ञ करीत आहेत. पुष्कळ प्रयोगशाळांमध्ये इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शक, न्यूट्रॉनांच्या स्पंदमान शलाका, श्राव्यातीत ध्वनितरंग आणि क्ष-किरण यांच्या मदतीने या द्रव्यांची छायाचित्रे वा प्रतिमा मिळविण्यात आल्या आहेत. बेल प्ररोगशाळा व ॲरिझोना राज्य विद्यापीठ येथील वैज्ञानिकांनी इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शकाने घेतलेल्या छायाचित्रांमध्ये या संयुगांच्या स्फटिकी रचनेत विकृती ( दोष ) आढळल्या. या तुकडीचे नेते अब्बास और मझ्द म्हणतात, " या विकृतींमुळे काय घडते ते स्पष्ट झालेले नाही; पण त्यांमुळे काही खळबळजक प्रश्न उपस्थित होतात. परिपूर्ण ( निर्दोष ) द्रव्य हे अतिसंवाहक असते की नाही ? किंवा या विकृती अतिसंवाहक असतात का ? जर या विकृतीच अतिसंवाहक असल्याचे आढळले, तर मग त्यांचे नियमन करण्याची, त्यांची घनता (प्रमाण) वा दाटी वाढविण्याची व अशा विकृती द्रव्यामध्ये मुद्दाम आणण्याची अपेक्षा करता येईल. "

यांशिवाय या द्रव्यांच्या अतिसंवाहकतेविषयीच्या काही आणखी उपपत्ती लवकरच पुढे येतील अशी चिन्हे दिसत असून यांपैकी कोणती उपपत्ती साधार आहे, हे काळाच्या ओघातच निश्चित होईल.

## निर्मिती व वस्तू तयार करण्याचे प्रयत्न

उच्च तापमान अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्ये निसर्गात आढळत नाहीत. म्हणून ती कृत्रिम रीतीने बनवावी लागतात. त्यासाठी केकप्रमाणे यांचा कच्चा माल एकत्र मिसळून व नंतर तो भाजून ही तयार केली जातात. सामान्यतः यांच्या ०·५ ते २ सेंटिमीटर व्यासाच्या वड्या तयार करतात. अशा प्रकारे ही नवी ऑक्साइडे बनविणे हे तसे सापेक्षतः सोपे काम आहे. दोघेतिघे भौतिकीविद, रसायनशास्त्रज्ञ व तंत्रज्ञ एकत्र येऊन ही द्रव्ये बनवू शकतील, असा दावा करण्यात आला होता. आणि काही शाळांतील विद्यार्थ्यांनी खरोखरच ही द्रव्ये तयारही केली आहेत. ही द्रव्ये तयार करण्याच्या पुढील पद्धती आहेत.

१) बेसिक ऑक्साइडे व कार्बोनेटे ही यांची घटक द्रव्ये असून योग्य प्रमाणातील त्यांचे मिश्रण घेऊन त्याचे भट्टीमध्ये सुमारे १०००° सेल्शियस तापमानाला तापपिंडन करतात म्हणजे वितळण्याची क्रिया न होऊ देता चूर्णरूप द्रव्याचा घट्ट गोळा तयार करतात. अशा घनअवस्थेत या घटक द्रव्यांमध्ये रासायनिक विक्रिया होऊन अतिसंवाहक द्रव्य तयार होते. अशा तऱ्हेने मिळणारे द्रव्य पुनःपुन्हा दळून चूर्णरूप करतात व त्याचे परत तापपिंडन करतात. यामुळे एक प्रावस्था असलेले समांग (एकसारख्या गुणधर्माचे) द्रव्य मिळते. अथवा हे मिश्रण उच्च दाबाला ऑक्सिजन वायूत भाजतात. हवेऐवजी ऑक्सिजनात तापानुशीतन म्हणजे द्रव्य तापवून सावकाशपणे थंड केल्यास त्यात अधिक अतिसंवाहक वैशिष्टचे निर्माण झालेली आढळतात. बहुतेक संशोधक ही पद्धती वापरतात.

२) घटक धातूंच्या मिश्रधातूचे नियंत्रित उच्च तापमानाला ऑक्सिडीकरण म्हणजे ऑक्सिजनाशी संयोग करून अतिसंवाहक द्रव्य तयार करता येते. मात्र यामुळे समांग म्हणजे एकसारख्या गुणधर्माचे द्रव्य मिळत नाही व या पद्धतीला खर्चही जास्त येतो.

३) घटक ऑक्साइडांच्या विद्रावावर योग्य ती रासायनिक विक्रिया करून साका मिळवितात. या साक्यावर प्रथम उष्णतेचे व नंतर उष्णता व ऑक्सिजन यांचे संस्करण करून इच्छित द्रव्य मिळवतात. या पद्धतीने सर्वांत समांग असे द्रव्य मिळते. या द्रव्याची वैशिष्टचे नेहमीच्या प्रायोगिक तंत्रांनी ठरविण्यात येतात. त्यामुळे त्यांची स्फटिकरचना व ऑक्सिजनाचे प्रमाण ही कळतात. मात्र या पद्धतीने अशी द्रव्ये मोठ्या प्रमाणावर मिळविणे अवघड काम असून कालपरत्वे या द्रव्यांची वैशिष्टचे बदलतात, असे काही संशोधकांना आढळले आहे.

अशा तऱ्हेच्या डझनावारी संयोगांपैकी (मिश्रणांपैकी) एखाद्यापासून कोठी तापमानाला अतिसंवाहक असणारे द्रव्य मिळेल या आशेने त्यांची सरमिसळ करण्याच्या (या संशोधनाला ' ज्युलिया चाइल्ड संशोधन ' असे म्हणतात) नवीन पद्धती शोधण्यात येत आहेत. त्याकरिता अशा नमुन्यांवर क्ष-किरण व न्यूट्रॉन शलाका टाकण्यात येतात; हे नमुने चुंबकीय क्षेत्रात व श्राव्यातीत ध्वनि-आंदोलनात ठेवतात; त्यांचे काप घेण्यात येतात; त्यांना झिलई करण्यात येते;

अनुक्रमणिका

तापवून थंड करतात; त्यांचे चूर्ण वा वाफ करतात; हिऱ्याच्या शेगडयात ते चुरडण्यात येतात; शक्तिशाली विद्युतभार त्यांवर लावतात आणि हाडाचे चूर्ण करण्याएवढया दाबाखाली नमुने अपरिचित वायूत ठेवतात.

ही अतिसंवाहक मृत्तिकाद्रव्ये अत्यंत ठिसूळ असल्याने त्यांच्या तारा काढता येत नाहीत किंवा त्यांना हवे ते योग्य रूप वा आकार देण्यात अडचणी येतात. शिवाय या द्रव्यांपासून बनविलेल्या वस्तूंचे जोडकाम करणे ही गोष्टही अवघड आहे. कारण त्यातही अनेक अडचणी येतात. या द्रव्यांचे यांत्रिक गुणधर्म सोयीस्कर नसल्याने त्यांच्यावर यंत्रणाची कामे (उदाहरणार्थ, लेथवर करण्यात येणारी काही कामे) करणे अवघड जाते. या सर्व गोष्टींमुळे या द्रव्यांचा व्यवहारात वापर करून घेण्यात अनेक अडथळे आहेत. मात्र त्यांवर लवकरच मात करणे शक्य होईल, असे च्यू यांना वाटते; तर बेल प्रयोगशाळेतील रॉबर्ट लाउडीस असा अभिप्राय व्यक्त करतात : " मृत्तिका-उद्योगातील सर्वसाधारण तंत्रे वापरून उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्ये बनविता येऊ शकतात; पण त्यांना हवे ते रूप देण्यात अनेक अडचणी येतील. त्यामुळे त्यांच्या तारा वा तत्सम वस्तू बनविणे ही दूरची गोष्ट आहे. तरी त्याविषयीची स्वप्ने आपण पाहतोच. " तर रॉबर्ट जे. काव्हा यांचे म्हणणे असे आहे : हे काम अतिदीप्त नवताऱ्याच्या (ज्याची तेजस्विता अचानकपणे १ ते १० कोटीपट वाढते अशा ताऱ्याच्या) निरीक्षणापेक्षा रोमहर्षक आहे. खगोलभौतिकीविद अतिदीप्त नवताऱ्याचा (सुपरनोव्हाचा) स्फोट पाहू शकतात; परंतु त्या वेळी ती घटना घडून गेलेली असते. अतिसंवाहकतेमध्ये मात्र घटना अजून घडत आहेत. आणि तिच्या भौतिकीय अध्ययनास आता कोठे सुरुवात होत आहे. "

च्यू यांच्या अपेक्षेप्रमाणे असे यश दृष्टिपथात येत असल्याचे दिसत आहे. कारण जपान व अमेरिकेतील संशोधकांना या द्रव्यांना ओबडधोबड पण उपकरणांत वापरण्यायोग्य आकार देण्यात यश आले आहे. तसेच यांच्या बारीक, लवचीक तारा तयार करण्यात यश आल्याचा दावा काही संशोधकांनी केला आहे. अशी पटले अथवा फिती इलेक्ट्रॉनीय उपकरणांमध्ये, तर तारा विशेषकरून चुंबकासाठी व असे चुंबक कच्च्या रूपातील काही धातू वेगळे करण्यासाठी उपयुक्त ठरू शकतील. मात्र लॉस ॲलॉमॉस राष्ट्रीय प्रयोगशाळेतील जिम स्मिथ यांच्या मते या वस्तू म्हणजे केवळ दाबलेली चूर्णे असून त्यांना अधिक चांगले भाजून काचरूप दिले पाहिजे. निकेल-टिटॅनियम व निकेल-कथिल ही परंपरागत अतिसंवाहक द्रव्येही कठीण काचेसारखी असतात; मात्र ती तांब्यात जडविल्यास त्यांच्या तारा काढता येतात. नवीन मृत्तिकाद्रव्यांच्या बाबतीत मात्र असे प्रयत्न होत नाहीत, ते व्हायला हवेत.

इलेक्ट्रॉनीय मंडलांसाठी आवश्यक अशी पटले वा फिती स्टॅनफोर्ड विद्यापीठातील संशोधकांनी बनविल्या आहेत, इट्रियम–बेरियम–तांबे ऑक्साइड व लँथॅनम–स्ट्रॉंशियम–तांबे ऑक्साइड ही दोन द्रव्ये वापरून त्यांनी सुमारे ०·५ मायक्रोमीटर (१ मायक्रोमीटर म्हणजे मीटरचा दहा लाखावा भाग) जाडीचे पटल बनविले आहे. यासाठी त्यांना भौतिकीय बाष्प निक्षेपणाच्या तंत्रामधील अनुभव उपयोगी पडला. या तंत्रात प्रथम द्रव्याची वाफ करून नंतर ती आधारतलावर (सबस्ट्रेटवर) घनरूप होऊ वा साचू देतात. या तंत्राचे त्यांना एकस्व घ्यायचे असल्याने त्यांनी नेमकी पद्धती गुप्त राखली आहे. या द्रव्यांपैकी पहिल्या अतिसंवाहक द्रव्याचे बिंदु-स्पर्श जोड (वा संधी) म्हणजे पॉइंट कॉंटॅक्ट जंक्शन व सँडविच सुरंग जोड म्हणजे टनेलिंग जंक्शन या इलेक्ट्रॉनीय प्रयुक्त्या ७७ के तापमानाला चालू राहतील, असे यावरून सूचित होते.

त्यांनी तयार केलेल्या या इलेक्ट्रॉनीय प्रयुक्त्या संगणकांच्या ढलप्यांमध्ये (चिप्समध्ये) विद्युतप्रवाह नेणे व मंडले जोडणे यांसाठी लागणाऱ्या स्विचांच्या दृष्टीने आधारभूत ठरू शकतील. त्यामुळे जादा तापणे हा हल्लीच्या संगणकातील प्रमुख दोष दूर होईल व ढलप्यांवरचे घटक अधिक जवळजवळ बसविता येऊ शकतील. १९८७ साली मार्च महिन्याच्या दुसऱ्या आठवडयात अहारॉन कापिच्युलनिक यांनी पुढील भाकीत केले होते : या वर्षभरात कामचलाऊ (चालणारे) इलेक्ट्रॉनीय मंडल ते करू शकतील. अर्थात, याचा संगणकामध्ये उपयोग करून घेण्यासाठी अजून प्रगती होणे आवश्यक आहे.

या क्षेत्रात आघाडीवर राहण्यासाठी अमेरिकेने पुढील उपाययोजना केल्या आहेत : अर्गॉन नॅशनल लॅबोरेटरीमध्ये येत्या पाच वर्षांत (१९९२पर्यंत) ७७ के तापमानाला व्यवहारोपयोगी अतिसंवाहक वीजवाहक तार बनविण्याच्या दृष्टीने एक प्रकल्प सुरू केला आहे.

अनुक्रमणिका






याला ब्रुकहॅव्हन व ॲमीस येथील प्रयोगशाळांचे साहाय्य मिळणार आहे. याचे उद्दिष्ट सुमारे एकसप्तमांश इंच जाड व द्रवरूप नायट्रोजनाच्या तापमानाला सुमारे १०० अँपिअर वीजप्रवाह वाहून नेऊ शकणारी लवचीक तार बनविणे हे आहे. याशिवाय देशांतर्गत संस्थांमधील अतिसंवाहकतेविषयीच्या माहितीच्या देवाणघेवाणीत वाढ करण्यात येईल.

द सायंटिफिक अँड टेक्निकल इन्फर्मेशन नेटवर्क इंटरनॅशनलने 'सुपरकंडक्टर्स अपडेट' या नव्या नियत-कालिकाची घोषणा केली आहे. दर दोन आठवड्यांनी प्रसिद्ध होणाऱ्या या नियतकालिकात अतिसंवाहकते-विषयीच्या जगभरच्या संशोधनपर लेखांचा संक्षेपाने आढावा घेण्यात येणार आहे. कारण या विषयावर जगातील हजारो वैज्ञानिक सध्या संशोधन करीत आहेत. त्यांच्या दृष्टीने ही माहिती उपयुक्त ठरेल.

## संभाव्य उपयोग

उच्च व ऊष्म अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या सिद्धां-तांच्या बाबतीत गोंधळ असला, तरी त्यामुळे या द्रव्यांच्या संभाव्य व्यावहारिक उपयोगांविषयीच्या अंदाजाबाबती-तील स्पर्धेत खंड पडलेला नाही. या शतकातील ही सन-सनाटीची स्पर्धा १९८६ नंतर तीव्र झाली. या द्रव्यांचे मोठ्या प्रमाणात उत्पादन करून त्यांना योग्य आकार देणे जेव्हा शक्य होईल, तेव्हा त्यांचे अगणित उपयोग होऊ शकतील. या हाती येऊ शकणाऱ्या प्रचंड घबाडामुळे त्यांच्या उपयोगाच्या वर्णनास कोठून सुरुवात करावी, हेच कळेनासे झाले आहे. या बाबतीत काहींच्या कल्पने-नुसार अतिसंवाहकतेविषयीची तंत्रविद्या किंवा व्याव-हारिक उपयोगाची तंत्रे वरच्या दर्जाला न्यायला हवीत; तर काहींना अशी सीमान्त (काठावरची) तंत्र-विद्या फायदेशीर क्षेत्रात आणावी असे वाटते आणि इतर काहीजण या अतिसंवाहक द्रव्यांचे पूर्णपणे नवीन संभाव्य उपयोग वाढवावेत, या मताचे आहेत. अशा प्रकारे ऊर्जा, उच्च ऊर्जा भौतिकी, उद्योग, वाहतूक, वैद्यक, संशोधन व विकास, इलेक्ट्रॉनिकी, अवकाश-विज्ञान वगैरे अनेक क्षेत्रांमध्ये ही द्रव्ये वापरता येऊ शकतील.

कामर्लिंग-ऑनेस यांच्या काळापासूनच अतिसंवाहक द्रव्यांचे असंख्य उपयोग कल्पिण्यात आले आहेत. खुद्द कामर्लिंग-ऑनेस यांनीच खास अतिसंवाहक विद्युतचुंबक बनविण्याचा प्रयत्न केला होता; पण त्यांना यश आले नाही. नंतर मात्र मोठे चुंबकीय क्षेत्र (१०० किलो गाउस) निर्मिणारे शक्तिशाली विद्युतचुंबक बनविणे शक्य झाले व १९६०–८० या काळात मोठे अतिसंवाहक चुंबक प्रमाणभूत करण्यात आले ते प्रयोगशाळांत व उद्योगधंद्यांत वापरण्यात येऊ लागले. मात्र असे चुंबक तयार करणे खर्चाचे असल्याने ते फक्त महागड्या व लाभदायक ठिकाणीच वापरण्यात येतात. कमी संक्रमण तापमानामुळे त्यांचे उपयोग असे मर्यादित क्षेत्रापुरतेच करणे शक्य होते. अशा प्रकारे शास्त्रीय संशोधनासाठी लागणारी अतितीव्र चुंबकीय क्षेत्रे निर्मिण्यासाठी अति-संवाहक चुंबक वापरण्यात येतात. दृश्य वर्णपटातील तांबड्या रंगाच्या अलीकडचे म्हणजे अवरक्त किरण ओळखण्यासाठी असलेल्या बोलोमीटर नावाच्या ऊर्जा-दर्शक उपकरणात याचा वापर करण्यात येतो. हे अत्यंत सूक्ष्मग्राही साधन असून त्याच्या मदतीने पूर्ण अंधारात शत्रूच्या सैन्याचा व विशिष्ट युद्धसामग्रीचा शोध घेता येऊ शकतो. इलेक्ट्रॉन सूक्ष्मदर्शकाची विभेदनक्षमता वाढविण्यासाठी त्यातील विद्युतचुंबकाभोवती या अति-संवाहक तारांची वेष्टने वापरतात. ९० के संक्रमण तापमानाची अतिसंवाहक द्रव्ये बनविता येऊ लागली असून २४० ते ३०० संक्रमण तापमानाची अतिसंवाहक द्रव्ये बनविल्याचे दावे करण्यात येत आहेत. जसजसे हे तापमान वाढत जाईल, तसतसे या द्रव्यांचे उपयोग वाढत जातील. कोठी तापमानाला अतिसंवाहक अस-णाऱ्या द्रव्यांचा शोध आता दूर नाही असे पुष्कळ संशो-धकांना वाटते व येत्या ३ ते ५ वर्षांत ती सापडतील असा त्यांचा अंदाज आहे. असे झाले तर त्यांच्या-साठी द्रवरूप नायट्रोजन वापरण्याचीही गरज उरणार नाही आणि अतिसंवाहक द्रव्ये वापरणे हे अगदी सोपे व नित्याचे काम होईल.

अतिसंवाहकतेविषयीच्या तंत्राचा दर्जा वाढल्यावर ही द्रव्ये राक्षसी कणवेगवर्धकात (उदाहरणार्थ, सिंक्रो-ट्रॉन, सायक्लोट्रॉन) चांगलीच उपयुक्त ठरतील. सध्याच्या सर्वांत शक्तिशाली कणवेगवर्धकांत परंपरागत अतिसंवाहक विद्युतचुंबक वापरण्यात येतात. जर उच्च तापमान अतिसंवाहक चुंबक बनविता येऊ शकले, तर कणवेगवर्धकात वापरल्या जाणाऱ्या विद्युत-चुंबकाचे स्वरूप बदलेल व जादा चुंबकीय क्षेत्रही उपलब्ध होऊ शकेल. यामध्ये लवकर यश आल्यास



अनुक्रमणिका

नियोजित 'अतिसंवाहक महा-आघातकारी कणवेग-वर्धक' नावाच्या प्रचंड उपकरणाच्या उभारणीवर त्याचा फार मोठा परिणाम होईल, असे च्यू यांना वाटते. अशा तऱ्हेने वीज व द्रवरूप हीलियम यांवर होणाऱ्या खर्चात दरवर्षी कोटयवधी डॉलरची बचत होईल.

यामुळे हायड्रोजन अणूंचा संयोग घडवून आणण्याच्या तंत्रामध्ये मोठा बदल होईल. कारण अणुसंयोगाद्वारे मिळणाऱ्या ऊर्जेच्या बाबतीतही विद्युतचुंबक महत्त्वाचे असतात. ही ऊर्जा सूर्याच्या ऊर्जेप्रमाणे अणुसंयोगावर आधारलेली असते, अणुभंजनावर नव्हे. अनेक देशांमध्ये अणुसंयोगाची आशादायक प्रक्रिया विकसित करण्यात येत आहे. शक्तिशाली चुंबकीय क्षेत्र ही या प्रक्रियेची गुरुकिल्ली असून सध्या अशी क्षेत्रे परंपरागत अतिसंवाहक विद्युतचुंबकांच्या मदतीने निर्माण करण्यास खूप खर्च येतो. ज्याच्यामध्ये अणुसंयोगाची सुरुवात होण्यासाठी आवश्यक असलेल्या कोटयवधी अंश तापमानाला अणू एकत्र टिकू व चेपले जाऊ शकतात, असे एकमेव आवरण किंवा स्थिती म्हणजे ही क्षेत्रे होत. विशेषतः उच्च तापमान अतिसंवाहक चुंबकांमुळे अधिक तीव्र चुंबकीय क्षेत्रे कमी खर्चात निर्माण करणे शक्य होईल. आणि "अशा तऱ्हेने अणुसंयोगाद्वारे ऊर्जानिर्मिती ही गोष्ट शक्य कोटीतील व व्यावहारिक ठरण्यास मदत होईल', असे हॅरल्ड फर्थ म्हणतात. अणुसंयोगाद्वारे ऊर्जानिर्मिती करणाऱ्या अणुभट्टयांसाठी लागणाऱ्या अशा चुंबकांविषयीचे प्रयोग जपानमधील कियशू विद्यापीठात करण्यात येत आहेत.

विद्युतदाब बदलणारे रोहित्र हे साधन व एकात एक दंडगोलाकार विद्युतसंवाहक बसविलेली समाक्ष केबल यांच्यात अतिसंवाहक द्रव्यांचा वापर करून विजेचे प्रेषण दूरवर आणि कमी खर्चात करता येऊ शकेल. उच्च विद्युतदाबाच्या तांब्याच्या तारांमधून जाणाऱ्या विजेपैकी सुमारे २० टक्यांपर्यंत ऊर्जा ही विद्युतरोधाने निर्माण होणाऱ्या उष्णतेच्या रूपात वाया जात असते. तथापि जर वीज अतिसंवाहक केबलीद्वारे पाठविता येऊ शकली, तर एक किलोवॉट सेकंद एवढीही वीज वाया जाणार नाही व विजेची सुमारे १५ टक्के बचत होईल. परिणामी बहुधा ग्राहकांचे अब्जावधी डॉलर वाचतील. शिवाय निदान तत्त्वतः तरी एका संपूर्ण महानगरीच्या विजेच्या प्रेषणाच्या गरजांसाठी थोडयाच भूमिगत केबली पुरेशा ठरू शकतील आणि कमी विद्युतदाबाचा वीजप्रवाहही दूरवर पाठविता येईल. विजेची जनित्रे, वीज साठवावयाची साधने; दीर्घकाळ चालणाऱ्या विद्युत घटमाला, रात्रीसाठी सूर्याची ऊर्जा साठवून ठेवणारी साधने इत्यादी साधनांमध्ये अतिसंवाहक द्रव्यांचा वापर लाभदायक ठरू शकेल.

वैद्यकशास्त्रात, विशेषतः मऊ ऊतकांच्या प्रतिमा मिळविण्यासाठी चुंबकीय अनुस्पंदन प्रतिमाकण (एम आर आय– मॅग्नेटिक रेझोनन्स इमेजिंग) तंत्राचा वापर करणारी यंत्रे वापरली जातात. अतिसंवाहक चुंबक हे या यंत्रांमधील महत्त्वाचे घटक असतात. शक्तिशाली चुंबकीय क्षेत्राने शरीरातील अणूंची ओळीने मांडणी होते. नंतर रेडिओ तरंगांचा एक स्पंद क्षणकाल बाहेर लोटला जातो व अणू आपल्या मूळ स्थितीत येताना प्रारणाचे उत्सर्जन करतात. या प्रारणामुळे मऊ ऊतकाची तपशीलवार प्रतिमा (वा प्रतिबिंब) निर्माण होते. हल्लीची अशी ही यंत्रे ही प्रचंड म्हणजे ६ × ८ × १० फूट या आकारमानाची असतात.याचे मुख्य कारण म्हणजे यात थंड करणारा पदार्थ म्हणून द्रवरूप हीलियम वापरण्यात येतो व तो तसा ठेवण्यासाठी १ लाख डॉलर किंमतीची अवजड निरोधक यंत्रणा वापरावी लागते. शिवाय तो तसाच टिकवून ठेवण्याच्या व्यवस्थेवर सालीना ३० हजार डॉलर अधिक खर्च येत असतो. नव्या स्वस्त व सुटसुटीत अतिसंवाहक द्रव्यांमुळे हे तंत्र क्ष-किरण छायाचित्रणाच्या तंत्राएवढे सुलभ व स्वस्त होईल. अशा प्रकारे अखेरीस अशी अधिक छोटी, शक्तिशाली व स्वस्त यंत्रे पुष्कळ अधिक संख्येने उपलब्ध होऊ शकतील. अशी यंत्रे मेंदूमधील तसेच कर्करोगाच्या गाठींचे निदान करण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त ठरू शकतात.

अतिसंवाहक द्रव्याच्या तबकडीवर चुंबक तरंगत राहतो, हे या आधी पाहिले आहेच. यामुळे तरती प्रणाली उभारणे सुलभ होईल. ही प्रणाली अतिवेगवान तरत्या आगगाडयांप्रमाणेच जहाजे, विमाने व अवकाशयाने यांमध्येही वापरता येऊ शकेल. उच्च तापमान अतिसंवाहक चुंबक हे मॅग्लेव्ह नावाच्या वाहनांच्या दृष्टीने मोलाचे ठरू शकतील. मॅग्लेव्ह आगगाडया जपान व पश्चिम जर्मनीमध्ये विकसित करण्यात येत असून या आगगाड्या अशा चुंबकाने निर्माण झालेल्या चुंबकीय

(क्षेत्राच्या) गिरदीवरून म्हणजे जमिनीच्या किंचित वरून तरत्या रूपात अतिशय वेगाने धावू शकतात.

जपानमध्ये कोबे येथील मर्कंटाइल मरीन युनिव्हर्सिटीतील वैज्ञानिकांनी मॅग्लेव्ह जहाजाची कामचलाऊ प्रतिकृती तयारही केली आहे. या जहाजाची प्रचालन (चालविण्याची) यंत्रणा चुंबकावर आधारलेली आहे. योशिरो साजी या भौतिकीविदांनी जहाजावरील विद्युत-जनित्रावरून जहाजाच्या तळावर बसविलेल्या विद्युत-अग्रांमार्फत समुद्राच्या पाण्यात विद्युतप्रवाह पाठविण्याची व्यवस्था केली आहे. जहाजावर एक अतिसंवाहक चुंबक असून त्यामुळे शक्तिशाली चुंबकीय क्षेत्र निर्माण होते. विद्युतप्रवाहाद्वारे निर्माण झालेले विद्युतचुंबकीय क्षेत्र जसजसे या चुंबकाच्या क्षेत्राला विरुद्ध दिशेत ढकलते वा लोटते, तसतसे जहाज पुढे जाते. येत्या चार वर्षांमध्ये असे १०० टनी मॅग्शिप (चुंबक-जहाज) तयार करण्याची साजी यांची उमेद आहे. ते म्हणतात, "एकदा का आपण द्रवरूप हीलियमाच्या ऐवजी द्रवरूप नायट्रोजन वापरू शकलो की अशा जहाजाची साधनसामग्री सुसज्ज ठेवण्याची संपूर्ण प्रक्रियाच सोपी होईल आणि ही प्रगती खरोखरच विलक्षण ठरेल !"

या तऱ्हेची तरती प्रणाली विमाने व अवकाशयाने यांच्यामधील मार्गनिर्देशन (नौकानयन) यंत्रणेच्या दृष्टीने उपयुक्त असलेल्या निलंबन यंत्रणेत (उदाहरणार्थ, पायलॉन) मोलाची ठरू शकेल. कारण अंतरिक्ष प्रवासातील मार्गनिर्देशनयंत्रणेतील घूर्णी हा मुख्य घटक अतिसंवाहक चुंबकाने तरता ठेवून यंत्रणा अधिक बिनचूक करणे शक्य होईल.

संगणकासारख्या इलेक्ट्रॉनीय प्रयुक्त्यांमध्ये ट्रँझिस्टरऐवजी अतिजलदपणे कार्य करणारे अतिसंवाहक स्विच वापरले जाते. या स्विचांमधील तत्त्व १९७३ सालचे भौतिकीचे नोबेल पारितोषिकविजेते ब्रायन जोसेफसन यांनी शोधून काढल्यामुळे त्यांना जोसेफसन जंक्शन (जोड वा संधी) म्हणतात. ही स्विचे तयार करण्यासाठी अतीसंवाहक द्रव्यांचा छोट्या प्रमाणावर वापर केला जात आहेच. त्यांच्यामुळे जादा वेग व विजेची बचत हे फायदे होतात. मात्र सध्या असे अतिसंवाहक केवळ द्रवरूप हीलियमाच्या साहाय्यानेच कार्यरत (चालू) ठेवता येऊ शकतात. त्यामुळे तांत्रिक व आर्थिक कारणांमुळे आय बी एम (इंटरनॅशनल बिझनेस मशीन्स) या कंपनीने आपला या स्विचांचा प्रकल्प १९८३ सालीच सोडून दिला. परंतु तेथील एक वैज्ञानिक सॅंडेग फारीस यांनी ही कंपनी सोडून दिली व या तंत्रविद्येच्या वापराचा परवाना मिळवून हायप्रेस (इन्कार्पोरेटेड) कंपनी स्थापन केली. या कंपनीने आपले पहिले जोसेफसन जंक्शन उत्पादन बाजारातही आणले आहे. हे उत्पादन म्हणजे शीघ्र-गती आंदोलनदर्शक उपकरण आहे. फारीस म्हणतात, "ही नवीन अतिसंवाहक द्रव्ये अजून आदिम अवस्थेत आहेत. खर्च कमी करण्यासाठी व वेग वाढविण्यासाठी त्यांचा उपयोग करून घेण्यास आम्ही उत्सुक आहोत."

विद्युतरोधाने निर्माण होणारी ऊर्जा निर्माण न झाल्यास त्याचा संगणकाचे अभिकल्पन (आराखडा तयार करणे) व कार्यमान यांवर मोठा परिणाम होऊ शकेल. अधिकाधिक छोटे व वेगवान संगणक बनविण्याचा हव्यास न संपणारा आहे. त्यामुळे संगणक अभिकल्पक इलेक्ट्रॉनीय ढलप्यांवर जास्तीत जास्त मंडले दाटीवाटीने बसविण्याचे आणि अधिक छोट्या जागेत अधिकाधिक ढलप्या बसविण्याचे प्रयत्न करीत असतात; परंतु विद्युतरोधाने उत्पन्न होणाऱ्या उष्णतेमुळे यांवर मर्यादा पडतात. कारण जर असे घटक जास्त घट्टपणे वा जवळजवळ बसविलेले असतील, तर संगणकाच्या मंडलातील अगदी क्षुल्लक विद्युतप्रवाहानेही ते घटक खराब होण्यास पुरेशी उष्णता निर्माण होते. अशी उष्णता काढून बाहेर टाकण्यासाठी पंखे अथवा उत्सर्गनलिका नसतील, तर हल्लीचे व्यक्तिगत संगणक चालू राहणार नाहीत. व्यावहारिक पातळीवरचे अतिसंवाहक मंडलांचे जाळे उदयास येत असल्याने याहून अधिक लक्षणीय सूक्ष्मीकरण करण्याचा मार्ग संगणक अभिकल्पकांना उपलब्ध होऊ शकेल. स्टॅनफर्ड येथील संशोधकांनी अशा प्रकारे या नवीन अतिसंवाहक द्रव्यांचा सूक्ष्म इलेक्ट्रॉनीय मंडलांत वापर केला आहे. पण एकस्व घ्यायचे असल्याने हे कसे साध्य केले ते उघड करण्यास ते तयार नाहीत. अशा तऱ्हेने ही प्रगती अतिवेगवान व समांतर संगणकांच्या दृष्टीने अतिशय उपयुक्त ठरू शकेल.

वीजनिर्मितीच्या संदर्भात अतिसंवाहक द्रव्ये वापरण्याच्या कल्पनेवर वेस्टिंगहाऊस येथे शास्त्रज्ञ संशोधन करीत आहेत. अतिसंवाहकाचा वापर न करणाऱ्या हल्लीच्या विद्युतजनित्रांमध्ये तारा गुंडाळलेले घूर्णक (रोटर) चुंबकीय क्षेत्रात फिरवून वीज निर्माण केली जाते. अशा प्रत्येक नमुनेदार जनित्राने सुमारे ३००






मेगॅवॉट वीज निर्माण होते. हे चुंबकीय क्षेत्र जरी परंपरागत अतिसंवाहक चुंबकाद्वारे निर्माण करण्यात आले, तरी हे उत्पादन दुप्पट होईल, असे जॉन हुल्म यांचे मत आहे. नवीन उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्यांचे चुंबक वापरल्यास याहूनही जास्त लाभ होऊ शकेल. यामुळे विद्युतजनित्राची क्षमता वाढून त्याचे आकारमान कमी होईल. सध्या ज्या ज्या यंत्रणा विद्युतचुंबकत्वावर चालविण्यात येतात, त्यांच्यामध्येही असाच फायदा करून घेता येऊ शकेल; तसेच अनेक नवी यंत्रेही पुढे येण्याची शक्यता आहे.

आतापर्यंत पाहिलेले अतिसंवाहकांचे उपयोग हे उघडपणे दिसणारे असे आहेत. तथापि अतिसंवाहक-तेच्या सर्वांत विलक्षण उपयोगांविषयी अजून कल्पनाही करता आलेली नाही. म्हणून रॉबर्ट श्रीफर म्हणतात, "जेव्हा ट्रँझिस्टरचा शोध लागला तेव्हा ते निर्वातनलिकांची (व्हाल्व्ह) जागा घेतील हे आपल्याला माहीत होते. परंतु एके दिवशी त्यांच्या वापरातून लार्जस्केल इंटिग्रेटेड सर्किट ही इलेक्ट्रॉनीय मंडले अस्तित्वात येतील, याची कोणालाही कल्पना आलेली नव्हती." बेल प्रयोगशाळेतील काव्हा म्हणतात, "यातून आपली वाटचाल कोणीकडे होईल हे काही आपल्याला माहीत नाही. हे उत्साहवर्धक आहे आणि त्याच वेळी भयंकरही आहे, असा माझा तर्क आहे." तर जॉन बागलीन म्हणतात, "नवीन अतिसंवाहक द्रव्ये घेऊन आपण प्रत्येकजण जे करू इच्छितो, ते कसे करावे हा आपल्यापुढील प्रश्न नसून जीविषयी अजून कोणीच कल्पनाही केलेली नाही अशी एखादी गोष्ट आपण कशी करू शकू, हा खरा आपल्याला पडलेला प्रश्न आहे."

याचा अर्थ यापुढे येत आहेत ती दिवास्वप्ने. उदाहरणार्थ, भावी काळाची तरतूद म्हणून प्रचंड प्रमाणात वीज साठवून ठेवू शकणारी अतिसंवाहक द्रव्यांची भूमिगत राक्षसी वेटोळी; अतिसंवाहक विद्युत-संचायक (साठवण) प्रयुक्त्यांमधून वीजप्रवाह घेणाऱ्या छोट्या, शक्तिशाली विद्युतचलित्रांवर (मोटरींवर) चालणाऱ्या मोटारगाड्या वगैरे. अर्थात अशा काही दिवा-स्वप्नांकडेही काहीजण गंभीरपणे पाहू लागले आहेत. उदाहरणार्थ, फोर्ड कंपनीत विजेवर चालणाऱ्या मोटार-गाडीच्या शक्यतेचा पुनर्विचार करण्यासाठी एक संशोधन तुकडी नियुक्त करण्यात आली आहे. हे सर्व साध्य होण्या-साठी यांविषयीच्या तंत्रविद्या व तंत्रे प्रयोगशाळेपुरतीच मर्यादित राहून चालणार नाहीत; तर ती व्यावहारिक पातळीवरही आणता आली पाहिजेत; मात्र यात अनेक अडथळे असून या नवीन अतिसंवाहक द्रव्यांना इच्छित आकार देण्याची आवश्यकता हा एक प्रमुख अडथळा आहे. कारण धातूप्रमाणे मृतिकाद्रव्यांना सहजपणे आकार देता येत नाही व ती लवचीक नसून ठिसूळ असतात.

या अडचणीवरचा उपाय आय बी एम मधील संशोधकांपाशी असू शकेल. कारण मे १९८७च्या पहिल्या आठवड्यात त्यांनी ही द्रव्ये गुंतागुंतीच्या आकारांवर रंगाप्रमाणे फवारता येऊ शकतात व ती तेथे नंतर घनरूप होतात, असे सूचित केले होते. त्यांपैकी एक वैज्ञातिक जेरोम कुओम या तंत्राच्या बाबतीत पिटसवर्ग येथे झालेल्या अमेरिकेच्या मृत्तिकाउद्योग परिषदेत म्हणाले होते, "या अतिसंवाहक द्रव्यांपासून तयार करावयाच्या उपयुक्त वस्तूंच्या बनावटीची शक्यता या तंत्रामुळे कधी नव्हे एवढी जास्त वाढली आहे."

या नवीन मृत्तिकावस्तू उच्च तापमानाला अति-संवाहक राहात असल्या व तीव्र चुंबकीय क्षेत्रात तग धरू शकत असल्या, तरी त्यांची विद्युतप्रवाह वाहून नेण्याची क्षमता परंपरागत अतिसंवाहक वस्तूंच्या मानाने एक शतांश (दर चौरस सेंटिमीटरला १ अँपिअर) एवढीच आहे. म्हणजे घरगुती विजेच्या तारांपेक्षा ही क्षमता कमी आहे. कारण ही द्रव्ये समांग मिश्रणे नसून थरयुक्त रचना असलेली द्रव्ये आहेत. ही अधिक मूलभूत अडचण आहे. चुंबकीय क्षेत्रातून जाणाऱ्या विद्युतप्रवाहाच्या प्रमाणावर या क्षेत्राची तीव्रता (बल) अवलंबून असते. त्यामुळे यामधून तातडीने काही साध्य होण्यासारखे आहे, असे शास्त्रज्ञांना वाटत नाही. या संदर्भात जनरल इलेक्ट्रिक कंपनीतील रॉब यांचा पुढील इशारा लक्षणीय आहे : "आता आपल्याला आणखी एका अन्य शोधाची गरज आहे. या शोधामुळे उच्च तापमानाला विद्युत-प्रवाह वाहून नेण्याची उच्च क्षमता येण्याच्या दृष्टीने या तांब्याच्या नवीन ऑक्साइडांमध्ये सुधारणा होईल. मात्र असा शोध लागण्याची संभाव्यता ५० टक्केच आहे."

शेवटी अशा प्रगतीमध्ये मानवी स्वभाववैशिष्ट्यां-चाही अडथळा येत असतो. कारण आपल्या संशोधना-

विषयीच्या माहितीची परस्परांमध्ये देवाणघेवाण करण्याला वैज्ञानिक नाखूष असतात. उदाहरणार्थ, वुडस्टॉक येथील बैठकीत स्टॅनफोर्ड येथील संशोधकांनी प्रयोग दाखविल्यावर आपल्या संशोधनाविषयीचा तपशील सांगण्यास नकार दिला, तेव्हा काहीजण चिडले होते. एकस्वविषयक कायदे-सल्लागारांनी त्यांना त्यांच्या संशोधनाला पूर्णपणे कायदेशीर संरक्षण मिळेपर्यंत त्याविषयी शक्य तेवढे कमीत कमी सांगावे असा सल्ला दिला होता. अर्थात ही स्पर्धा एव्हाना कायदेशीर चर्चेपलीकडे जाऊन पोचली आहे. च्यू यांनी विक्रमी संक्रमण तापमानाचे द्रव्य मिळविल्याची घोषणा केल्यावर बर्कली येथील संशोधकही स्वतंत्र रीतीने त्याच अतिसंवाहक द्रव्यापर्यंत येऊन पोचले. त्यांनी तातडीने आपल्या या संशोधनाचा अहवाल 'फिजिकल लेटर्स' या नियतकालिकाकडे पाठविला. च्यू यांचा लेख छापून येण्यापूर्वी आपले संशोधन प्रसिद्ध व्हावे, अशी यामागील त्यांची अपेक्षा होती. कारण आपण च्यू यांची केवळ नक्कल केलेली नाही हे त्यांना प्रस्थापित करावयाचे होते.

वरीलपैकी काही भौतिकीय अडचणी दूर होत असल्याच्या काही सूचक घटना घडत आहेत. १९८० च्या मार्चमधील बैठकीत वैज्ञानिकांना उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्यांची वेटोळी व लवचिक पटले दाखविली होती. त्या महिन्याच्या शेवटी आय बी एम बेल प्रयोगशाळा, तोशिबा, अर्गॉन वगैरे ठिकाणी तारेएवढे बारीक मृत्तिकादंड तयार करण्यात येत होते. तोशिबा कंपनीचे होरिगामी म्हणतात, "हे शक्य असल्याची आम्हाला खात्री वाटत नव्हती. शेवटी जेव्हा आम्ही गुंडाळता वा वेटोळे करता येऊ शकेल अशी तार बनविली, तेव्हा या आमच्या पराक्रमाचे मूल्यमापन करण्याचे कोणतेच साधन आमच्याजवळ नव्हते." अर्गॉन येथील मृत्तिकावैज्ञानिक रॉजर पीपेल हे आता १० फूट लांबीची भट्टी बांधण्याचा विचार करीत आहेत; या भट्टीत दाबसारणाने (म्हणजे सोण्यातून चकलीची तार निघते तशी) या द्रव्याची तार बाहेर निघतानाच ती जवळजवळ अखंडपणे भाजली जाईल. ते म्हणतात, "ही तार केबलीच्या रूपात पीळ देण्याइतपत लवचीक असेल, असे वाटते. आणि केबल हा चुंबकीय वेटोळी व विद्युतप्रेषण तारा यांच्या निर्मितीसाठी आवश्यक असलेला घटक आहे. अशा दोन मैल लांब तारेच्या मदतीने आम्ही एक अतिसंवाहक चुंबक बनवू. आता शर्यत आहे ती व्यावहारिक साधन मिळविण्यासाठीची."

एप्रिल १९८७ मध्ये स्टॅनफोर्ड व आय बी एम येथील संशोधकांनी संगणकामध्ये वापरण्याच्या दृष्टीने महत्त्वाची असलेली या नव्या द्रव्यांची पटले बनविल्याची घोषणा केली. आय बी एम मधील संशोधक रॉबर्ट लैबोविट्झ व रॉजर कॉख यांनी बनविलेले असे पातळ पटल एका चालू गॅजेटमध्ये (साधनात) बसविल्याचे जाहीर केले. या गॅजेटला ते स्क्विड (SQUID–सुपरकंडक्टिंग क्वांटम इंटरफरन्स डिव्हाइस) म्हणतात. दुर्बल विद्युत संपर्काने दोन अतिसंवाहक जोडले की, जोसेफसन जंक्शन बनते; अतिसंवाहक तारेच्या वलयाला असे जंक्शन जोडले की हे स्क्विड साधन तयार होते. हे साधन अत्यल्प चुंबकीय क्षेत्राला संवेदनशील असून ते सामान्यपणे १० सेंटिमीटर व्यासाचे व ३० सेंटिमीटर लांब असते. हे साधन लांबी व तापमान यांतील बदल मोजण्यासाठी वापरता येते. अत्यंत दुर्बल चुंबकीय क्षेत्र मोजण्यासाठी, गुरुत्वीय तरंग व चुंबकीय एकध्रुव शोधण्यासाठी तसेच मेंदूच्या आतील सूक्ष्म विद्युतीय क्रियेने निर्माण होणारी सूक्ष्म चुंबकीय क्षेत्रे ओळखण्यासाठी ही साधने वापरण्यात येत आहेत. हेरगिरीसाठी, नवीन खनिजसाठे शोधून काढण्यासाठी तसेच जीवांमधील विद्युतचुंबकीय आविष्कार ससजून घेण्यासाठी या साधनांचा उपयोग करून घेता येईल. १०० मीटर खोलीवरच्या पाणबुडीशी संपर्क साधण्यासाठीही त्यांचा उपयोग करता येऊ शकेल, मात्र परंपरागत संदेशवहनाच्या पद्धतीत यासाठी लागणाऱ्या आकाशकाची (अँटेनाची) लांबी १०० मीटर एवढी असावी लागेल. नव्या उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्यांचा या साधनात वापर होऊ लागल्यावर त्यांचा अशा तऱ्हेने उपयोग करून घेणे अधिक सुलभ होईल.

## भारत

कोठी तापमानाला अतिसंवाहक असणाऱ्या द्रव्यांचा शोध घेऊन ती तयार करण्याच्या कामाला गती देणे; तसेच त्यांचे व्यावहारिक व तत्रवैज्ञानिक उपयोग करून घेणे यांविषयीचे जोमाचे प्रयत्न इतर देशांप्रमाणे भारतातही चालू आहेत. असे प्रयत्न नॅशनल फिजिकल लॅबोरेटरी (नवी दिल्ली), टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, भाभा ॲटॉमिक रिसर्च सेंटर




(मुंबई), इन्स्टिटयूट ऑफ सायन्स (बंगलूर), इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी (मद्रास), इंदिरा गांधी रिॲक्टर रिसर्च सेंटर (कल्पक्कम), साहा इन्स्टिटयूट ऑफ न्यूक्लिअर फिजिक्स (कलकत्ता), नॅशनल केमिकल लॅबोरेटरी (पुणे) इत्यादी ठिकाणी चालू असून भारतीय वैज्ञानिक या नवीन अतिसंवाहक द्रव्यांविषयीचे संशोधन उत्साहाने करीत आहेत. या संबंधात भारतात स्थूलपणे पुढील प्रकारचे संशोधन करण्यात येत आहे: १) अशा मृत्तिकाद्रव्यांमधील घटक मूलद्रव्य बदलून त्यांच्याविषयीची नवीन माहिती मिळविण्याचे प्रयत्न करणे; २) त्यांच्या तारा तयार करणे आणि ३) यांच्या पातळ पटलांचे उपयोग तसेच ऑक्साइड-लेपित सूक्ष्मतरंग पोकळ्या यांविषयीचे अनुसंधान करणे. उच्च तापमान अतिसंवाहक द्रव्यांचा वैज्ञानिक व तंत्रवैज्ञानिक विकास करून यासंबंधीच्या संशोधनात भारत इतर देशांच्या मागे पडणार नाही, अशी दक्षता घेण्यासाठी भारत सरकारने दोन उच्चाधिकार समित्या नेमल्या आहेत. यांपैकी एका समितीचे प्रमुख पंतप्रधान आहेत; तर पंतप्रधानांच्या वैज्ञानिक सल्लागार मंडळाचे अध्यक्ष सी. एन. आर. राव हे दुसऱ्या समितीचे प्रमुख आहेत. राव समितीच्या अलीकडेच नव्या दिल्लीत झालेल्या बैठकीमध्ये देशामधील विविध प्रयोगशाळांमधून अतिसवाहकतेविषयी सध्या चालू असलेल्या प्रायोगिक संशोधनांमधील प्रगतीचा आढावा घेण्यात आला.

भारतामधील संशोधकांच्या विविध गटांनी इट्रियम, बेरियम, तांबे ऑक्साइडांच्या प्रणालीतील अतिसंवाहक प्रावस्था स्वतंत्र रीतीने ओळखून काढली आहे. त्यांनी हूस्टन येथील तुकडीच्या संशोधनात सुधारणा करून ९२ के संक्रमण तापमानाचे एकच प्रावस्था असलेले संयुग मिळविले आहे. नवी दिल्ली येथील नॅशनल फिजिकल लॅबोरेटरीचे उपसंचालक ए. व्ही. नारळीकर यांच्या नेतृत्वाखाली एस. के आगरवाल, अनुराग गुप्ता एस. के. गुप्ता व बी. जयराम या संशोधकांची तुकडी या नवीन अतिसंवाहक द्रव्यांविषयी संशोधन करीत आहे. त्यांनी मार्च १९८७ मध्ये इट्रियम, बेरियम, तांबे ऑक्साइड प्रणालीतील ९० के संक्रमण तापमानाचे संयुग शोधून काढले; तर नंतर दोनच महिन्यांनी म्हणजे मे महिन्याच्या अखेरीस त्यांनी आणखी एका अतिसंवाहक मृतिकाद्रव्याचा [$Y(Ba, Sr)_2 Cu_3 O_8$] शोध लावल्याचे घोषित केले. हे द्रव्य त्यांनी सरळ ऑक्साइड-मिश्रण तंत्राने बनविले. या द्रव्याचा विद्युतरोध २३० के तापमानाला अचानकपणे घटतो व तो हळूहळू कमी होत जाऊन नाहीसा होतो. त्यांच्या मते या अतिसंवाहक द्रव्याची एक प्रावस्था २९९–३०० के (२६°–२७° सेल्शियस) म्हणजे जवळजवळ कोठी तापमानाला अतिसंवाहक राहते. या द्रव्यात अनेक प्रावस्था असल्याने त्यांनी यांच्या कित्येक वेगवेगळ्या नमुन्यांचे अध्ययन केले. प्रत्येक नमुन्यात १५° ते २६° सेल्शियस दरम्यानच्या तापमानाला अतिसंवाहकता आढळली. तसेच अशा नमुन्यांमधील २६° सेल्शियसला अतिसंवाहक असणाऱ्या प्रावस्थेचा वाटा मोठा असल्याचेही आढळले. म्हणून नारळीकर म्हणतात, "आतापर्यंत (जगात) आढळलेली ही सर्वांत उच्च तापमानाला अतिसंवाहक असणारी प्रावस्था आहे." अर्थात या त्यांनी ओळखून काढलेल्या प्रावस्थेची इतरांनी अजून खातरजमा करून घेतलेली नाही. तथापि ही प्रावस्था अलग करण्याचे या तुकडीचे प्रयत्न सध्या चालू आहेत. नारळीकर म्हणतात, "जेव्हा आम्ही ही प्रावस्था वेगळी करू तेव्हा खरोखरच कोठी तापमानाला अतिसंवाहक असणारी द्रव्ये आमच्यापाशी असतील."

फिलिप ॲंडरसन व गणपती भास्करन या प्रिन्स्टन (अमेरिका) विद्यापीठातील भौतिकीविदांनी अतिसंवाहकतेविषयीचा एक नवीन सिद्धांत सुचविला आहे. त्याच्या आधारे अतिसंवाहकतेविषयीच्या पुष्कळ निरीक्षणांचे स्पष्टीकरण देण्याचा त्यांचा मानस आहे आणि त्यासाठी ते बंगळूरच्या इन्स्टिटयूट ऑफ सायन्समधील वैज्ञानिकांनी सुचविलेल्या लॅंथॅनम, बेरियम, तांबे ऑक्साइड प्रणालीतील अतिसंवाहक संयुगाच्या चुंबकीय गुणधर्मांचा वापर करून घेणार आहेत.

अशा प्रकारे आलेली अतिसंवाहक द्रव्यांविषयीच्या प्रगतीची ही अभूतपूर्व लाट आता ओसरू लागली आहे की काय, असे वाटते आहे. कारण त्यांच्या वापराविषयीच्या अडचणी बऱ्याच आहेत. कदाचित आपले त्यांच्या उपयोगांविषयीचे संशोधन गुप्त राहावे असेही संशोधकांना आता वाटू लागले असण्याची शक्यता आहे. ते काहीही असले, तरी या द्रव्यांच्या संक्रमण तापमानात वर्षभरात झालेली ही प्रगती अभूतपूर्व आहे, हे निश्चित!

⊙ ⊙ ⊙





# माझा नाट्यप्रवास*

सतीश आळेकर

जन्म जरी नवी दिल्ली येथे झाला असला तरी माझे सर्व बालपण मात्र पुण्यातच गेले. पुण्यामध्ये शनिवार पेठेतील आळेकर वाड्यात आम्ही राहात होतो, अजूनही राहातो. जर काही संस्कार झाले असतील तर ते सर्व पुण्यातील वातावरणातीलच आहेत.

पहिल्यापासून शेवटपर्यंत मी डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा विद्यार्थी. शिक्षण नवीन मराठी शाळा, रमणबाग, फर्ग्युसन कॉलेज ते पुणे विद्यापीठ असे गाले. शाळेत असताना स्काउटमध्ये होतो. शिवाजी कुलात. लहानपणी नाटकाची वगैरे आवड नव्हती. रमणबागेत असताना एक-दोन वेळा रविवार-सकाळ नाट्यवाचन स्पर्धेच्या इंग्रजी नाट्यवाचनात भाग घेतला होता. शाळेत असताना मी जी नाटके पाहिली त्या नाटकाचे एक-दोन टप्पे आहेत. अगदी पूर्वी खूप लहानपणी सई परांजपे यांची नाटके बघितलेली आठवतात. उदाहरणार्थ, 'पत्तेनगरीत', पु. ल. देशपांडे ह्यांचं "वयं मोठं खोटं" इत्यादी. ही नाटके हल्लीच्या 'नटराज' म्हणजेच पूर्वीच्या 'हिन्दविजय' थिएटरमध्ये होत असत. नाटक बघायला लहान मुलांची खूपच गर्दी होत असे. त्यांतील मी एक प्रेक्षक होतो.

नवीन मराठी शाळेतून मी जेव्हा रमणबागेत आलो, त्या वेळी नाटक बघण्याचा दुसरा टप्पा आला असावा असे मला आता विचार करताना वाटते. सातवी-आठवीत असताना १९६१ साली पानशेतच्या महापुरात आमची शाळा पूरग्रस्त होती. शाळेचे बरेचसे सामान वाहून गेले होते. सर्वत्र चिखल झालेला होता. शाळेच्या मदतीसाठी म्हणून त्या वर्षी एक नाट्यमहोत्सव शाळेने आयोजित केला होता. या नाट्य महोत्सवात स्वयंसेवक म्हणून मला काम करावे लागले आणि माझ्या वाट्याला योगायोगाने कपडेपट आणि रंगपटाचे काम आले. त्यामुळे आम्हा चार-पाच विद्यार्थ्यांकडे कलाकारांना मदत करणे, त्यांच्या रंगभूषा, वेशभूषेच्या वेळेला काय हवे-नको ते बघणे अशी एकंदरीत पडद्यामागची व्यवस्था आली. या महोत्सवात जी नाटके झाली, त्यांतील दोन माझ्या स्मरणात कायमची राहिली आहेत. एक नाटक म्हणजे बाळ कोल्हटकरांचे "दुरितांचे तिमिर जावो" आणि दुसरे म्हणजे विद्याधर गोखल्यांचे "संगीत पंडितराज जगन्नाथ" हे नाटक. ही दोन्ही नाटके त्या काळात भयंकर पॉप्युलर होती. प्रसाद सावकार त्यावेळी नवीनच आलेले होते. त्यांचे "जय गंगे भागीरथी" हे नाट्यगीत खूप लोकप्रिय होते. दोन्ही नाटके "ललितकलादर्श" या संस्थेतर्फे केली जायची. या दोनही नाटकांचा माझ्यावर खूप भावनात्मक परिणाम झाला. तो परिणाम अजूनही मला जाणवतो.

तिसरा आणि सर्वांत महत्त्वाचा टप्पा म्हणजे रमणबागेमधील माझे शिक्षक. ते संघाचे कार्यकर्ते, मी संघाचा नाही. कारण आमच्या घरचे वातावरण भिन्न. माझे आजोळ कायम सत्ताधारी काँग्रेसकडे, तर आई-वडील साधना परिवाराशी संबंधित. म्हणजे राष्ट्रसेवा दल वगैरे. हे आमचे शिक्षक मी नवीन मराठी शाळेत असताना त्या शाळेत साधे कारकून होते. पण पुढे परीक्षा पास होऊन ते माध्यमिक शिक्षक झाले. त्यांना साहित्याची फार आवड होती. मुख्य म्हणजे अतिशय भान हरपून शिकवीत असत. ते आम्हाला हिन्दी शिकवायचे. संघाचे असले तरी म्हणायचे की, "शिक्षणाचे रेजिमेंटेशन

---

* सदर लेख 'माझा नाट्यप्रवास' ह्या वि. भा. देशपांडे संपादित असणाऱ्या पुस्तकासाठी लिहिला आहे. पुस्तक मेधा राजहंस ह्या लवकरच प्रसिद्ध करतील.

विस्तारभयामुळे प्रस्तुत लेखात 'महानिर्वाण' आणि 'महापूर' ह्या दोन नाटकांच्या संदर्भातच विशेष उल्लेख आहेत. ही दोन नाटके निवडण्याचे कारण 'महानिर्वाण' हे मी दिग्दर्शित केले; तर 'महापूर' मी दिग्दर्शित न केलेले नाटक.

अनुक्रमणिका






होता कामा नये." मधूनच गोष्टी सांगायचे आणि सुटी लागायच्या आधी पुस्तकांची यादी द्यायचे. म्हणायचे, वर्गात असलेल्या पुस्तकपेटीपेक्षा शाळेच्या तळघरात जाऊन ग्रंथालयात पुस्तके वाचीत जा. त्यांनी आम्हाला पु. ल. देशपांडे, रणजित देसाई, श्री. ना. पेंडसे इत्यादींची नावे सांगितली. शाळेत आठवीत असताना मला पक्के आठवते की, मी "स्वामी" ही कादंबरी मन लावून वाचण्याचा प्रयत्न केला होता. त्या वेळी ही कादंबरी फार लोकप्रिय होती. पण का कोण जाणे, माझ्या मनाला ती कादंबरी भिडली नाही. पण विरंगुळा म्हणून मी "स्वामी" कादंबरीतल्या "राजे" या शब्दाखाली रेघा मारल्या. राजे हा शब्द त्या कादंबरीत शेकडो वेळा आहे. मग त्या कादंबरीत सारखे कोण किती वेळा खाकरते, तेही मोजले. अशी मजा. शाळेच्या इमारतीत मोठा वार्ताफलक होता. त्यावर हे शिक्षक रोज महाभारतातील काही वचने लिहीत असत. शाळा सुटली की ते एकटेच लिहीत असायचे. शाळेच्या पश्चिमेस कबूतरखान्याचे मैदान आहे. संध्याकाळच्या तिरप्या प्रकाशात खडूने माखलेले हे आमचे काळसर शिक्षक तंद्री लागल्यागत लिहीत असायचे. कृ. गो. लवळेकर हे त्यांचे नाव. नुकतेच ते रमणबागेच्या प्राचार्यपदावरून निवृत्त झाले.

या शिक्षकांनी आमची एकदा लोणावळ्याला सहल काढली. आम्ही वाघदरी ते आय. एन. एस. शिवाजी असे चालत चाललो होतो. आमचे सर गोष्ट सांगत होते. त्या वेळी पुण्यात कॅपिटल थिएटरला दर रविवारी सकाळी बंगाली सिनेमे असायचे. आपण पाहिलेल्या सिनेमाची गोष्ट ते विलक्षण रंगवून सांगत होते. म्हणायचे, "हा सिनेमा बघायला गर्दी होत नाही; पण म्हणून तो वाईट नाही. असे प्रयत्न आपण समजावून घेतले पाहिजेत." तो सिनेमा 'सत्यजित रे' यांचा "पथेर पांचाली" हा होता. त्याची गोष्ट ते आम्हाला दृश्यात्मक पद्धतीने सांगत होते. नायक अपू हा त्याने चोरलेली माळ शेवाळाने भरलेल्या तलावात टाकतो. माळ पाण्यात पडताना शेवाळे बाजूला होते. माळ तळाशी बुडाल्यावर शेवाळे पूर्ववत होते. पण माळ टाकलेल्या जागी मात्र लहानशी खूण राहाते. हे शल्य कायम मनाशी ठेवून अपू लहानाचा मोठा झाला, वगैरे. ही गोष्ट नेहमीपेक्षा वेगळी म्हणून कायम माझ्या लक्षात राहिली.

असे शाळेतले वातावरण असतानाच घरी आई-वडील खूप पूर्वी पुण्यात होऊन गेलेल्या पृथ्वीराज कपूरांच्या "दिवार" व "दिवाण" या नाटकांची चर्चा करायचे. पुण्यात त्या वेळी होणाऱ्या रंगायन या संस्थेची नाटके ते नेहमी बघायचे आणि घरी त्याची चर्चा होत असे. त्यांनी "खुर्च्या" हे नाटक बघितले होते. "मी जिंकलो मी हरलो" पण बघितले होते. मी नववीत–दहावीत असताना पुण्यात पुरुषोत्तम करंडक एकांकिका स्पर्धा सुरू झाली. त्या बघायला माझे आई-वडील जायचे. त्या वेळी जब्बार पटेल यांची पहिली आलेली एकांकिका "वळी" या एकांकिकेवर घरी चर्चा झालेली मला आठवते. दहावीत असताना गोव्याला साहित्य संमेलन झाले होते. कै. काकासाहेब गाडगीळ हे माझ्या आईचे वडील. ते साताऱ्याच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. पुढचे संमेलन गोव्याला असल्याने मी माझ्या आजोबांबरोबर गोव्यातील साहित्य संमेलनाला गेलो होतो. त्या संमेलनात "संगीत मत्स्यगंधा" ह्या नाटकाचा प्रयोग मी पाहिला. तसेच कुमार गंधर्व यांचे गाणे प्रथम गोव्यात ऐकले. पुण्यात एकदा माझ्या आजोबांना "वाहतो ही दुर्वांची जुडी" या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला अध्यक्ष म्हणून बोलावले होते. त्यांच्याबरोबर मी ते नाटक बघायला गेलो. आमच्या आजोबांना ते नाटक काही आवडले नाही. अंक पडल्यावर भाषण करून ते निघून गेले. मी मात्र ते नाटक शेवटपर्यंत पाहिले. बघत असताना खूप रडायला येत होते.

मॅट्रिकनंतर मी फर्ग्युसन कॉलेजमध्ये आलो. त्यावेळी पुरुषोत्तम करंडक स्पर्धा पहिल्यांदाच पाहिली. त्या वेळी मी जब्बार पटेल यांनी बसविलेली बी. जे. मेडिकल कॉलेजची "पांच दिवस" नावाची एकांकिका पाहिली. ती एकांकिका मला खूप नवीन वाटली. स्टेजवर नेपथ्य काहीच नव्हते आणि मूकाभिनयाचा वापर त्यात केलेला होता. पार्श्वसंगीत ड्रमचे होते. त्या ड्रमच्या आवाजाने अगदी भारावून टाकणारे वातावरण स्टेजवर निर्माण व्हायचे. एकांकिकेत युद्धविरोधी विचार फार चांगले मांडले होते.

याच सुमारास माझ्या आजोळी आजी आणि आजोबा वारले. त्यामुळे आजोबांचे घर बंद झाले. मोठा मामा मुंबईत हायकोर्टात प्रॅक्टिस करायचा आणि

धाकटा मामा आर्मीत ऑफिसर. पाच मावश्या लग्न होऊन निघून गेलेल्या. शनिवार पेठेतल्या त्या मोठ्या वाड्यामध्ये कोणीतरी वसतीला हवे म्हणून राहण्यासाठी माझी नेमणूक झाली. जवळजवळ १७–१८ खोल्यांच्या घरात मी अगदी एकटा राहात असे. दर शनिवार रविवारी मुंबईत प्रॅक्टिस करणारा माझा मामा म्हणजे "विठ्ठलराव गाडगीळ" पुण्यातील त्याच्या अशिलांना भेटण्यासाठी यायचा. मामाला नाटकाची खूप आवड होती. येताना तो नेहमी मुंबईच्या ब्रिटिश कौन्सिल लायब्ररीमधून नाटकाची पुस्तके आणीत असे. त्याचबरोबर इंग्रजी नाटकांच्या काही ध्वनिमुद्रिकाही आणीत असे. टी. एस्. एलिअटचे 'कॉकटेल पार्टी' हे नाटक त्या वेळी मी ऐकले. प्रमुख भूमिका "सर जॉन गिलगूड्" यांची होती, प्रसिद्ध ब्रिटिश नट "रिचर्ड बर्टन" यांच्या आवाजात "डिलन् टॉमस"चे काव्य "अंडर दि मिल्कवूड" याची ध्वनिमुद्रिकादेखील ऐकायला मिळाली. दरम्यान मी इंटर सायन्सला असताना मामा राजकारणात पडला आणि कॉंग्रेसच्या तिकिटावर लोकसभेसाठी पुण्यातून उभा राहिला- मी त्याच्या प्रचारात खूप हौसेने भाग घेतला. पण मामा निवडणुकीत पराभूत झाला. श्री. एस्. एम्. जोशी विजयी झाले. ह्या खटाटोपात अभ्यासाकडे दुर्लक्ष होऊन माझी मेडिकलची अॅडमिशन गेली. बरोबरचे सर्व मित्र मेडिकल कॉलेजमध्ये निघून गेले मी एकटाच मागे उरलो. आता फर्ग्युसनमध्ये काय करावे असा प्रश्न होता. म्हणून बी. एस्सी. ला नाव घातले आणि संध्याकाळी मोकळ्या वेळेला कॉलेजच्या जिमखान्यात व्यायामास जायला लागलो. व्यायाम संपल्यावर परत येताना फर्ग्युसन कॉलेजच्या अॅम्फी थिएटरमध्ये "दिनूच्या सासूबाई राधाबाई" या फार्सची तालीम चालू असायची. आमचे केमिस्ट्रीचे शिक्षक "भालबा केळकर" हे नाटक बसवीत होते आणि माझ्या वर्गातला मित्र अरुण भट हा नाटकात दिनूचे मुख्य काम करीत होता, म्हणून मी तालीम बघायला जायचो. एक दिवस अरुण भट क्रिकेटच्या टीमचा कॅप्टन झाला म्हणून तो रोल सोडून निघून गेला. मी नियमित तालीम बघायला जात होतो म्हणून भालबा केळकर मला म्हणाले की, तूच काम कर. मी चकित झालो. यापूर्वी शाळेतली एक-दोन किरकोळ नाटके सोडली तर मी कधीही नाटकात काम केलेले नव्हते. भालबा केळकरांनी बराच आग्रह केल्यावर मी नाटकाच्या तालमीसाठी नियमित जायला लागलो.

या फार्सचा प्रयोग खूपच चांगला झाला. कॉलेजमधील विद्यार्थ्यांनी नाटकाला मनापासून दाद दिली. त्यानंतर लोकाग्रहास्तव आम्ही त्याचे आणखी दोनतीन प्रयोग केले. मग भालबा केळकरांनी मला विचारले की माझ्या संस्थेत येतोस का ? त्यांनी बोलाविले म्हणून मी आणि माझा मित्र समर नखाते भालबा केळकरांच्या 'प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन' ह्या नाट्यसंस्थेत जायला लागलो.

दरम्यान एक दिवस माधव वझे माझ्याकडे आला. तो त्या वेळी फर्ग्युसनच्या पुरुषोत्तम करंडक स्पर्धेसाठी एकांकिका बसवीत होता. विजय तेंडूलकरांचा 'ओळख' नावाचा तो दोनपात्री रेडिओ-प्ले होता. माधव हा रेडिओ-प्ले स्टेजवर बसवीत होता. त्यातील काम करणारा मुलगा आजारी पडला म्हणून मी आणि कल्पना भालेराव (आताची कल्पना देवळणकर) या मुलीने चार दिवसांच्या तालमीत हा प्रयोग सादर केला. पण त्याला दुसरे बक्षीस मिळाले. ह्या एकांकिकेचो तालीम चालू असताना मात्र वाटायला लागले की, नाटक हे फक्त भाषा आणि टाळ्यांसाठी नसून काहीतरी वेगळे आणि खूप गंभीर आहे.

पी. डी. ए. या संस्थेतले वातावरण मात्र मरगळलेले असे. "जोशी काय बोलतील ?" ह्या एका सामान्य नाटकाच्या तालमी त्या वेळी चालू होत्या. मला बॅकस्टेजचे काम मिळाले. त्याच सुमारास जब्बार पटेल ह्या संस्थत एक छोटा स्टडीग्रूप चालवायचा. त्या स्टडीग्रूपमध्ये मी जायला लागलो. यामध्ये रोज स्टॅनिस्लाव्हस्कीच्या "अॅन अॅक्टर प्रिपेअरस्" या पुस्तकाचे रोज एकेक प्रकरण वाचले जायचे आणि त्यावर आम्ही चर्चा करायचो. ह्या चर्चासत्रात विद्याधर वाटवे, रमेश मेढेकर, सुरेश बसाळे, अनिल जोगळेकर, रमेश टिळेकर, अंजली फडके, कल्पना भालेराव, मीनल चव्हाण (आता गोखले), मोहन आगाशे असे हजर असायचे. त्या वेळेला पी. डी. ए. मध्ये "तू वेडा कुंभार" ह्या लोकप्रिय नाटकाचे प्रयोग चालू होतेच. त्याचबरोबर जब्बार पटेल आणि अनिल जोगळेकर ह्या दोघांनी मिळून इंगमार बर्गमन ह्या स्वीडिश चित्रपट दिग्दर्शकाचा "दी मॅजिशियन" नावाचा स्क्रीन-प्ले मराठीत स्टेजवर बसविण्याचा प्रयत्न




चालविला होता. पुढे हा स्टेजवर सादरही झाला. हा प्रयोग यशस्वी होऊ शकला नाही. पण प्रयत्न मात्र अगदी वेगळा वाटला.

एक दिवस माझ्या मामाने मला जॉन मॉर्टीमर यांचे "दी जज्ज्" नावाचे नाटक वाचायला दिले. त्या नाटकाचा पहिला अंक वाचल्यानंतर मला अचानक वाटले की, आपण या इंग्रजी नाटकाची मराठीत एकांकिका करावी. म्हणून लिहायला लागलो. लिहीत असताना मूळचे नाटक बाजूलाच राहिले आणि 'जज्ज' नावाची एकांकिका लिहून झाली. साहजिकच ती नाटिका मामाला वाचून दाखविली. तो चकित झाला आणि म्हणाला, फार उत्तम जमली आहे, आता आणखी स्वत:चे असे लिही. ही नाटिका फर्ग्युसन मधील 'साहित्य सहकारा'च्या आमच्या मित्रांना घरी बोलावून वाचून दाखविली. पुढे ती "मनोहर" ह्या मासिकात प्रसिद्ध झाली. माझा मित्र समर नखाते याने फिल्म इन्स्टिटयूट-मध्ये तो दिग्दर्शनाचा विद्यार्थी असताना, या नाटिकेवर छोटा संवाद-चित्रपट राजाभाऊ नातूंना मुख्य भूमिका देऊन काढला होता. मी लिहिलेली अशी ही पहिलीच नाटिका. त्यानंतर आपण काही तरी नवे अवघड लिहावे, तसेच न कळणारे लिहावे म्हणजे आपल्याला "सत्य-कथा" या मासिकात एकांकिका पाठविता येईल असे वाटले. आणि मी "मेमरी" नावाची एक एकांकिका लिहिली. पी.डी.ए. त वाचून दाखविल्यानंतर सगळ्यांचे एकमत पडले की, एकांकिका अतिशय अवघड आहे. त्याचबरोबर न समजणारी आहे, म्हणून ती सत्यकथे-कडे पाठवून द्यावी हा सल्ला मानून मी ही नाटिका सत्यकथेचे संपादक राम पटवर्धन यांना पाठवून दिली. आणि आश्चर्य म्हणजे ती प्रसिद्ध झाली. अशा रीतीने माझ्या नावावर "सत्यकथे"मधली पहिली एकांकिका प्रसिद्ध झाली. पण लिहून समाधान होत नव्हते. आपण स्वत: रंगभूमीवर आपले लिखाण सादर केले पाहिजे आणि प्रेक्षकांच्या पसंतीची पावती घेतली पाहिजे हा विचार मनात अतिशय प्रबळ होता. कोणत्याही प्रकारचे वाङ्मयीन संस्कार कधी जाणीवपूर्वक माझ्यावर झाले नाहीत. फिल्म इन्स्टिटयूटमधल्या जगातील उत्तम चित्र-पट मात्र नियमित बघायला जात होतो. याच सुमारास म्हणजे १९६९ च्या आसपास जब्बारने पी.डी.ए. साठी विजय तेंडुलकरांचे "अशी पाखरे येती" हे नाटक केले. बॅकस्टेजचे काम अर्थातच माझ्याकडे आले. पुढे या नाटकाची प्रकाशयोजनादेखील मी करायचो. हे नाटक फारच लोकप्रिय झाले व एका वर्षात त्याचे १०० प्रयोग आम्ही केले. ह्या नाटकातील प्रयोगाच्या वातावरणात असतानाच मी "झुलता पूल" ही एकांकिका लिहिली आणि त्या वेळी नुकतीच ओळख झालेल्या विजय तेंडुलकरांकडे अभिप्रायासाठी पाठवून दिली. त्यांनी मुंबईहून जब्बारला फोन करून मी कोण वगैरे बारीक चौकशी केली आणि अभिनंदनाचे पत्र पाठविले. एक नवीन नाटककार तुमच्या संस्थेत आला आहे असे ते कौतुकाने सांगायचे. नंतर ती सत्यकथेकडे पाठविली. त्यांनी काही सूचना करून वाङ्मयीन संस्कारासाठी माझ्याकडे परत पाठवून दिली. "झुलता पूल" कशी सुचली याची आठवण फार गमतीशीर आहे. माझ्या आजोळच्या वाड्यात मी तेव्हा एकटा राहात होतो. संध्याकाळी गॅलरीत रहदारी न्याहाळीत बसे. रोज संध्याकाळी ६–३० च्या सुमारास एक देखणी मुलगी व्हायोलिन हातात घेऊन रस्त्यावरून जाताना दिसे. योगायोग असा की, ती मुलगी ज्या वेळी दारा-वरून जायची त्याचवेळी रस्त्याच्या समोर असणाऱ्या फ्लॅटमध्ये प्रेशर कुकरची शिट्टी वाजायची. असे दोन-तीन वेळा झाले आणि मला गंमत वाटली. ही मुलगी खुप श्रीमंत वगैरे असणार, ती मोठ्या बंगल्यात राहात असणार. असा विचार करून मध्यम वर्ग आणि उच्च मध्यम वर्ग यांतील फरक दाखविणाऱ्या एका तरुणाच्या भावविश्वाची कथा या एकांकिकेत सादर झाली.

यानंतर १९८० साली फर्ग्युसन महाविद्यालयातर्फे विजय तेंडुलकर यांची "काळोख" नावाची एकांकिका माधव वझे याने बसविली. त्यात मी काम केले आणि एकांकिकेला दुसरे पारितोषिक मिळाले. "अशी पाखरे येती" ह्या नाटकाचे प्रयोग चालूच होते. १९७० साली मी केमिस्ट्री घेऊन बी. एस्सी. पास झालो आणि पुणे विद्यापीठात एम. एस्सी. साठी (बायोकेमिस्ट्री) अॅड-मिशन घेतली. एम. एस्सी. ला असताना मी ठरविले की, सत्यकथेकडून परत आलेली माझी एकांकिका "झुलता पूल" आपण स्वत: पुरुषोत्तम करंडक स्पर्धे-साठी बसवायची. पुणे विद्यापीठात नाटकाचे वातावरण नव्हते. त्यामुळे इकडनं तिकडनं चार कलाकार गोळा करून "झुलता पूल" एकांकिकेचा प्रयोग पुरुषोत्तम करंडक स्पर्धेमध्ये केला. त्या वर्षी स्पर्धेमध्ये असणारी सर्व प्रथम पारितोषिके या एकांकिकेला मिळाली. नंतर








अनुक्रमणिका

ही एकांकिका "सत्यकथे"मध्ये प्रसिद्ध झाली. हा सगळा विचार आता करताना मला असे वाटते की, मी खूप लहान वयात लिहायला सुरुवात केली. मी एकोणीस-वीस वर्षांचा होईपर्यंत माझ्या चार एकांकिका सत्यकथेमध्ये येऊनदेखील गेलेल्या होत्या. त्या एकांकिकांचे प्रयोग कुठे कुठे व्हायला लागले होते. परंतु आपण लिहीत असलेल्या लिखाणाचा 'साहित्य' म्हणून विचार होत असतो ही भावना माझ्या मनात कधीच निर्माण झाली नाही. आपले लिखाण प्रयोगामधून प्रेक्षकांच्यापर्यंत पोहोचवायचे आणि त्यांनी दिलेली दाद आपल्याला आनंद देणारी आहे एवढाच विचार मनात असायचा. त्या वेळी लिहीत असताना कोणत्याही प्रकारचा विचार मनामध्ये जाणीवपूर्वक येत नसे. उदाहरणार्थ, अमूक एका विषयावर आपल्याला लिहायचे आहे किंवा अमूक एक व्यक्तिरेखा अमूक एका गुणदोषाचे प्रतीक आहे किंवा नाटकाचा गाभा आहे, तर आकृतिबंध असा होत जाणार आहे, असा कोणताच विचार जाणीवपूर्वक मनामध्ये नसे. डोक्यात विचारांची गर्दी उडायची आणि एका उत्स्फूर्ततेच्या ऊर्मीमध्ये आपण एकांकिका लिहून काढायची आणि ती वाचून दाखवायची एवढाच विचार मनात असे. ह्या एकांकिका लिहीत असताना त्या मला रंगभूमीवरच दिसत असत. म्हणजे पात्रे प्रवेश करतात ती आपल्या घरात प्रवेश करीत नसून रंगमंचावरच ती माझ्या डोळ्यांसमोर प्रकट व्हायची. नाटकाच्या प्रयोगाची जागा मला नेहमी एखाद्या घनफळासारखी (क्यूब) दिसते. या घनामध्ये माझी पात्रे आहेत आणि ती मी म्हणेन तशी रंगमंचावर हलणार आहेत. मला हवी तशी आकृतिबद्ध होणार आहेत. रंगभूमीविषयी कुठल्याही विशिष्ट विचाराची अशी जाणीव झालेली नव्हती. अशा अवस्थेत एम्. एस्सी.च्या पहिल्या वर्षाला १९७१ साली, वयाच्या २१ व्या वर्षी मी "मिकी आणि मेमसाहेब" हे माझे पहिले दोनअंकी नाटक लिहिले. याच वेळी "अशी पाखरें येती" या नाटकाचे प्रयोग मात्र जोरात चालू होते. त्याच सुमारास सत्यकथेच्या राम पटवर्धनांचे पत्र आले की, मौजेच्या दिवाळी अंकासाठी एखादी दीर्घ नाटिका असेल तर पाठवा. त्या वेळी मी "मिकी आणि मेमसाहेब" नुकतेच लिहून पूर्ण केले होते. त्याची एकदोन वाचने झाली होती. सर्वांना ते आवडत होते. परंतु खूप अवघड असे काही तरी मी लिहिले आहे असे सर्वांचे मत होते. ह्याच वेळी नाटकासाठी मृत्युविषयी काही घटना मनामध्ये घोळत होत्या. त्यावरून मी "महानिर्वाण" लिहून काढले. अंक न पाडता सलग असे नाटक सत्यकथेकडे पाठवून दिले. परंतु ते फार मोठे झाल्याकारणाने मौजेच्या दिवाळी अंकात छापून येऊ शकले नाही. म्हणून ते मौजेकडून माझ्याकडे परत आले. 'महानिर्वाण' तसेच माझ्याजवळ वर्षभर पडून राहिले.



दरम्यान पी.डी.ए.मध्ये जब्बारकडे विजय तेंडुलकरांचे "घाशीराम कोतवाल" हे नाटक आले होते. या नाटकाच्या तालमी जब्बारने १९७२ च्या ऑगस्ट महिन्यात सुरू केल्या. "झुलता पूल" या नाटिकेच्या यशामुळे पुणे-मुंबईच्या नाट्यवर्तुळात माझे थोडेफार नाव झाले होते. जब्बारने मला विनंती केली, की घाशीराम कोतवालचा 'सहायक दिग्दर्शक' हो आणि काम बघ. याच वेळेला पुण्याच्या फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये सत्यदेव दुबे याने एक नाट्यलेखन शिबीर घेतले. तरुण मराठी लेखक म्हणून माझ्याबरोबर महेश एलकुंचवार, अच्युत वझे, दिलीप खांडेकर, कै. शंकर शेष, गोविंद देशपांडे, सुहास तांबे, दिलीप जगताप या नाटककारांनी यात भाग घेतला. प्रत्येक नाटककाराने आपले नाटक वाचून दाखवायचे आणि त्या नाटकावर दिवसभर चर्चा करून सगळ्यांनी चिरफाड करायची करायची असा शिबिराचा कार्यक्रम होता. या शिबिरात वाचली गेलेली काही नाटके म्हणजे "उद्ध्वस्त धर्मशाळा", "वासनाकांड", 'मिकी आणि मेमसाहेब", "बीज" इत्यादी. मी भीत भीत "मिकी आणि मेमसाहेब" वाचून दाखविले. नाटक ऐकणाऱ्यांमध्ये विजय तेंडुलकर, अमोल पालेकर, सत्यदेव दुबे कुमुद मेहता, डॉ. श्रीराम लागू इत्यादि होते. "मिकी आणि मेमसाहेब" या नाटकावर इतक्या गांभीर्यपूर्वक चर्चा झाली, की अशी चर्चा मी प्रथमच ऐकत होतो. एका नाटकावर अशा पद्धतीने विचार होऊ शकतो याची जाणीव मला नव्यानेच होत होती. नाटकाचा विषय आणि त्याचा आकृतिबंध यांचा परस्परसंबंध, नाटकातील अनाकलनीयता इत्यादींवर प्रत्येकाने आपले मत मांडले आणि सर्वांनी मी एक नाटककार असल्याचे सर्टिफिकेट दिले. ह्या शिबिरापासून मी माझ्या लेखनाचा अधिक गांभीर्यपूर्वक विचार करू लागलो.

घाशीराम कोतवालच्या तालमींपासून नाटकावर पुढे होणार असलेल्या वादळाची चिन्हे दिसत होती.

परिणामी घाशीराम कोतवालच्या पहिल्या एकोणीस प्रयोगांनंतर पी. डी. ए. ही संस्था फुटली आणि २७ मार्च १९७३ रोजी 'थिएटर अॅकॅडमी' या संस्थेची माझ्या घराच्या गच्चीवर स्थापना झाली. हा दिवस 'जागतिक रंगभूमी दिन' म्हणून पाळला जातो. थिएडर अॅकॅडमी काढल्यानंतर साहजिकच त्या वर्षी स्पर्धेचे नाटक म्हणून "मिकी आणि मेमसाहेब" हे माझे पहिले नाटक मी दिग्दर्शित केले. त्याचे एकूण आठ प्रयोग झाले. अंतिम स्पर्धेपर्यंत ते नाटक गेले पण अंतिम स्पर्धेत यशस्वी होऊ शकले नाही. "घाशीराम कोतवाल" या नाटकाचे प्रयोग परत थिएटर अॅकॅडमी संस्थेतर्फे जोमाने चालू झाले आणि त्याचबरोबर "झुलता पूल" ह्या व इतर एकांकिकांचे नाव पुण्यात लोकांच्या घराघरांत जाऊन एका वर्षात जवळपास ८०–९० प्रयोग आम्ही केले. एखादी सहकारी गृहरचना संस्था बघायची आणि त्यांच्या अंगणात जाऊन प्रयोग करून यायचा. आमची संस्था नवीन असल्याने असे प्रयोग करून आमचा असा प्रेक्षकवर्ग बांधला जाईल तसेच कलाकारांना, प्रयोगसंख्या वाढल्याने आपोआपच, प्रशिक्षण मिळेल असा विचार तेव्हा होता.

पुढील वर्षीच्या स्पर्धेसाठी 'महानिर्वाण' नाटक सादर करावे असे ठरविले. महानिर्वाणच्या वाचनानंतर ज़ब्बार पटेलचे असे मत पडले, की हे नाटक दोघांचे आहे. त्यातला पहिला भाग हा बापाचा आहे तर दुसरा भाग हा त्याच्या मुलाच्या पिढीचा आहे आणि दोन्ही पिढींचा मृत्यूकडे बघण्याचा दृष्टिकोण वेगळा आहे. त्याने हे नाटक परत लिहून काढण्याची सूचना केली. मी परत नाटक लिहिले तेव्हा नाटकाचे दोन अंक झाले. हे नाटक आज गेली १३ वर्षे "थिएटर अॅकॅडमी" संस्थेतर्फे चालू आहे.

हे नाटक खूपच यशस्वी ठरले. त्यावर अनेक जणांनी अनेक वेळा ठिकठिकाणी आपल्या प्रतिक्रिया व्यक्त केलेल्या आहेत. पण "महानिर्वाण" हे नाटक सुचण्यामागची पार्श्वभूमी फार मजेशीर आहे. आमचे घर शनिवार पेठेत आहे. जवळच ओंकारेश्वराच्या मंदिराजवळ स्मशान होते. त्यामुळे दारावरून रोज जाणाऱ्या प्रेतयात्रा मी लहानपणापासून बघत असे. माझ्या आजोळी, माझे आजोबा आणि सावत्र आजी असे एकटेच रहात होते. आजोबा त्या वेळी पुणें विद्यापीठाचे कुलगुरू होते. एक दिवस घरात कोणी नसताना माझी सावत्र आजी स्टोव्ह पेटविताना पदर पेटून खूप भाजली. तिला ससूनमध्ये ठेवले होते. भाजल्यानंतर दहा-बारा दिवसांनीं जखम भरून न आल्याने आजी वारली. नुकताच मी त्या वेळी मॅट्रिक झालेलो होतो आणि आजोबा व आजी आजोळाच्या मोठ्या वाड्यात एकटेच असल्याने तेथे मधून मधून राहू लागलो होतो. सोबतीला माझी सर्वांत धाकटी मावशी तिलोत्तमा असायची.

ससूनमध्ये आजीचे निधन झाल्यावर तिला घरी आणले. मी अगदी जवळून बघितलेली ही पहिलीच प्रेतयात्रा. घरी आणल्यानंतर आजोबा विलक्षण अस्वस्थ होते. आजीला लवकर न्यावे म्हणून ते फार घाई करू लागले. "चला, चला लवकर चला", "फार घट्ट बांधू नका, स्मशान जवळच आहे." असे आजोबा अस्वस्थपणे पुटपुटत होते. मला कल्पना येईना की माझे आजोबा म्हणजे काकासाहेब गाडगीळ मंत्रिपद भूषविलेले पुण्याचे लोकप्रिय नेते, वयाच्या ७० व्या वर्षी इतके अस्वस्थ होऊन असे कसे बोलतात ? सर्व वातावरण अतिशय सुन्न झाले होते. आजीला ओंकारेश्वराच्या स्मशानात नेले आणि आजोबांनी तिला अग्नी दिला. मग मात्र ते शांत झाले. जवळच्याच एका दगडावर बसले आणि शेजारी कोणाला तरी म्हणाले, "बघितलंत, ही आधी भाजली आणि मग गेली; म्हणजे अग्नीने तिला दोन हप्त्याने नेले". हे वाक्य मात्र माझ्या डोक्यात कायम राहिले आणि या वाक्यावर मी विचार करीत असतानाच एक दिवस नाटक सुचले. पुढे ओंकारेश्वराचे स्मशान बंद होऊन "वैकुंठ" ही नवी स्मशानभूमी नव्या पेठेत सुरू झाली.

ओंकारेश्वर स्मशानभूमीबद्दल असे सांगतात की, चिमाजी अप्पाचा देह जाळल्यापासून येथे स्मशान सुरू झाले. म्हणजे पुण्यातील वृद्ध माणसांना असे वाटत असणार की आपण मेल्यावर ओंकारेश्वराजवळ नदीकाठी आपल्याला जाळणार. असा जणू काय हट्टच एखाद्याच्या मनात असेल. कोणी सांगावे ? शनिवार पेठेमध्ये तऱ्हेतऱ्हेची देवळे आणि मंगल कार्यालये यांची रेलचेल आहे. उन्हाळ्यात घराच्या गच्चीवर झोपत असताना कोपऱ्यावरच्या 'शनिवार मारुतीचा' उत्सव चालू व्हायचा. हा उत्सव हनुमानजयंती ते अक्षय तृतीया असा चालतो. ह्या उत्सवात पंधरा दिवस कीर्तने चालू

असत. रात्री डोळे मिटल्यावर इच्छा नसतानासुद्धा कर्कश लाऊडस्पीकरवरून ही कीर्तने ऐकावीच लागत असत. हळूहळू ही कीर्तने मला आवडायला लागली. आफळेबुवा, नेऊरगांवकरबुवा, कोपरगांवकरबुवा यांची कीर्तने मी ऐकत असे. या कीर्तनप्रकाराचा ताल-सूर, गोष्ट सांगण्याची पद्धत ही आपोआप मनात भिनली. "महानिर्वाण" नाटक लिहीत असताना कदाचित मी असा विचार केला असेल की, मेलेला माणूस आपली गोष्ट गद्यमय सांगणार नाही. कारण मनुष्य मेला की तो देवाजवळ गेला अशी आपली कल्पना असते. मग मेलेला मनुष्य जर समोरच्या प्रेक्षकांना गोष्ट सांगायला लागला तर तो आपली गोष्ट पद्यमय पद्धतीने सांगेल. मला माहीत असलेला पद्यमय गोष्ट सांगण्याचा प्रकार म्हणजेच कीर्तन. म्हणून महानिर्वाण नाटकाचा पहिला अंक व शेवट कीर्तन या प्रकाराने व्यक्त झाला असावा. मी "असावा" असे म्हणतो; कारण त्या वेळी म्हणजे १९७१ साली नाटक लिहीत असताना मी जाणीवपूर्वक असा कोणताच विचार केला नव्हता. नाटक लिहिले तेव्हा माझे वय २२ वर्षांचे होते. मृत्यू या विषयावर एक नाटक लिहायचे एवढाच विचार मनात होता. दुसऱ्या अंकातील डावीकडून तिसरा हा का आला ? हेही मला नीटसे सांगता येत नाही. मात्र आता विचार करीत असताना ह्या नाटकाचा गाभा जाणवतो. त्याचा आकृतिबंध जाणवतो, तसेच डावीकडून तिसऱ्याचा अर्थ काय असावा याचा मीही माझ्या पद्धतीने शोध घेतो. हे नाटक सगळे एक ब्लॅक कॉमेडी आहे असे म्हणतात. वास्तविक नाटक लिहीत असताना आपण ब्लॅक कॉमेडी लिहितोय की व्हाइट कॉमेडी लिहितोय याची जाणीव तेव्हा नव्हती. तसेच माझ्या भाषेत असलेला तिरकसपणा कसा आला यावरही नीट काही सांगता येत नाही. कदाचित पुणेरी वातावरणाचा हा परिणाम असावा. या नाटकाबरोबरच माझा मित्र आनंद मोडक हाही संगीतकार म्हणून पुढे आला. त्याने संगीत दिलेले महानिर्वाण हे पहिलेच नाटक. तसेच या माझ्या नाटकातील भाऊराव ही भूमिका चंद्रकांत काळे याने इतकी उत्तम वठविली की आज प्रयोगाला पंधरा वर्षे होऊन गेली तरी महानिर्वाण नाटकाच्या प्रयोगाचा ताजेपणा त्याच्या अभिनयामुळे तसाच टिकला. महानिर्वाण या नाटकाचे अनेकांनी अनेक पद्धतीने अर्थ लावले. कित्येक वेळा जे आपल्या डोक्यातही नाही ते आपल्या नाटकात आहे असे वाचून करमणूकही व्हायची. ग्रंथालीचे कुमार केतकर यांनी या नाटकाची समीक्षा अगदी वेगळ्या पद्धतीने केली. त्यात त्यांनी म्हटले की, महानिर्वाण हे विसाव्या शतकाचे महानिर्वाण आहे. एकूण सर्व समीक्षणाचा सूर मार्क्सवादी होता. लिहीत असताना मात्र असे काही डोक्यात नव्हते.

नाटक लिहीत असताना मला एवढेच वाटत होते की, एका मध्यमवर्गीय कुटुंबातील कर्ता पुरुष जर अचानक गेला तर त्या दुःखाच्या दोन पातळ्या असतील. मेलेल्या माणसाच्या रक्ताच्या नात्यातील जी माणसे असतील, म्हणजे या नाटकातील "नाना" हा मुलगा आणि "रमा" ही त्याची आई यांच्या दुःखाची तीव्रता आणि या कुटुंबाच्या बाहेर असणाऱ्या माणसांचा मृत्यूकडे बघण्याचा दृष्टिकोण यांत जमीनअस्मानाचा फरक असतो. "ज्याचे जळते त्याला कळते" ही म्हण का आली असावी" हे कुणी गेले म्हणजे समजते. ह्या प्रतिक्रियेमधील फरक जाणवून घेण्याचा प्रयत्न या नाटकात केलेला आहे. मृत्यूची गोष्ट हा मृत माणूस सांगत असल्यामुळे व तो वयस्क असल्यामुळे पहिल्या अंकाचे निवेदन हे पारंपरिक कीर्तनाच्या ढंगाने येते; तर दुसऱ्या अंकातील निवेदक हा मृत माणसाचा मुलगा असल्याने, दुसऱ्या अंकातील निवेदन हे आधुनिक पद्धतीच्या कीर्तनप्रकाराने केले जाते. कारण दुसऱ्या अंकात मुलगा हा कीर्तन या प्रकाराचा अर्थ आपल्या वयानुरूप लावतो आणि आपल्या वयाला साजेसे असे कीर्तन करतो. या नाटकाविषयी बरेच एक शंका अशी काढतात की पहिल्या अंकाच्या निवेदनाची पद्धत आणि दुसऱ्या अंकाच्या निवेदनाची पद्धत ही नाटकाच्या अंतिम परिणामास बाधक ठरत नाही का ? माझ्या मते ती अशी बाधक ठरत नाही. या नाटकाचा अंतिम परिणाम हा माझ्या मते वर्तुळात्मक आहे. सुरुवातीला कीर्तन हा प्रकार, नंतर मुलाचे आधुनिक कीर्तन आणि शेवटी पारंपरिक भैरवी यांनी हा वर्तुळाकार पूर्ण होतो. दोन अंकात निवेदनपद्धतीत फरक झाल्यामुळे अंतिम परिणामात बाधा येते असे मला वाटत नाही. कारण आपल्याकडे एक पिढी गेली म्हणजे दुसऱ्या पिढीकडे कर्तेपण येते आणि हे कर्तेपण बहुतेक वेळा पहिल्या पिढीच्या परंपरेशी काहीसे फटकून परंतु नीट विचार केल्यास परंपरेचाच नवीन अर्थ लावणारे असते. तसेच

अनुक्रमणिका

परिणामी घाशीराम कोतवालच्या पहिल्या एकोणीस प्रयोगांनंतर पी. डी. ए. ही संस्था फुटली आणि २७ मार्च १९७३ रोजी 'थिएटर ॲकॅडमी' या संस्थेची माझ्या घराच्या गच्चीवर स्थापना झाली. हा दिवस 'जागतिक रंगभूमी दिन' म्हणून पाळला जातो. थिएडर ॲकॅडमी काढल्यानंतर साहजिकच त्या वर्षी स्पर्धेचे नाटक म्हणून "मिकी आणि मेमसाहेब" हे माझे पहिले नाटक मी दिग्दर्शित केले. त्याचे एकूण आठ प्रयोग झाले. अंतिम स्पर्धेपर्यंत ते नाटक गेले पण अंतिम स्पर्धेत यशस्वी होऊ शकले नाही. "घाशीराम कोतवाल" या नाटकाचे प्रयोग परत थिएटर ॲकॅडमी संस्थेतर्फे जोमाने चालू झाले आणि त्याचबरोबर "झुलता पूल" ह्या व इतर एकांकिकांचे नाव पुण्यात लोकांच्या घराघरांत जाऊन एका वर्षात जवळपास ८०–९० प्रयोग आम्ही केले. एखादी सहकारी गृहरचना संस्था बघायची आणि त्यांच्या अंगणात जाऊन प्रयोग करून यायचा. आमची संस्था नवीन असल्याने असे प्रयोग करून आमचा असा प्रेक्षकवर्ग बांधला जाईल तसेच कलाकारांना, प्रयोगसंख्या वाढल्याने आपोआपच, प्रशिक्षण मिळेल असा विचार तेव्हा होता.

पुढील वर्षीच्या स्पर्धेसाठी 'महानिर्वाण' नाटक सादर करावे असे ठरविले. महानिर्वाणच्या वाचनानंतर जब्बार पटेलचे असे मत पडले, की हे नाटक दोघांचे आहे. त्यातला पहिला भाग हा बापाचा आहे तर दुसरा भाग हा त्याच्या मुलाच्या पिढीचा आहे आणि दोन्ही पिढींचा मृत्यूकडे बघण्याचा दृष्टिकोण वेगळा आहे. त्याने हे नाटक परत लिहून काढण्याची सूचना केली. मी परत नाटक लिहिले तेव्हा नाटकाचे दोन अंक झाले. हे नाटक आज गेली १३ वर्षे "थिएटर ॲकॅडमी" संस्थेतर्फे चालू आहे.

हे नाटक खूपच यशस्वी ठरले. त्यावर अनेक जणांनी अनेक वेळा ठिकठिकाणी आपल्या प्रतिक्रिया व्यक्त केलेल्या आहेत. पण "महानिर्वाण" हे नाटक सुचण्यामागची पार्श्वभूमी फार मजेशीर आहे. आमचे घर शनिवार पेठेत आहे. जवळच ओंकारेश्वराच्या मंदिराजवळ स्मशान होते. त्यामुळे दारावरून रोज जाणाऱ्या प्रेतयात्रा मी लहानपणापासून बघत असे. माझ्या आजोळी, माझे आजोबा आणि सावत्र आजी असे एकटेच रहात होते. आजोबा त्या वेळी पुणें विद्यापीठाचे कुलगुरू होते. एक दिवस घरात कोणी नसताना माझी सावत्र आजी स्टोव्ह पेटविताना पदर पेटून खूप भाजली. तिला ससूनमध्ये ठेवले होते. भाजल्यानंतर दहा-बारा दिवसांनीं जखम भरून न आल्याने आजी वारली. नुकताच मी त्या वेळी मॅट्रिक झालेलो होतो आणि आजोबा व आजी आजोळाच्या मोठ्या वाड्यात एकटेच असल्याने तेथे मधून मधून राहू लागलो होतो. सोबतीला माझी सर्वात धाकटी मावशी तिलोत्तमा असायची.

ससूनमध्ये आजीचे निधन झाल्यावर तिला घरी आणले. मी अगदी जवळून बघितलेली ही पहिलीच प्रेतयात्रा. घरी आणल्यानंतर आजोबा विलक्षण अस्वस्थ होते. आजीला लवकर न्यावे म्हणून ते फार घाई करू लागले. "चला, चला लवकर चला", "फार घट्ट बांधू नका, स्मशान जवळच आहे." असे आजोबा अस्वस्थपणे पुटपुटत होते. मला कल्पना येईना की माझे आजोबा म्हणजे काकासाहेब गाडगीळ मंत्रिपद भूषविलेले पुण्याचे लोकप्रिय नेते, वयाच्या ७० व्या वर्षी इतके अस्वस्थ होऊन असे कसे बोलतात ? सर्व वातावरण अतिशय सुन्न झाले होते. आजीला ओंकारेश्वराच्या स्मशानात नेले आणि आजोबांनी तिला अग्नी दिला. मग मात्र ते शांत झाले. जवळच्याच एका दगडावर बसले आणि शेजारी कोणाला तरी म्हणाले, "बघितलंत, ही आधी भाजली आणि मग गेली; म्हणजे अग्नीने तिला दोन हप्त्याने नेले". हे वाक्य मात्र माझ्या डोक्यात कायम राहिले आणि या वाक्यावर मी विचार करीत असतानाच एक दिवस नाटक सुचले. पुढे ओंकारेश्वराचे स्मशान बंद होऊन "वैकुंठ" ही नवी स्मशानभूमी नव्या पेठेत सुरू झाली.

ओंकारेश्वर स्मशानभूमीबद्दल असे सांगतात की, चिमाजी अप्पाचा देह जाळल्यापासून येथे स्मशान सुरू झाले. म्हणजे पुण्यातील वृद्ध माणसांना असे वाटत असणार की आपण मेल्यावर ओंकारेश्वराजवळ नदीकाठी आपल्याला जाळणार. असा जणू काय हट्टच एखाद्याच्या मनात असेल. कोणी सांगावे ? शनिवार पेठेमध्ये तऱ्हेतऱ्हेची देवळे आणि मंगल कार्यालये यांची रेलचेल आहे. उन्हाळ्यात घराच्या गच्चीवर झोपत असताना कोपऱ्यावरच्या 'शनिवार मारुतीचा' उत्सव चालू व्हायचा. हा उत्सव हनुमानजयंती ते अक्षय तृतीया असा चालतो. ह्या उत्सवात पंधरा दिवस कीर्तने चालू

असत. रात्री डोळे मिटल्यावर इच्छा नसतानासुद्धा कर्कश लाऊडस्पीकरवरून ही कीर्तने ऐकावीच लागत असत. हळूहळू ही कीर्तने मला आवडायला लागली. आफळेबुवा, नेऊरगांवकरबुवा, कोपरगांवकरबुवा यांची कीर्तने मी ऐकत असे. या कीर्तनप्रकाराचा ताल-सूर, गोष्ट सांगण्याची पद्धत ही आपोआप मनात भिनली. "महानिर्वाण" नाटक लिहीत असताना कदाचित मी असा विचार केला असेल की, मेलेला माणूस आपली गोष्ट गद्यमय सांगणार नाही. कारण मनुष्य मेला की तो देवाजवळ गेला अशी आपली कल्पना असते. मग मेलेला मनुष्य जर समोरच्या प्रेक्षकांना गोष्ट सांगायला लागला तर तो आपली गोष्ट पद्यमय पद्धतीने सांगेल. मला माहीत असलेला पद्यमय गोष्ट सांगण्याचा प्रकार म्हणजेच कीर्तन. म्हणून महानिर्वाण नाटकाचा पहिला अंक व शेवट कीर्तन या प्रकाराने व्यक्त झाला असावा. मी "असावा" असे म्हणतो; कारण त्या वेळी म्हणजे १९७१ साली नाटक लिहीत असताना मी जाणीवपूर्वक असा कोणताच विचार केला नव्हता. नाटक लिहिले तेव्हा माझे वय २२ वर्षांचे होते. मृत्यू या विषयावर एक नाटक लिहायचे एवढाच विचार मनात होता. दुसऱ्या अंकातील डावीकडून तिसरा हा का आला ? हेही मला नीटसे सांगता येत नाही. मात्र आता विचार करीत असताना ह्या नाटकाचा गाभा जाणवतो. त्याचा आकृतिबंध जाणवतो, तसेच डावीकडून तिसऱ्याचा अर्थ काय असावा याचा मोही माझ्या पद्धतीने शोध घेतो. हे नाटक सगळे एक ब्लॅक कॉमेडी आहे असे म्हणतात. वास्तविक नाटक लिहीत असताना आपण ब्लॅक कॉमेडी लिहितोय की व्हाइट कॉमेडी लिहितोय याची जाणीव तेव्हा नव्हती. तसेच माझ्या भाषेत असलेला तिरकसपणा कसा आला यावरही नीट काही सांगता येत नाही. कदाचित पुणेरी वातावरणाचा हा परिणाम असावा. या नाटकाबरोबरच माझा मित्र आनंद मोडक हाही संगीतकार म्हणून पुढे आला. त्याने संगीत दिलेले महानिर्वाण हे पहिलेच नाटक. तसेच या माझ्या नाटकातील भाऊराव ही भूमिका चंद्रकांत काळे याने इतकी उत्तम वठविली की आज प्रयोगाला पंधरा वर्षे होऊन गेली तरी महानिर्वाण नाटकाच्या प्रयोगाचा ताजेपणा त्याच्या अभिनयामुळे तसाच टिकला. महानिर्वाण या नाटकाचे अनेकांनी अनेक पद्धतीने अर्थ लावले. कित्येक वेळा जे आपल्या डोक्यातही नाही ते आपल्या नाटकात आहे असे वाचून करमणूकही व्हायची. ग्रंथालीचे कुमार केतकर यांनी या नाटकाची समीक्षा अगदी वेगळ्या पद्धतीने केली. त्यात त्यांनी म्हटले की, महानिर्वाण हे विसाव्या शतकाचे महानिर्वाण आहे. एकूण सर्व समीक्षणाचा सूर मार्क्सवादी होता. लिहीत असताना मात्र असे काही डोक्यात नव्हते.

नाटक लिहीत असताना मला एवढेच वाटत होते की, एका मध्यमवर्गीय कुटुंबातील कर्ता पुरुष जर अचानक गेला तर त्या दुःखाच्या दोन पातळ्या असतील. मेलेल्या माणसाच्या रक्ताच्या नात्यातील जी माणसे असतील, म्हणजे या नाटकातील "नाना" हा मुलगा आणि "रमा" ही त्याची आई यांच्या दुःखाची तीव्रता आणि या कुटुंबाच्या बाहेर असणाऱ्या माणसांचा मृत्यूकडे बघण्याचा दृष्टिकोण यांत जमीनअस्मानाचा फरक असतो. "ज्याचे जळते त्याला कळते" ही म्हण का आली असावी" हे कुणी गेले म्हणजे समजते. ह्या प्रतिक्रियेमधील फरक जाणवून घेण्याचा प्रयत्न या नाटकात केलेला आहे. मृत्यूची गोष्ट हा मृत माणूस सांगत असल्यामुळे व तो वयस्क असल्यामुळे पहिल्या अंकाचे निवेदन हे पारंपरिक कीर्तनाच्या ढंगाने येते; तर दुसऱ्या अंकातील निवेदक हा मृत माणसाचा मुलगा असल्याने, दुसऱ्या अंकातील निवेदन हे आधुनिक पद्धतीच्या कीर्तनप्रकाराने केले जाते. कारण दुसऱ्या अंकात मुलगा हा कीर्तन या प्रकाराचा अर्थ आपल्या वयानुरूप लावतो आणि आपल्या वयाला साजेसे असे कीर्तन करतो. या नाटकाविषयी बरेच एक शंका अशी काढतात की पहिल्या अंकाच्या निवेदनाची पद्धत आणि दुसऱ्या अंकाच्या निवेदनाची पद्धत ही नाटकाच्या अंतिम परिणामास बाधक ठरत नाही का ? माझ्या मते ती अशी बाधक ठरत नाही. या नाटकाचा अंतिम परिणाम हा माझ्या मते वर्तुळात्मक आहे. सुरुवातीला कीर्तन हा प्रकार, नंतर मुलाचे आधुनिक कीर्तन आणि शेवटी पारंपरिक भैरवी यांनी हा वर्तुळाकार पूर्ण होतो. दोन अंकात निवेदनपद्धतीत फरक झाल्यामुळे अंतिम परिणामात बाधा येते असे मला वाटत नाही. कारण आपल्याकडे एक पिढी गेली म्हणजे दुसऱ्या पिढीकडे कर्तेपण येते आणि हे कर्तेपण बहुतेक वेळा पहिल्या पिढीच्या परंपरेशी काहीसे फटकून परंतु नीट विचार केल्यास परंपरेचाच नवीन अर्थ लावणारे असते. तसेच

या नाटकाचे आहे. दुसऱ्या अंकात आईला दिसणारा डावीकडून तिसरा हा एक आभास आहे. मध्यमवर्गीय माणसांची अनेक स्वप्ने असतात. प्रत्येकजण आपल्या मगदुराप्रमाणे ती स्वप्ने पाहात असतो. अशी अनेक स्वप्ने ह्या नाटकातल्या रमेची असू शकतील. उदा., रमेला आपल्या नवऱ्याविषयी वाटणारे प्रेम किंवा द्वेष. नवरा सांगून येण्याच्या अगोदर कदाचित तिला आवडलेल्या मुलाकडून ती नाकारली गेलेली असेल. अशा अनेक मध्यमवर्गीय अतृप्त आकांक्षेचे प्रतीक म्हणून डावीकडून तिसरा दुसऱ्या अंकात येतो. ही कदाचित रमेची तिला दिसणारी मृत्यूविषयी वाटणारी भीतीदेखील असू शकते. या नाटकातील चाळकऱ्यांची प्रतिक्रिया मात्र फारच वरवरची, दुःखाचा पापुद्रा फार वरचा असल्याने, फार उथळ वाटते. मात्र आत मनामध्ये खोलवर शेजाऱ्याचा मृत्यू या घटनेविषयी वाटणारी अतिउदासीनता भरून आलेली दिसते. ही उदासीनता किंवा ही तटस्थता या नाटकात व्यंगात्मक पद्धतीने व्यक्त होते. नाना हा मुलगा दुसऱ्या अंकात आपल्या आईच्या अतृप्त आकांक्षांचा अर्थ लावण्याचा आपल्या परीने प्रयत्न करतो; पण अगोदरच त्यास उमजून येते की, ह्या आकांक्षा अत्यंत व्यक्तिगत स्वरूपाच्या असतात. एखाद्याच्या आकांक्षांमध्ये दुसरा, मग तो जरी प्रत्यक्ष त्या व्यक्तीचा मुलगा असेल तरी देखील उपराच ठरतो. आणि विरोधाभास म्हणून बापाला दिलेल्या अग्नीच्या ज्वाळांमध्ये त्याला आपल्या स्वतःच्या आकांक्षा दिसू लागतात. आणि तो म्हणतो की, वडिलांचा अचानक मृत्यू झाला म्हणून मनाचा पडदा वर गेल्यासारखे मनातले विचार रंगमंचावर आले. हे विचार वाईट आहेत, घाणेरडेसुद्धा आहेत माशीसारखे. अग्नी दिल्यावर मनाचा फुटलेला बांध पूर्ववत होईल, पडदा पडल्यासारखे होईल. माशीसारखे ओंगळ वाटणारे विचार मनातच राहतील. मृत देहाच्या इहलोकातील निर्जीव अस्तित्वाची शेवटची खूण म्हणजे कवटी फुटणे. त्याखेरीज पडदा पडणार नाही. मनाला बांध बसणार नाही. त्यानंतर मृदंगाच्या थापेवर कवटी फुटल्याचा भास होतो आणि नाटक संपते.

महानिर्वाण नाटकाच्या प्रयोगाबद्धल बोलायचे तर हे नाटक राज्य नाट्यस्पर्धेसाठी "थिएटर अॅकॅडमी" ने १९७४ साली केले. तालमी सुरु झाल्यापासून २५ दिवसांत नाटकाचा पहिला प्रयोग झाला. प्रमुख काम करणारा चंद्रकांत काळे हा मध्येच आजारी पडला. त्यामुळे नाटकाचा विचार, पेपरवर्क, त्यांचा अर्थ वगैरे विचार करायला अवसरच नव्हता. स्पर्धेची तारीख जवळ येत होती आणि आम्ही रात्री जागून तालमी करीत होतो. एकंदर पंचवीस कलाकार या नाटकात काम करतात. चंद्रकांत काळेला गायनाचे पण अंग असल्याने व तो मूळचा कोकणातला असल्याने त्याला कीर्तनी गायनाचा ढाचा चांगला माहीत होता. त्यामुळे काम करताना त्याला अजिबात अनोळखी वाटले नाही. या नाटकावर गेल्या दहा-बारा वर्षांत विविध बाजूंनी चालू असलेली चर्चा ऐकल्यानंतर एवढा विचार करून आम्ही हे नाटक फक्त पंचवीस दिवसात कसे बसविले याचे आश्चर्य वाटते.

या नाटकात अनेक चाळकरी आहेत. प्रयोग बसवीत असताना अशी काळजी घेतली होती, की सगळ्या चाळकऱ्यांनी मिळून कोरस म्हणताना एक पात्र वाटले पाहिजे. त्याचबरोबर कोरसमधील प्रत्येक चाळकऱ्याला आपले स्वतःचे अस्तित्वदेखील दिसले पाहिजे. लिहीत असताना चाळकऱ्यांना नावे दिली नव्हती. चाळकरी एक, दोन, तीन असे नंबर दिलेले आहेत. तालमीमध्ये इंप्रोव्हिनायझेशनने कलाकारांना सविस्तर माहिती दिल्यावर प्रत्येकाने विचार करून आपापले पात्र तयार केले. चाळकऱ्यांचे पोशाख देखील प्रत्येकाने आपापले निवडले आणि मला विचारून नक्की केले. अशा घाईत पंचवीस दिवसात हे नाटक तयार झाले. घाशीराम कोतवालचेदेखील काहीसे असेच आहे. आता सांगितले तर आश्चर्य वाटेल, की घाशीराम कोतवाल नाटकाची शेवटची दहा मिनिटे राज्य नाट्य स्पर्धेतील प्रयोगाच्या आदल्या रात्री पहाटे चार वाजता भरत नाट्यमंदिरात जब्बारने बसविली. तो जो शेवट आहे तोच तसाच अजून देखील प्रयोगात केला जातो. म्हणजे क्रियाशील कलाकाराच्या कलाकृतीत विचारपूर्वक केलेल्या कृतींचा किती वाटा असतो किंवा उत्स्फूर्ततेच्या ऊर्मीमध्ये झपाटल्याप्रमाणे केलेल्या कृतीचा संपूर्ण कलाकृतीत किती वाटा असतो हे ठरवता येणे कठीण आहे. सगळे रसायन एकजीव होऊन जमून येते आणि प्रयोग रंगतो एवढे मात्र खरे. प्रयोग रंगला की काम करणाऱ्या कलाकारांना आनंद वाटतो. यातूनच नाटकामध्ये टिकून राहण्याची जिद्द वाढते.

महानिर्वाण नाटकाचे प्रयोग सुरू झाल्यावर दुसऱ्या वर्षाची स्पर्धा (१९७५) तोंडाशीं आली होती. महानिर्वाण ह्या माझ्या नाटकात मुलाच्या भूमिकेवर डोळा असलेला आमचा कलाकार मित्र मोहन गोखले, त्याला मी महानिर्वाणमध्ये घेतले नाही म्हणून फार नाराज झाला. त्याने आग्रह धरला की पुढील वर्षी त्याने नाटक स्पर्धेत बसवावे आणि मीच ते लिहून द्यावे. दरम्यान मी "रहस्यमय तरुणी" नावाची एकांकिका लिहिली होती. त्या वेळी नागपूरचे कवी ग्रेस हे "संदर्भ" नावाचे सत्यकथेसारखे एक नियतकालिक काढीत असत. या नियतकालिकात ही एकांकिका प्रसिद्ध झाली. त्याचा एक प्रयोग थिएटर अॅकॅडमीनेच अनौपचारिकरीत्या केला. तो प्रयोग बघत असताना मला वाटले की हा विषय नाटकाचा आहे आणि मी लिहिण्याच्या घाईत तो विषय एकांकिकेत कोंबून बसविला आहे. प्रयोगानंतर झालेल्या चर्चेच्या वेळेला हा मुद्दा मी सर्वांना सांगितला. त्या वेळी आमचा चर्चेचा अड्डा हा टिळक स्मारक मंदिराच्या समोरच्या भागवतांच्या घरी असे. भागवतांची मुलगी रोहिणी (चिंगी) ही आमच्या संस्थेत काम करायची. त्या वेळी भागवतांच्या घरी झालेल्या चर्चेत मी मोहन गोखलेला म्हटले की, "या एकांकिकेचे खरे तर नाटकच करायला हवे होते." हा धागा उचलून त्याने आग्रह धरला की मी लगेच नाटक लिहावे आणि त्याने ते सादर करावे. लवकरच एकांकिकेकरून मी माझे दुसरे नाटक "महापूर" हे लिहून पूर्ण केले. त्याचे पहिले वाचन भागवतांच्या घरीच झाले त्या वाचनाला रोहिणी भागवत, कै. स्मिता पाटील, सुहास तांबे, राजीव डेंगळे, दिलीप मंगळवेढेकर, श्रीकांत गद्रे इत्यादी लोक हजर होते. "महापूर" पूर्ण होण्याच्या अगोदर मी एक दीर्घ नाटिका लिहून पूर्ण केली होती. ती मात्र अद्याप प्रयोग न होता तशीच पडून आहे.

या नाटिकेचे नाव "चाफा". कै. चिं. त्र्यं खानोलकर ह्यांच्या 'चाफा' या दीर्घ कथेचे हे नाट्यरूपांतर. "महाराष्ट्र टाइम्स" च्या दिवाळी अंकात ही दीर्घ कथा प्रसिद्ध झाली होती. ती वाचून जब्बार पटेलने आग्रह धरला, की या कथेचे नाटक होऊ शकेल. म्हणून मी नाट्यरूपांतर केले. परंतु आज गेली तेरा वर्षे हे नाट्यरूपांतर या ना त्या कारणाने रंगमंचावर येऊ शकले नाही. संहिता तशीच पडून आहे. ही संहिता खानोलकर हयात असताना त्यांना पुण्यातील एका लॉजवर वाचून दाखविली होती. मी केलेला शेवट त्यांना फक्त आवडला नाही. बाकी सर्व रूपांतर गाभ्याला धक्का न लावता झाले आहे असे त्यांचे मत पडले.

'महापूर' या नाटकाचे दिग्दर्शन मोहन गोखलेने केले. दुसऱ्याने बसविलेले हे माझे पहिलेच नाटक. नाटकाच्या तालमी चालू असताना मधूनमधून मी बघायला जायचो. माझ्या मते 'महापूर' हे नाटक म्हणजे एक वेगळ्या प्रकारची प्रेमकथा आहे. समाजवादी संस्कारांच्या पठडीतला एक तरुण पारंपरिक हिंदुत्वनिष्ठ संस्कारांतून वाढलेल्या मुलीच्या प्रेमात पडतो आणि तिने नकार दिल्यावर तो निराश होतो. ह्या परस्परविरुद्ध संस्कारांच्या पार्श्वभूमीवर या तरुणाच्या नैराश्याचा प्रवास (नर्व्हस ब्रेक डाऊन) सबंध नाटकात पहिल्यापासून शेवटपर्यंत दाखविलेला आहे. त्यात प्रश्न विचारणारा रुबाबदार इसम शेवटी मनोविकारतज्ज्ञ निघतो आणि नाटक संपते. सबंध नाटकात या तरुणाच्या नैराश्याची अनेक आवर्तने आहेत. या आवर्तनांमधून तरुणाचे तरुणीबद्दलचे असेक विचार तिरकस पद्धतीने व्यक्त होतात. नाटक खूप रोमँटिक आहे. त्याचबरोबर तरुणीबद्दलच्या रागाने धुमसणारा तरुण आपल्या मनातील तात्कालिक जहरी विचार अतिशय हिंसात्मक आग्रही पद्धतीने मांडत जातो. या नाटकाला एक स्वतःची लय आहे. ही लय प्रयोगात कशी असावी याचा अंदाज मला लिहीत असताना होता. मोहन गोखले ज्या पद्धतीने प्रयोग बसवीत होता ती पद्धत अतिशय विलोभनीय तर होतीच, परंतु त्यामध्ये त्या तरुणाकडे जरुरीपेक्षा जास्त महत्त्व जात होते. त्यामुळे लय कोणीतरी बिघडवतो आहे असे मला वाटत होते. पण हे माझे फार व्यक्तिगत, कदाचित एक लेखक-दिग्दर्शक म्हणून, मत होते. माझ्याशिवाय इतर कोणाला ते मत पटत नव्हते. या नाटकामध्ये तरुण अनेक वेळा तरुणीच्या आतड्याचा उल्लेख करतो. वस्तुत: एका तरुण मुलाने आपल्या एकेकाळच्या प्रेयसीचे पोट फाडून आतडे बाहेर काढावे हा विचार अतिशय हिंस्र व मॉर्बिड आहे. माझ्या मते या नाटकात ज्या ज्या वेळेला अशा मॉरबिडीटीचे विचार येतात त्या वेळी ते विचार केवळ शब्दांतूनच व्यक्त व्हावेत असे वाटत होते. या शब्दांमधून जे चित्र

अनुक्रमणिका

निर्माण होईल ते प्रेक्षकांनी आपल्या मनाने रंगवावे असे मला वाटत होते. पण मोहन गोखलेने ते नाटक बसवीत असताना या मॉरबिड विचारातील आतडे वगैरे गोष्टींना जरा जास्त महत्त्व दिले. त्याचबरोबर आतड्याचे प्रतीक म्हणून स्टेजवर सायकलची रबरी टयूब आणली आणि त्यातून काही हालचाली निर्माण केल्या. त्यामुळे या नाटकाच्या रोमँटिक आकृतिबंधाला धक्का लागला असे मला वाटले. स्पर्धेमध्ये हे नाटक खूपच गाजले. प्रयोग अतिशय चांगला व्हायचा. स्पर्धेत लेखनाची, अभिनयाची, दिग्दर्शनाची अनेक बक्षिसे याला मिळाली. नाटकाला गर्दी देखील बऱ्यापैकी होत होती. परंतु ३७–३८ प्रयोगांनंतर मोहन गोखले याने धंदेवाईक रंगभूमीवर नट व्हावे असे ठरविले. त्यामुळे साहजिकच या नाटकाकडे दुर्लक्ष होऊन त्याचे पुढील प्रयोग कमी होत गेले आणि नंतर बंद पडले.

नाटककाराच्या नाटचलेखनाच्या प्रवासाचा विस्तार करताना काही काही गोष्टी आपण ढोबळ मानाने ठरवीत असतो. काही असे म्हणतात की, तरुण वयात नाटक लिहीत असताना वयाच्या परिणामामुळे लेखकाची प्रतिभा जे लिहून घेते त्यामध्ये बऱ्याच प्रमाणात उत्स्फूर्ततेचा अंश जास्त असतो. पुरेसा विचार करण्याची तयारी होण्याच्या आधीच, तरुण वयाच्या उत्साहात ही उत्स्फूर्तता विचारांवर मात करून लेखकाला लेखनाची ऊर्मी देत असते. त्यामुळे सुरुवातीच्या लेखनात अनाकलनीयतेचा भाग जास्त असतो. नाटक ही सादर करण्याची कला असल्याने ह्या अनाकलनीयतेच्या आग्रहामुळे नाटकाचे रंजनात्मक मूल्य कमी होते. जसे वय वाढत जाते, लेखकाचे विचार, वाचन आणि अनुभव यांची व्याप्ती विस्तारित होत असते, तसतसे नाटककारांच्या लिखाणात अनाकलनीयतेचा स्तर कमी होऊन रंजनात्मक मूल्ये वाढत जातात. म्हणजेच लेखकाची नाटके लोकप्रियतेकडे झुकू लागतात आणि नाटककार एका ठराविक काळानंतर धंदेवाईक रंगभूमीवर लिहायला लागतो आणि नाटक हे त्याचे व्यावहारिक जगण्याचे कारण होते. नाटकापासून मिळणाऱ्या मानधनाची अपेक्षा आणि त्याचे नाटकाचे लेखन यांचा संबंध नाटकाच्या मांडणीत दिसायला लागतो. माझ्यापुरते बोलायचे झाले, तर प्रथमपासूनच काही वेगळे प्रयत्न न करता नाटकावर माझे व्यावहारिक जगणे अवलंबून ठेवलेले नाही. नाटकातून मिळणाऱ्या मानधनाचा आणि माझ्या व्यावहारिक जगण्याचा काहीही संबंध नाही. तसेच मी लिहिणाऱ्या नाटकांवर देखील कोणाचे जगणे अजून तरी अवलंबून नाही. त्यामुळे कोणाकरिता तरी आपण लिहिले पाहिजे किंवा अमुक एका मुदतीत लिखाण पूर्ण केले पाहिजे किंवा ते नाटक लोकप्रिय झालेच पाहिजे कारण त्यात कोणा एकाचे पैसे गुंतले आहेत किंवा त्या नाटकाच्या प्रयोगातून चारजणांना प्रयोगाचे मानधन मिळणार आहे असा ताण माझ्या लेखनावर कधीही अजूनपर्यंत तरी आला नाही. त्यामुळे मला सुचले तेव्हा किंवा मनाची तयारी पूर्ण होऊन लिहिलेच पाहिजे असे वाटेल तेव्हाच मी लिहीत गेलो आहे. दर वर्षी एखादे नाटक झालेच पाहिजे असा अट्टाहास नाही. त्यामुळे १९६८ साली वयाच्या १८ व्या वर्षी लिहायला सुरुवात करून देखील आज वयाच्या ३८ व्या वर्षी माझ्या नावावर फक्त ६–७ नाटके, एकांकिकेची २–३ पुस्तके, एक पटकथा आणि एक प्रयोग न झालेले "चाफा" हे नाटचरूपांतर एवढेच जमा आहे. आज देखील नाटक लिहायला बसल्यानंतर पूर्वनियोजित, ठरवून आखलेल्या गोष्टींवर अवलंबून राहण्यापेक्षा, लिहिण्याच्या क्षणी येणारी उत्स्फूर्तताच नाटक लिहून घेत असते. कित्येक गोष्टी आधी मनाशी योजलेल्या असतात, परंतु लिहीत असताना आणि लिहून झाल्यानंतर जाणवते, की आपण आधी विचार केलेल्या गोष्टी नाटकात न येता आयत्या वेळेला दुसऱ्याच गोष्टी किंवा आधी विचार केलेले सीन्स न येता नवीन सीन्स वेगळ्या पद्धतीने आपण लिहिलेले आहेत. नाटकाचा पहिला आराखडा पूर्ण झाल्यावर मी तो तसाच ठेवून देतो आणि काही दिवसांनी तो परत एकदा लिहून काढतो. अशा रीतीने दोन वेळा लिहून नाटक किंवा एकांकिका पूर्ण होत असते. नाटक अमूक एका पद्धतीतूनच सुचते असे काही ठरलेले नसते. महानिर्वाण नाटक कसे सुचले हे मागे सांगितलेच आहे. परंतु नाटक सुचण्याची, त्यावर विचार करण्याची आणि आयत्या वेळेला कागदावर नाटक लिहून काढण्याची प्रक्रिया मात्र मला वाटते अत्यंत खाजगी असते. त्यातला काही भाग सांगायचे म्हटले तरी बराच भाग हा हिमनगासारखा पाण्याखालीच राहतो. नाटककाराच्या कमीअधिक दर्जाच्या असणाऱ्या प्रतिभेवर माझा पूर्ण विश्वास आहे आणि माझ्या मनाची खोलवर कुठेतरी खात्री पटलेली आहे, की मी जन्मजात

अनुक्रमणिका

हाडाचा नाटककार आहे. माझ्या नाटकाच्या लेखनाचा दर्जा कसा असेल हे मला सांगता येणार नाही, परंतु मला जे सुचलेले आहे ते नाटक ह्या माध्यमातूनच उगम पावलेले आहे असा माझा विश्वास आहे. कदाचित हा अहंकार असेल, पण मनाची अशी खात्री पटली आहे एवढे मात्र खरे.

लेखक घडत असताना किंवा त्याचे वय वाढत असताना त्याचे वाचन, चिंतन आणि अनुभव ह्या गोष्टींचा त्याच्या लिखाणावर परिणाम होत असतोच. परंतु एखादा नाटककार घडत असताना जर तो एखाद्या नाटचसंस्थेच्या अंगणात वाढला तर त्याच्या लिखाणात प्रयोगक्षम नाटचमयता आपोआपच उतरते. माझे असे झाले आहे. या दृष्टीने 'थिएटर ॲकॅडमी' ह्या आमच्या संस्थेची स्थापना मला फार महत्त्वाची वाटते. कारण या संस्थेत काम करणारे कलाकार आणि मी आम्ही सगळे बरोबरच एकमेकांची चेष्टा करीत नाटक या वर्तुळात वाढलो. वास्तविक पी. डी. ए. मध्ये असताना ज्या वेळेला जब्बार पटेल आणि अनिल जोगळेकर हे स्टडीग्रूप चालवीत होते त्याच सुमारास खरे तर थिएटर ॲकॅडमीची स्थापना झाली असे आता म्हटले पाहिजे. कारण तेव्हापासूनच आपण काही सम विचारांचे कलाकार एकत्र जमलो आहोत आणि जवळपास एकाच वयाचे असल्यामुळे एकमेकांत क्रियाशील भावनात्मक नाते जडले जात आहे याची कल्पना त्या वेळेला येत होती. फक्त अधिकृत रीत्या संस्थेची स्थापना १९७३ साली झाली इतकेच. पी. डी. ए. मध्ये असतानाचा एक प्रसंग मला स्पष्ट आठवतो. मी "भजन" नावाची एक एकांकिका लिहिली होती. त्या वेळेला "अशी पाखरे येती" या नाटकाचे प्रयोग जोरात चालले होते. ही एकांकिका पी. डी. ए. संस्थेतर्फे माझा मित्र सुरेश बंसाळे दिग्दर्शित करीत होता. एकांकिका सत्यकथेमध्ये प्रसिद्ध झाली होती. हा प्रसंग १९६९ सालचा असेल. एक दिवस भालबा केळकरांनी या एकांकिकेची तालीम थांबवा असा आदेश तोंडी दिला. लेखक या नात्याने मी त्यांना कारण विचारले. त्यावर ते म्हणाले की, ही एकांकिका आणि त्यातले वातावरण त्यातली भाषा ही सदभिरुचीला सोडून आहे अशी तक्रार पी. डी. ए. मधील काही ज्येष्ठ कलाकारांनी त्यांच्याकडे केली. त्यावर मी भालबा केळकर यांना विचारले की, "तुम्ही ही एकांकिका वाचलीत का?" त्यावर ते उत्तरले की, "मी ती एकांकिका वाचण्याची गरज नाही. कारण मला माझे जे ज्येष्ठ सहकारी सांगतात त्यांच्या अभिरुचीवर माझा पूर्ण विश्वास आहे." मी त्यांच्याशी बराच वाद घातला पण त्यांनी आपला हट्ट सोडला नाही. एकांकिका जर झाली तर राजीनामा देईन असेही ते म्हणाले. मी फार संतापलो होतो, पण मी त्या सगळ्यांच्यापेक्षा फार लहान असल्याने सगळ्यांनी माझी समजूत घालून मला शांत केले. पण एकांकिका मात्र पी. डी. ए. मध्ये होऊ शकली नाही. अशा या प्रसंगामुळे खरे तर थिएटर ॲकॅडमीची स्थापना पूर्वीच मनामध्ये झालेली होती. त्यानंतर "घाशीराम कोतवाल"-बद्दलचे वादविवाद भारतभर गाजले. अत्यंत अवहेलनापूर्ण वातावरणातून आम्हा सगळ्या कलाकारांना जावे लागले. त्यामुळे सगळ्या कलाकारांमधील भावनात्मक नाते अधिकच गडद झाले. म्हणून "थिएटर ॲकॅडमी" हे व्यासपीठ मला फार महत्त्वाचे वाटते. कलाकार म्हणून आम्हाला जाणवलेल्या अवहेलनेतून हे व्यासपीठ आम्ही निर्माण केले आणि त्याची राखण गेली १४ वर्षे करतो आहोत. कारण मला किंवा माझ्यासारख्या कोणालाही जर मनाला येईल त्या पद्धतीने नाटचकलाकृती लोकांच्या पर्यंत पोचवायची असेल तर, असे एक व्यासपीठ हाताशी असले पाहिजे म्हणून थिएटर ॲकॅडमीची स्थापना झाली. इतकेच नव्हे तर गेली १४ वर्षे हे व्यासपीठ आर्थिकदृष्टचा स्वयंपूर्ण राखण्यासाठी "घाशीराम कोतवाल" या नंतर लोकप्रिय झालेल्या नाटकाचे प्रयोग संस्थेतले चाळीस कलाकार कोणत्याही प्रकारचे मानधन न घेता करीत आहेत. ज्या नाटकातून दर प्रयोगाचे हजारो रुपयांचे उत्पन्न होते, त्यातून मिळणाऱ्या फायद्यावर एक मोठी संस्था उभी राहते. इतकेच नव्हे तर त्यातून मिळणाऱ्या फायद्यावर संस्थेची इतर नाटके चालतात हा प्रकार खरोखरच विस्मयकारक आहे. चाळीसचे चाळीस कलाकार गेली १४ वर्षे कोणत्याही प्रकारचे मानधन न घेता प्रचंड उत्पन्न देणारे नाटक चालवितात आणि त्यातून एक नाटचसंस्था स्वयंपूर्ण करतात असा प्रकार सांगून खरा वाटत नाही. कित्येकांचे गैरसमज आहेत की, थिएटर ॲकॅडमीच्या नाटकांतून होणाऱ्या फायद्याचा भाग कलाकारांना मिळतो. परंतु हा गैरसमज आहे. कोणत्याही तऱ्हेचे मानधन संस्थेच्या कुठल्याही कलाकाराला अजनपर्यंत तरी दिले जात नाही. तरीदेखील गेल्या

अनुक्रमणिका

१४ वर्षात १५–१६ नाटकांचे एक हजारावर नाटच-प्रयोग देशात आणि परदेशात संस्थेने केले आहेत. या वातावरणातच माझ्यासारखा लेखक नाटचमय झाला. हीं गोष्ट नवी आहे अशातला भाग नाही. आपल्या परंपरागत नाटकांचे लेखकदेखील कोणत्या ना कोणत्या नाटचसंस्थेशी संबंधित राहिलेले आहेत. म्हणून त्याचा त्यांच्या नाटचलेखनाला खूप फायदा झालेला आहे. त्या दृष्टीने "थिएटर अॅकॅडमी" ह्या व्यासपीठाचा आणि कलाकारांचा मी सदैव ऋणी राहीन.

दुसरी गोष्ट नाटककाराला नेहमी विचारली जाते की, त्याच्या नाटचलेखनावर कोणाकोणा देशी व परदेशी लेखकांचे संस्कार आहेत ? माझ्या नाटचलेखनावर कुठल्या लेखकांचे संस्कार आहेत याबद्दल जाणकार ठरवतीलच. परंतु लिहू लागल्यानंतर दोन–तीन नाटकांचा आणि काही कलाकारांचा, काही पाहिलेल्या चित्रपटांचा मात्र जरूर उल्लेख केला पाहिजे. १९६७–६८ साली मी नुकताच लिहायला लागल्यावर कै. प्रभाकर पाध्ये यांच्या "सेंटर फॉर इंडियन राइटर्स"-च्या पुण्याच्या शाखेतर्फे फिल्म इन्स्टिटयूटमध्ये फिल्म अॅप्रिसिएशनचा एक अभ्यासवर्ग आयोजित केला होता. हा अभ्यासवर्ग महाविद्यालयातील कलाकारांसाठी मर्यादित होता. फर्ग्युसन महाविद्यालयातर्फे मी ह्या अभ्यासवर्गात दाखल झालो आणि या निमित्ताने जागतिक पातळीवरच्या उत्तमोत्तम चित्रपटांची प्रथमच माहिती झाली. सत्यजित रे यांची 'ट्रियॉलॉजी' "पथेर पांचाली", "अपूर संसार" आणि "अपराजितो" हे तीन चित्रपट, इंगमार बर्गमन ह्या स्वीडिश दिग्दर्शकाचे "वाइल्ड स्ट्रॉबेरीज" "सेवन्थ सील," "थ्रू अ ग्लास डार्कली" हे चित्रपट, कुरोसोवाचा "थ्रोन ऑफ ब्लड", "राशोमन", रोमन पोलान्स्कीचा "नाइफ इन वॉटर," तारकोव्हस्कीचा "सोलॅरीस", कोझीनसेवचा "हॅम्लेट", यांचो या हंगेरियन दिग्दर्शकाचा "अग्नेस दी" हा चित्रपट कशा अनेक चित्रपटांचे दालन खुले झाले. त्या वातावरणाचा माझ्यावर बराच परिणाम झाला. त्याचा परिणाम म्हणून मी फिल्म इन्स्टिटयूटमध्ये सिनेफोटोग्राफीच्या अभ्यासक्रमासाठी अर्जदेखील केला होता. परंतु तो नामंजूर करण्यात आला. ह्या अभ्यासवर्गानंतर लगेचच पुण्याच्या मॅक्सम्यूलर भवन ह्या संस्थेतर्फे "यंग जर्मन फिल्म फेस्टिवल" हा महोत्सव अयोजित करण्यांत आला होता. ह्या महोत्सवात पी. डी. ए. च्या स्टडीग्रूपचे आम्ही सर्वजण नियमाने जात होतो. पश्चिम जर्मनीच्या तरुण चित्रपट दिग्दर्शकांच्या चित्रपटांचा हा महोत्सव होता. त्यानंतर तेंडुलकरांचे "शांतता, कोर्ट चालू आहे" आहे या नाटकाचा प्रयोग पुण्याला मी दोन वेळा पाहिला. त्या लोकप्रिय, लोकविलक्षण प्रयोगाचा, त्यातील सतीश दुभाषी आणि सुलभा देशपांडे ह्या दोघांच्या कामाचा माझ्यावर खूप परिणाम झाला. परंतु पाठोपाठ माधव वाटवे यांनी पिरांदेलोचे "नाटककाराच्या शोधात सहा पात्रे" ह्या नाटकाचे काही प्रयोग पुण्या-मुंबईत केले. ह्या नाटकाचा प्रयोगदेखील मला फार आवडला होता. तेंडुलकरांची चार नाटके मला फार आवडतात. "सखाराम बाइंडर", "घाशीराम कोतवाल", "अशी पाखरें येती" आणि "शांतता, कोर्ट चालू आहे". ही नाटके एकाच नाटककाराने लिहिली असतील असे सांगून खरे वाटत नाही आणि चांगल्या नाटककाराची हीच ताकद असते असे मला वाटते. प्रत्येक नाटकाच्या आकृतिबंधात जमीनअस्मानाचा फरक आहे. अर्थात "थीम" मध्ये मला समान सूत्रे सांगता येतील आणि ते स्वाभाविक आहे.

यावरून एक सांगता येईल की, कुठल्याही साहित्यकृतीचा म्हणजे एखादी कथा, कादंबरी किंवा वैचारिक वाङ्मय, तत्वज्ञान यांचा माझ्यावर सांगता येण्याजोगा परिणाम होण्याचा प्रसंग कधी आला नाही. परिणाम झालेल्या कलाकृती या प्रयोगशील होत्या. सादर होणाऱ्या कला होत्या. थोडक्यात, माझ्यावर झालेला परिणाम हा 'परफॉर्मन्सचा' आहे, दृश्यात्मक भागाचा आहे. त्यामुळे नाटक लिहीत असताना किंवा लिहिल्यावर त्या नाटकाचे परिशीलन साहित्यिक दृष्टिकोणातून मला करता येत नाही. एवढे मात्र कळते की, नाटकातून एक सूत्र ( थीम ) म्हणून आपण सांगितलेले आहे आणि हे सूत्र तार्किकदृष्टचा अत्यंत सुसंगत असे पहिल्यापासून शेवटपर्यंत आपण मांडले पाहिजे. हे सूत्र किंवा ही थीम अशा काही चपखल आकृतिबंधातून लोकांच्या पुढे आली पाहिजे की, प्रयोग बघत असताना नाटकाची थीम आणि आकृतिबंध यांमधली सीमारेषा नाहीशी होऊन एक अतिशय प्रगल्भ असा नाटचानुभव माझ्या प्रेक्षकांना मिळावा. या अपेक्षेतूनच लेखन चालू असते. कधी असा विलक्षण नाटचानुभव देण्यास कारणीभूत असलेल्या थीममधून एखादी सामाजिक जाणीव व्यक्त होत असते







अनुक्रमणिका

तर कधी ह्या थीममधून दोन माणसांच्या किंवा अनेक माणसांच्या मनोव्यापाराचे लोकविलक्षण दर्शन घडत असते. पण अमूक एका तत्त्वज्ञानाचे किंवा अमूक एका साहित्यविचाराने प्रेरित होऊन नाटक लिहिणे मला कधी सुचलेले नाही.

दुसरा एक प्रश्न जे नाटककार स्वतःच आपली नाटके दिग्दर्शित करतात त्यांच्या बाबतीत विचारला जातो. तो म्हणजे स्वतःचेच नाटक स्वतः दिग्दर्शित करण्याने नाटकातील गाभ्याचे पुरेसे आकलन नाटककाराला झाले असेल का ? माझा अनुभव असा आहे की, मुळातच नाटक लिहीत असताना ते प्रयोगरूपाने मला डोळ्यासमोर दिसत असते. त्यामुळे आपल्या नाटकाचा प्रयोग कसा होणार आहे याबद्दल मनात साशंकता नसते. तसेच नट, तंत्रज्ञ, संस्थाचालक इत्यादी सर्व घटकांचा अनुभव असल्याने नाटकाचा प्रयोग बसविण्यामध्ये जे घटक असतात, उदाहरणार्थ, नट, नटयांचे भूमिकेविषयीचे आकलन, प्रकाशयोजना, नेपथ्य इत्यादी, या गोष्टी अवडंबर वाटत नाहीत, तर तो एक नाटक ह्या कलाप्रकाराचा अविभाज्य आणि हवाहवासा वाटणारा अंगभूत भाग आहे, असे वाटते. मला नेहमी वाटते की, मी दिग्दर्शित केलेला नाट्यप्रयोग म्हणजेच मी लिहिलेल्या नाट्यसंहितेचे दर्शन आहे. उद्या दुसऱ्या एखाद्या दिग्दर्शकाला माझे नाटक दिग्दर्शित करावयाचे असेल तर त्याच्यासमोर माझ्या नाटकाची संहिता पुस्तकाने उभी न राहता ती प्रयोगाने त्याच्यासमोर आधारभूत असावी असे मी सात-आठ वर्षांपूर्वी म्हटले होते. सध्याच्या व्हीडीओ आणि दूरदर्शन माध्यमांच्या विस्तारात नाटकाच्या प्रयोगाचे व्हीडीओवर चित्रीकरण करून त्याची कॅसेट जतन करून ठेवणे हे शक्य कोटीतले वाटत आहे. अशा गोष्टींच्या मधून दिग्दर्शकाला किंवा नटांना माझ्या नाट्यसंहितेचे दर्शन घडावे अशी माझी इच्छा आहे. हे जेव्हा शक्य होईल तेव्हा होवो. तोपर्यंत नाटकाची संहिता पुस्तकरूपाने छापणे ही गोष्ट सोईची पडते. पुस्तकरूपाने संहिता प्रसिद्ध करण्यामागे नाटकाचा प्रयोग करणाऱ्या कलाकारांना संहिता सहजसुलभपणे प्राप्त होणे शक्य व्हावे हाच हेतू मुख्यत्वे मनाशी आहे.

१९८० साली आमच्या "थिएटर ॲकॅडमी" संस्थेने पहिल्यांदा परदेशात प्रवास केला आणि घाशीराम कोतवाल या नाटकाचे २५ प्रयोग युरोपमध्ये ठिकठिकाणी त्या त्या गावातल्या प्रमुख रंगमंचावर सादर केले गेले. घाशीराम कोतवालचा सहायक दिग्दर्शक आणि ह्या दौरा आयोजित करणाऱ्या मोहन आगाशेचा एक मदतनीस या नात्याने परदेशात जाण्याची संधी मिळाली. १९८० सालापासून ते १९८७ सालापर्यंत जवळजवळ पाच ते सहा वेळा परदेशी जाण्याचा योग या ना त्या निमित्ताने आला. प्रगत देशांतील रंगभूमी बघत असताना एक गोष्ट कटाक्षाने जाणवली, की नाटक या माध्यमाचे मूलद्रव्य म्हणजे संहितेबरोबरीने असणारे जिवंत नट हे फारच प्रशिक्षित आणि अत्यंत वरच्या दर्जाचे आहेत. युरोपमधली नाटके, अमेरिकेतली प्रायोगिक नाटके, व्यावसायिक नाटके किंवा दक्षिण आफ्रिकेमधील ब्लॅक थिएटरची नाटके ही बघत असताना त्यांतील ठळक जाणवलेली गोष्ट म्हणजे अत्यंत वरच्या दर्जाचा अभिनय देणारे नट. नाटककार हा जन्मावा लागतो असे म्हणतात. नाट्यलेखनाचे कोठे प्रशिक्षण मिळत नाही. किंवा मिळूनदेखील त्याचा मूळ प्रतिभेवर कितपत परिणाम होतो याविषयी सगळे साशंक असतात. पण एकदा संहिता हातात आल्यानंतर त्या संहितेतील थीमचे किंवा नाट्यविचाराचे दर्शन घडविणारे नट हे मात्र प्रशिक्षितच असावे लागतात. चांगल्या नाटककारांची जगभर वानवा असते. प्रत्येक देशात चांगले लिहिणारे असे नाटककार फार कमी असल्याचे आढळून येते. पण ज्याच्या जिबावर रंगभूमी चालते तो युरोप-अमेरिकेतील नट मात्र अत्यंत संवेदनाक्षम, तल्लख आणि प्रशिक्षित असल्याचे दिसून आले. आपल्याकडे पाहिले, तर मराठी रंगभूमीचा अभिनय सर्वसाधारणपणे ठोकळेबाज व भडक वाटतो. अजूनही मराठी रंगभूमीवर नट ही संस्था पुरेशी विकसित झालेली नाही असे वाटते. परंतु परंपरागत लोक-रंगभूमीवरचे किंवा दाक्षिणात्य परंपरागत नृत्यनाट्य करणारे कलाकार मात्र अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा अभिनय करतात असे स्पष्ट जाणवते. परंपरागत नृत्यनाट्य या कलाप्रकारात किंवा लोककलाप्रकारात दिसणाऱ्या कलाकारांनी आपले जीवन आणि कला यांचे इतके बेमालूम व प्रशिक्षित रसायन केल्याने त्यांच्या अभिनयाचा दर्जा निश्चितच श्रेष्ठ दर्जाचा वाटतो. उदा., राजाभाऊ कदम हे आपल्याकडचे गोंधळी, संयुक्ता पाणिग्रही यांचे नृत्य किंवा कथकल्ली वा कोडीयाट्टम नाचणारे केरळमधील कलाकार हे श्रेष्ठ दर्जाचे वाट-





अनुक्रमणिका

तात. आधुनिक मराठी रंगभूमीवर मात्र "शंभू मित्रा" ह्या बंगाली नटाच्या तोडीचा दुसरा बुद्धिनिष्ठ अभिनय करणारा अभिनेता सापडत नाही. त्यांचा अभिनय बघत असताना अत्यंत लोकविलक्षण अनुभव येतो. काहीतरी झपाटलेल्या, या जगात नसलेल्या अशा एक झळाळीपूर्ण वातावरणात त्यांचा अभिनय आपल्याला नेऊन सोडतो. काही वर्षांपूर्वी पुण्यात शंभू मित्रा यांची "राजा इडिपस्" आणि "पुतूलखेला" ही दोन नाटके बघण्याचा योग आला होता. शंभू मित्रा यांची "राजा इडिपस्"ची भूमिका ज्यांनी बघितली असेल, त्यांना मी काय म्हणतो त्याची प्रचीती येईल. एका बाजूला आपण पुरेसे नाटककार मिळत नाहीत किंवा लिहीत असलेल्या नाटककारांना मार्गदर्शनपर काही कार्यक्रम चालू नाहीत अशी ओरड करतो. हिंदी रंगभूमीवर प्रशिक्षण देणारी "नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा" ही संस्था दिल्लीला गेली २५ वर्षे चालू आहे. त्यातून तयार झालेले नट आज मुंबईत सर्वत्र हिंदी चित्रपटांतून आपल्याला दिसतात आणि प्रशिक्षित नट जर एखाद्या चित्रपटाला किंवा नाटकाला मिळाला तर एकूणच कलेचा दर्जा किती उंचावू शकेल याचे प्रत्यंतर या प्रशिक्षित नटांचा अभिनय चित्रपटातून किंवा क्वचित हिंदी रंगभूमीवर बघून आपल्याला येते. नसिरुद्दीन शहा, ओम पुरी, उत्तरा बावकर इत्यादींचा अभिनय आपल्याला असा अनुभव देतो. नाटककाराने लिहिलेली संहिता दर वेळेस उच्च दर्जाची असेलच हे सांगता येत नाही. सध्या मराठीत असणारी नाटके कोणत्या दर्जाची आहेत ह्याविषयी तज्ञ मंडळी आपली मते मांडीत असतातच. परंतु किमान दर्जाची संहिता रंगभूमीवर आणण्यास प्रशिक्षित नटांची उणीव मात्र फार जाणवते. नटांना प्रशिक्षण देण्याची कोणतीही विचारपूर्वक आखलेली योजना महाराष्ट्रात सध्या दिसत नाही. आपल्याकडे नटांचे प्रशिक्षण निरनिराळ्या हौशी संस्थांतून किंवा राज्य–नाट्य स्पर्धेतून सतत प्रयोग करण्यामधूनच होत असते. अभिनयशिक्षणाचे तंत्र असते. विज्ञानाप्रमाणे या तंत्राच्य अनेक शाखा आहेत. परंतु ह्याचा विचार आपल्याकडे झाल्याचे दिसत नाही. परंपरागत नृत्य-गायन ह्या कलेत गुरु-शिष्य हे नाते असल्यामुळे प्रशिक्षणाची आपोआप सोय होते. नाटकाचे तसे दिसत नाही.

नाटककाराच्या नाट्यलेखनाच्या प्रवासात जर अशा प्रशिक्षित नटांची साथ मिळाली, तर त्याचा एकत्रित परिणाम दोघांवरही होत असतो. नाटककाराने लिहिलेले संवाद कशा प्रकारे म्हणता येतील याचे समर्थ दर्शन ह्या हौशी नट मंडळीद्वारे पुरेसे परिणामकारक घडेलच असे सांगता येत नाही. कारण नट जर अभिनय शिकला तर त्याचा अभिनय बघून नाटककार आपोआपच शिकत असतो. त्यासाठी वेगळ्या प्रशिक्षणाची खऱ्या नाटककाराला गरज नसते.

मग प्रश्न असा पडतो की, नाटककारासाठी म्हणून काही वेळा ज्या नाट्य कार्यशाळा (प्ले राइटर्स वर्कशॉप्स) आयोजित करण्यात येतात त्याचे प्रयोजन काय? खरे तर शिकवून कुणाला नाटककार होता येईल यावर माझा विश्वास नाही. पण जर एखाद्या लेखकाने एखादी चांगली नाटिका किंवा एखादे नाटक लिहिले असेल, तर ते वाचून त्या लेखकाची प्रतिभा ही नाटककाराची आहे की केवळ हौस आहे याविषयी काही अनुमान निश्चित काढता येते. त्या लेखकाची मुळातील प्रतिभेची ऊर्मी जर नाटककाराची असेल, तर अशा लेखकाला ह्या नाट्यप्रशिक्षणाचा उपयोग कदाचित होऊ शकेल. ह्या नाट्य कार्यशाळा कोण आयोजित करतो आणि कशा प्रकारे आयोजित करतो यावर बरेच अवलंबून असते. माझ्या मते अशा होतकरू नाटककारांच्या भोवती फक्त योग्य ते वातावरण निर्माण करावे. त्याला काही दिवस ज्यांनी ज्यांनी आपली हयात नाटकांसाठी खर्च केलेली आहे अशा ज्येष्ठ कलाकार मंडळींच्या सान्निध्यात राहता आले तर त्यांच्या सहवासातून, त्यांच्या गप्पांतून त्याला खूप शिकता येते. तसेच त्याने लिहिलेल्या लेखनाचे मूल्यमापन ते केवळ परंपरागत साहित्यिक परिभाषेत न होता नाट्यप्रयोग करणाऱ्या मंडळींच्या दृष्टिकोणातून जर झाले तर त्याचा उपयोग त्याला होऊ शकेल. ह्यासाठी ज्येष्ठ कलाकार मंडळींमध्ये मात्र नाट्यसंहितेचा गाभा नेमका ओळखून मग त्याच्यावर चर्चा करण्याची हातोटी असली पाहिजे.

अशा प्रकारची एक योजना "थिएटर ॲकॅडमी" या आमच्या संस्थेतर्फे तीन वर्षांसाठी आखली आहे. गेल्या दोन वर्षांत या योजनेमधून एकूण बारा नाटककारांनी बारा संहिता लिहिल्या. प्रत्येक वर्षी प्रत्येक संहितेचे योग्य ते मूल्यमापन तज्ञ मंडळींच्या चर्चेमधून झाले. ह्या बारांपैकी चार संहिता तिसऱ्या वर्षी म्हणजे डिसेंबर १९८७ मध्ये रंगभूमीवर येतील. इतकेच नव्हे



अनुक्रमणिका

तर या चारही संहिता चार नामवंत प्रकाशकांतर्फे प्रसिद्ध केल्या जातील. अशी ही तीन वर्षांची योजना डिसेंबर १९८७ मध्ये पूर्ण होईल. त्यानंतरच अशा योजनेबद्दल काही बरेवाईट निष्कर्ष काढता येतील. ही तीन वर्षाची योजना आम्ही 'थिएटर ॲकॅडमी' तर्फे म्हणजे नाटकांचे प्रयोग करणाऱ्या मंडळींतर्फे आखलेली आहे. ह्या योजनेला "फोर्ड फाउंडेशन" चे अर्थसाहाय्य मिळाले म्हणूनच ही योजना शक्य झाली. आपल्याकडे अशा योजनांसाठी अर्थसाहाय्य मिळण्याची काहीही योजना नाही. वास्तविक ही योजना सर्वप्रथम १९८३ साली महाराष्ट्र राज्याच्या "साहित्य संस्कृती मंडळा" पुढे सादर केली होती. त्यांच्याकडून काही प्रतिसाद न आल्याने ही योजना "फोर्ड फाउंडेशन" कडे सोपवावी लागली. या योजनेतून कदाचित काही नव्या नाटककारांचा नाट्यप्रवास जोमाने चालू होईल. असा प्रथमप्रयोग १९७२-७३ साली सत्यदेव दुबे यांनी केला होता. त्यामधून महेश एलकुंचवार, गोविंद देशपांडे, मी इत्यादिकांचा नाट्यप्रवास अधिक डोळसपणे सुरू झाला. आता ह्या १९८५ ते १९८७ ह्या तीन वर्षांत नाट्यलेखन कार्यशाळेमधून कोणाचा कसा प्रवास सुरू होतो, ते बघायचे.

**माहिती :**

सतीश वसंत आळेकर
वय ३८ वर्षे
४३८, शनिवार पेठ
पुणे – ४११ ०३०

**प्रकाशित नाटके :**

१९७३ मिकी आणि मेमसाहेब
१९७४ महानिर्वाण [ ३ री आवृत्ती चालू ]
१९७५ महापूर [ २ री आवृत्ती चालू ]
१९७९ बेगम बर्वे
१९८२ शनिवार–रविवार
१९८७ दुसरा सामना [ छपाई चालू ]

**अप्रकाशित नाटके :**

१९७४ वाफा
कै. चिं. त्र्यं. खानोलकर ह्यांच्या दीर्घ कथेचे नाट्यरूपांतर.

१९८५ प्रलय [ भाषांतरित ]
मूळ लेखक : गुंथर ग्रास

**संग्रहित एकांकिका :**

१९७३ झुलता पूल/मेमरी [ २ री आवृत्ती ]
१९८३ भिंत/वळण [ रूपांतरित ]
१९८५ बस स्टॉप/दार कोणी उघडत नाही.
१९८७ भजन/सामना [ २ री आवृत्ती ]

**चित्रपट–पटकथा संवाद :**

१९७७ जैत रे जैत.
सहलेखक : अनिल जोगळेकर.
दिग्दर्शक : जब्बार पटेल.

**लघुपट :**

१९७८ हमाल पंचायत.
लेखन आणि दिग्दर्शन.

**दूरदर्शनमाला दिग्दर्शन :**

१९८५ देखो मगर प्यारसे [ हिन्दी ]










# कीर्तन : एक प्रभावी संपर्कक्रिया

अशोक दा. रानडे

पत्रकार झालो नसतो तर कीर्तनकार झालो असतो या अर्थाचे लो. टिळकांचे उद्‌गार प्रसिद्ध आहेत. जनतासंपर्काचे कीर्तन हे प्रभावी माध्यम असल्याबद्दलची त्यांची ही पावतीच म्हणावयाची ! महाराष्ट्र, गुजराथ, आंध्र प्रदेश, उत्तर भारत आणि बंगाल इत्यादी अनेक प्रदेशांत कीर्तनाने मूळ धरले आहे. याची कारणे शोधण्यास फारसे खोल जावे लागत नाही. एक तर असे की एकत्र आणि सामूहिक अशा दोन्ही तत्त्वांना एकाच वेळी त्याचे आवाहन राहते. दुसरे असे की ते बहुविध आहे : भाषण, गायन, मूकाभिनय, नृत्य आणि कथन यांचा कीर्तनात अंतर्भाव असतो. या कारणाने एखाद्या प्रभावी नाटकाप्रमाणे भारतीय समाजाच्या अनेक थरांवर त्याची पकड बसू शकते.

कोणताही कीर्तनप्रकार असो आणि संबधित धर्म-पंथ कोणताही असो, कीर्तनाचे लक्ष स्वतःच्या बाहेर म्हणजे श्रोत्यांवर असते. संगीत-नृत्य-नाटच कलावंता-प्रमाणेच कीर्तनकारही कीर्तनात रंग भरल्याची / न भरल्याची भाषा करतो. कीर्तनाचा प्रयोग बहुतांशी एकपात्री असला ( आणि या अर्थाने कीर्तनकार अधिक स्वयंपूर्ण भासला ) तरी त्याला भासणारी श्रोत्यांची गरज इतर प्रयोगकलाकारांइतकीच तीव्र असते. इतकेच नव्हे तर श्रोत्यांवर प्रभावी संपर्कक्रियेतून विजय मिळविणे हीच त्याचीही महत्त्वाकांक्षा असते.

संबंधित कलाप्रकारानुसार संपर्कक्रियेचे तंत्र आणि आशय जरी बदलला तरी श्रोत्यांची भूमिका, त्यांच्या प्रतिसादाचे महत्त्व, तत्काळस्फूर्त आविष्कार, मौखिक परंपरेत आकाराला आलेल्या कल्पनांची राबवणूक इत्यादींबाबत सर्वांत समानता आढळते. या पार्श्वभूमी-वर भारतीय कीर्तनाची तपासणी केली पाहिजे. म्हणूनच सयुक्तिक ठरणारे प्रश्न निराळे हवेत. उदाहरणार्थ एक संपर्कक्रिया म्हणून पाहिल्यास कीर्तनात काय काय घडते ? श्रोत्यांसंबंधी कीर्तन आपले काय धोरण ठेवते आणि त्याची अंमलबजावणी कशी केली जाते ? आमच्या सौंदर्यमीमांसेत कीर्तनाची चर्चा का नसावी हे एक गूढच आहे. आमच्या पुस्तकी कला-समीक्षेनेही कीर्तनाकडे दुर्लक्ष केले आहे. पोवाडा, घोषवाद्यसंगीत यांसारख्या प्रांगणीय आविष्कारांकडे संगीतविचारकांनी बहिरा कान फिरविला आहे ! कीर्तनाबावत त्यांची भूमिका काही फारशी निराळी नाही. कीर्तन हा एक संयुक्त, मिश्र, संमिश्र कलाप्रकार आहे वगैरे विधाने करून थांबून कसे चालेल ? सर्वसाधारण सौंदर्यमीमांसक, संगीतविचारवंत इतकेच नव्हे तर सर्व प्रयोगकलाकारांनी कीर्तनाचे मूल्यमापन बारकाईने केले पाहिजे.

## कीर्तनाचे घटक

कीर्तनात अनेक घटक असतात. वृत्तान्त हा एक प्रमुख घटक. तसे पाहता कोणत्याही घटनेचा वृत्तान्त सांगता येतो. पण असा केवळ वृत्तान्त सांगणे कीर्तन-कारांना मान्य नसते. प्रत्येक वृत्तान्ताला कोणत्या ना कोणत्या पातळीवर कथेची परिप्रेक्षा देण्याकडे कीर्तन-काराचा कल असतो. घडलेल्या प्रसंगाचे वर्णन, पुराण-कथेचे सादरीकरण किंवा घटना पाहिल्याप्रमाणे कथन वगैरे पातळ्या या बाबतीत संभवतात. परिणाम असा की कीर्तनकारासाठी प्रत्येक घटित अन्वयार्थ लावलेले घटित ठरते. सर्व घटनांना संदर्भ प्राप्त होतात. संदर्भ पुरविण्याचेही अनेक प्रकार असतात. उदाहरणार्थ संदर्भ कालिक असू शकतो. वर्णित घटनेवर लक्ष केंद्रित करता करता एक वा अनेक पूर्ववर्ती घटनांचा संदर्भ कीर्तनकार नेहमी देतो. कालानुक्रमी, पौराणिक वा दिव्यकथात्म भूतकाळाचे जागरण करणे कीर्तनकाराच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरते. ‘ जेहेत्ते कालाचे ठायी, एकदा काय झाले महाराजा ’ यासारखे सूत्र कीर्तनप्रयोगात वारंवार येणे अपरिहार्य

अनुक्रमणिका






होय. प्रस्तुत शैलीसंकेत वापरण्याचे प्रयोजन श्रोत्यांची कल्पनाशक्ती परिणामकारकरीत्या चाळवणे हे असते. कालिक शैलीसंकेत वापरून घड्याळी वा दिनदर्शिकेतल्या कालापासून श्रोत्याने मोकळे व्हावे असा आपला इरादा कीर्तनकार आवाहक पद्धतीने व्यक्त करतो. अनिश्चित कालाचा शैलीसंकेत विशेष सूचक ठरू शकतो.

कालिक परिप्रेक्षेइतकाच महत्त्वाचा दुसरा भाषण वा कथनविशेष म्हणजे पार्श्वभूमीवर आणण्यात येणारा आधारस्वर. पठणापासून किंचित दूर राहणाऱ्या गद्यफेकीला सस्वर रूप देण्याकरिता आधारस्वराचा पुरवठा चालू राहतो. एखाद्या वाक्याचा काही भाग, वा एकंदर वाक्यसमूहातील काही वाक्ये सस्वर आणि अनेकदा पुरविल्या जाणाऱ्या आधारस्वराच्या पट्टीत उच्चारण्याचा हेतू काय ?

कीर्तनकाराला अखंडता हवी असते हे एक कारण असावे. तुटकपणाचे त्याला वावडे असते. कीर्तनकार वारंवार गातो आणि गाणे व बोलणे या दोन पातळ्यांवरचे वावरणे खटकू नये अशी त्याची इच्छा असावी काय ? तारतापातळ्यांमधला बदल एकाएकी न वाटावा म्हणून धडपड असावी काय ? यात तथ्यांश आहे. पण गाण्याच्या आसपास नसलेल्या गद्यास त्याने स्वराची डूब का द्यावी ? मला वाटते सस्वर गद्याच्या आशयात प्रस्तुत प्रश्नाचे उत्तर शोधले पाहिजे. काही गद्यभागांचा बौद्धिक वा भावनात्मक आशय श्रोत्यांचे लक्ष वेधण्यासारखा असतो. याकरिता सस्वर गद्याचा वापर केला जातो. नेहमीच्या भाषणात तारतेचे चढउतार असले तरी निश्चित तारतापातळ्यांचा अभाव असतो. स्वराधारे वर्तण्यात निश्चित तारतापातळी राबवली जाते. श्रोत्यांच्या आठवणीत विशिष्ट आशयाला स्थान मिळावे हा हेतू.

गजर, ओवी इत्यादी चालींचा, स्वरांच्या संकेतबद्ध साच्यांचा वापर यानंतर विचारात घ्यायला हवा. इथे असे ध्यानात येईल की, संगीतपरतेची एक सोपानपरंपरा कीर्तनप्रयोगात आकाराला येत असते. निखळ गद्य, सस्वर गद्य, चाल असलेले गद्य/पद्य अशा पातळ्या वापरल्या जात असतात. कीर्तनसंगीताचा सामग्ऱ्याने विचार करताना प्रस्तुत आविष्कारातील सांगीतिकतेचे प्रमाण ध्यानात घ्यायला हवे. कारण संगीत नसणे, संगीताचे सूचन होणे आणि कमीत कमी संगीत वावरणे या तिन्ही अवस्थांची गद्यादीतून प्रतीती येत असते. शिवाय अभिप्रेत आशय आणि योजलेल्या संगीतपरतेचे प्रमाण व वळण यांचे परस्परसंबंधही मांडता येतात. स्पष्टीकरणात्मक आशय असेल तर गद्य, पूरक पुरावा, विधाना-विधानांतील दुवे जोडण्याचे काम पार पाडण्यासाठी सस्वर गद्य आणि एकंदर विवेचनातून हाती लागणारे नैतिक निष्कर्ष व औपपत्तिक तात्पर्य ठाम ठसविण्याकरिता ओवी, गजर इ. चालींचा वापर—अशी मांडणी होऊ शकते. संगीतपरतेचा उपयोग जणू काही बोलण्यातील ' अधोरेखनासाठी ' असतो.

विवेचनातील प्रस्तुत टप्प्यावर शब्द व स्वर यांच्या संकेतबद्ध वापराबरोबर येणाऱ्या आंगिक अभिनयाचाही निर्देश केला पाहिजे. गद्य भाग या बाबतीत निर्लेप असतो म्हटले पाहिजे. सस्वर गद्यासह महत्त्वदर्शक हावभाव व हातवारे असतात. चालींच्या गायनावेळी आंगिकाभिनय बऱ्याच अधिक प्रमाणात असतो. निश्चितार्थी, भविष्यवाणी करणाऱ्याचा ठामपणा दर्शविणारा चेहरा-मोहरा व ढब हे डोळ्यांत भरणारे विशेष होत. उपदेशक आणि प्रेषित यांनी शिकवण व संदेश देण्याकरिता वापरावयाची आयुधे कीर्तनकारही वापरतो असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.

भाषण ते गायन यांच्या दरम्यान एक अखंड वक्र ठेवणाऱ्या प्रयोगपरंपरांच्या विशेषांचा कीर्तनात बेधक आढळ होतो. म्हणून कीर्तनकाराच्या भाषणफेकीचा थोडा विचार करायला हवा. भाषाशैली आणि शब्दांची फेक यांच्यामुळे भाषणफेक सिद्ध होत असते. एका विशिष्ट मर्यादेपर्यंत भाषणफेक आशयावर अवलंबून राहते. मुख्यत: आध्यात्मिक म्हणता येतील अशा प्रश्नांची चर्चा करण्याच्या अंतिम उद्दिष्टामुळे आशय निश्चित होतो, कीर्तनकार एखादी गोष्ट सांगत असो, आख्यायिका वगैरे नाट्यमय पद्धतीने सादर करीत असो वा चतुर सुभाषितादींची पखरण करीत असो; आध्यात्मिक, नैतिक वा बोधप्रद आशयाच्या पदाकडे त्याला पुन्ह:-पुन्हा यायचे असते. परब्रह्माचा शोध, ईश्वराचे स्वरूप वा आत्म्याचे अमरत्व वगैरे विषय कीर्तनकाराच्या नेहमीच्या संचातले होत. प्रस्तुत विषय इतके समावेशक आहेत की प्रत्येक मनुष्यास कमी-अधिक तीव्रतेने, आज ना उद्या त्यांचा विचार करावा लागतोच. पण

अनुक्रमणिका

तरीही प्रस्तुत विषयांना अगदी आजची निकड आहे / असते असे कसे म्हणावे ? अशा परिस्थितीत कीर्तनकारास बिकट परिस्थितीस तोंड द्यावे लागते असेच म्हटले पाहिजे. मुद्दा असा की आशयाच्या विशिष्ट स्वरूपामुळे सर्वांना आवाहन करणे आणि तरीही 'आज'च्या मागणीत गुंतून न पडणे शक्य होते. नेमकेपणापेक्षा सूचकता व व्यक्तिगततापेक्षा सार्वत्रिकता साधणारी अशीच कीर्तनकाराची शब्दसरणी राहते. श्रोत्याला आपल्याला कळले / कळत आहे असा भरंवसा वाटतो. अनेक शतकांची परंपरा पाठीशी असल्याकारणाने 'कीर्तनाची' भाषा आता ओळखीची झाली आहे याचे अपूर्व वाटायला नको. खरे पाहता अनेक म्हणी, वाक्प्रचार, अलंकार, सुभाषिते इतकेच नव्हे वैचारिक सिद्धांत (वा विचारांचे साचेही) कीर्तनाच्या माध्यमाद्वारे लोकांपर्यंत झिरपले आहेत. म्हणूनही कीर्तनाचा आशय बोधगम्य वाटतो. कीर्तनप्रयोग सारतः सामूहिक असतो, व्यक्तिगत नसतो. मूर्त, व्यक्तिगत आणि वर्तमान संदर्भापेक्षा वेगळा मोहरा ठेवल्याने कीर्तन सुबोध राहते.

मुद्दाम ध्यानात घेण्यासारखी बाब आहे ती भारतीय संतकवींच्या कामगिरीची. भारतभर संतांनी उठवलेल्या आवाजात साधेपणा, संगीतमयता आणि जाणणाऱ्याची खात्रीपूर्वकता भरपूर आहे. कीर्तनपरंपरा संतकाव्यावर विपुल भार टाकते. कीर्तनाच्या संपर्कक्रियेत टिकाऊ, विश्वासार्ह आणि अहम् विसरावयास लागणारे काहीतरी थोर हाती लागल्याचा प्रत्यय येतो तो बऱ्याच अंशी संतकवींमुळे याचा विसर पडू नये. कदाचित परिणाम तात्पुरता वा अल्पजीवी वाटेल, पण संदेशवहन क्षमतेने होते इतके निश्चित.

कीर्तनाच्या संगीतपरतेचा विचार करताना ध्यानात घेण्याचा पुढचा मुद्दा आहे कीर्तनपरंपरेत रूढ वाद्यांचा. टाळ, मृदंग, वीणा, मंजिरी, झांज, चिपळ्या आणि नंतरनंतर पायपेटी व तबला इतकी वाद्ये दृढपद झाली आहेत. पैकी टाळ आणि झांज साथीदार वाजवितात. दोन्ही वाद्यांचा ध्वनी अ-स्वरी, स्पष्ट आणि ताकदवान असतो. लयीची साथ पुरविण्यासाठी प्रस्तुत वाद्ये आदर्श म्हणता येतील. मंजिरी आणि चिपळ्या यांची भूमिका तशीच पण यांचा ध्वनि कमी अंतर कापतो. चिपळ्यांची चौकट लाकडी आणि चकत्या धातूच्या यामुळे ध्वनी तुटक, अ-स्वरी. लयीचे खंड आणि म्हणून लयीचे आकृतिबंध ठाशीवपणे उभारण्यात सोयीचा. याउलट मृदंगाचा ध्वनी घुमारेदार अनुरणनात्मक आणि ऐकणाऱ्याच्या मनात गांभीर्याचा ठसा उमटविणारा. ताकदही लांबवर पोचण्याची. मुद्दा असा की मृदंग हे एकच तालवाद्य आहे आणि बाकीची लयवाद्ये होत. तालाची आकृती, तीमधील कमी-अधिक आघातयुक्त अक्षरे घमारेदार पण हळूहळू विरत जाणाऱ्या मृदंगाच्या द्वारे, तर तालाच्या आकृतिबंधातील मुख्य आघात जोरदार पण अस्वरी स्पष्टतेने टाळ इत्यादींद्वारा अवतरतात. कीर्तनरंग ज्या प्रांगणीय वा अर्धप्रांगणीय वातावरणात सजतो, ते प्रस्तुत वाद्यांच्या ध्वनीने परिणामकारकरीत्या भरले जाते. राहता राहिला वीणा. वीणा काय किंवा तंबुरी काय, दोन्ही हिंदुस्थानी कलासंगीतात आधारस्वर पुरविणाऱ्या तंबोऱ्याच्या छोटेखानी आवृत्त्या म्हटल्या पाहिजेत. कीर्तनाच्या एकंदर वाद्यसंचातली तंतुवाद्ये फक्त कीर्तनकाराला पुरेल इतक्या गरिम्याचा आधारस्वर पुरवू शकतात. लय / ताल श्रोत्यांसकट सर्वांना पुरविण्याची सोय असावी पण सुरावटीबाबत ती सोय नसावी ही बाब लक्षणीय आहे. सर्वांना जर आधारस्वर उपलब्ध असता तर कीर्तनकारावरच्या सांगीतिक मागण्या वाढल्या असल्या. स्वराबाबत तंतोतंत इमान राखणे कीर्तनकाराच्या ध्येयधोरणांत बसत नाही कारण कीर्तनी संगीताची जात–प्रत ढोबळ असते. आधारस्वर मोठ्याने आणि सर्वांना पुरविण्याने एक त्रासदायक प्रमाणसंदर्भ कार्यकारी झाला असता. कीर्तनव्यवहारात पायपेटी–तबला यांनी उशिरा प्रवेश करावा याचा मथितार्थ स्पष्ट आहे. प्रस्तुत वाद्यांचा प्रवेश कीर्तनाच्या उत्क्रांतीमधील कलात्म अवस्थेत सहेतुक उचललेल्या पावलाचे उदाहरण होय. पारंपरिक सरणीपासूनचे हे मार्गांतर ध्यानात घेण्यासारखे आहे इतकेच नव्हे तर त्याचा अन्वयार्थही नीट तपासला पाहिजे.

इतर अनेक प्रयोगक्रियांप्रमाणे कीर्तनाने स्वतःची अशी खास परंपरा निर्माण केली. असे करताना अनेक प्रयोगसमस्यांना तोंड द्यावे लागले आणि कीर्तनाने या प्रश्नांना उत्तरे शोधली. पैकी अनेक उत्तरे सर्व प्रयोगकारांना उपयुक्त ठरण्यासारखी आहेत. कीर्तनाचे हे अंग ध्यानात घेतल्याशिवाय कीर्तनाचे स्वरूप नीट समजणार नाही. इतकेच नव्हे तर त्याचे मूल्यमापनही






योग्यपणे होणार नाही. साहित्यावर आधारित सौंदर्यमीमांसेच्या इमल्यात कीर्तनप्रयोगांचे मूल्यमापन करण्याचे निकष वसतीला आलेले दिसत नाहीत ! असो. ते एक निराळेच आख्यान आहे.

व

प्रयोगकलांच्या परंपरेत कीर्तनाचे स्थान आहे. ते त्यानुसार तपासावे, आवश्यक ते निकष निश्चित करावे, संपर्कविधानाच्या वाढत्या विवेचनात कीर्तनचर्चेने भर टाकावी वगैरे मुद्द्यांचे सूचन आधीच्या विवरणात केले. सोयीसाठी प्रस्तुत विचारमांडणीत कीर्तनाच्या नारदीय, वारकरी, एकनाथी वगैरे भेदांच्या तपशीलांत न शिरता कीर्तनात एकंदरीने काय काय घडू शकते, कोणकोणते घटक असू शकतात आणि त्यांची प्रयोजने कोणती हे सर्वसाधारपणे पाहिले. कीर्तनभेदांची तपासणी करू लागले की गायन, नृत्य, अभिनय, वृत्तांत, निरूपण, कथन वगैरे घटक विविध प्रमाणांत बहुतेक भेदांत असतात; पण तरीही त्यांमागच्या प्रेरणा निराळ्या, त्यांच्यातील बदलांचे स्वरूप निराळे आणि उत्क्रांतीचे टप्पेही वेगवेगळे याचे भान वाढते.

कीर्तनसंज्ञेचे दोन कोशगत अर्थ म्हटले तर पार वेगळे आणि म्हटले तर अंत:सूत्राने बांधलेले वाटतात : १) वृत्तांत सांगणे, कथा सांगणे, स्तुती करणे; २) देऊळ. दोन्ही अर्थ ध्यानात घेतल्यास कीर्तन या संज्ञेचे व्यापक आशयक्षेत्र जाणवेल. भारताच्या अनेक भागांत आज कीर्तन म्हणजे अभिनय व नृत्य काही मर्यादेत वापरणारे, संगीताचा मुबलक उपयोग इष्ट समजणारे भक्तिपूर्ण कथाकथन असे समजले जाते. प्रदेशभेदानुसार कीर्तनाच्या स्वरूपांत फरक आढळतो. संज्ञाभेदही अनुभवास येतो ( उदाहरणार्थ आंध्रप्रदेशात यास कलाक्षेपम् तर तामिळनाडूत हरिकथा म्हणून कीर्तनपरंपरा आकाराला आली आहे). पण तरीही गाभा निराळा नाही असाच प्रत्यय येतो.

मुख्य आशय समान राहण्याची काही कारणे आहेत. एक कारण असे की कीर्तनाची गंगोत्री भारतातले भक्तिपंथ होत. भक्तिकल्पनेची मुळे प्राचीन कालापर्यंत पोचत असली तरी सातव्या शतकापासून भक्तिपंथांना चळवळीचे रूप प्राप्त झाले असे म्हणता येईल. दुसरे म्हणजे कीर्तनाने आपली भिस्त संतकवींवर ठेवली आहे. या संतकवींच्या हजारो रचना संगीताचा मुबलक आणि डोळस वापर करीत भारतभर पसरल्या. प्रस्तुत क्रिया अनेक शतके होत राहिली. भारतीय जनतेची सांगीतिक साक्षरता बऱ्यापैकी आहे आणि याचे श्रेय बऱ्याच अंशी संतकवी आणि लोकसंगीत या दोहोंकडे आहे. तिसरे आणि काहीसे गुंतागुंतीचे कारण असे की धार्मिकनैतिक सुधारणेच्या निरनिराळ्या चळवळी होता होता मौखिक परंपरावाहकांची कामे अशा तऱ्हेने निश्चित होत गेली की भक्तिमार्गप्रेरित आशय संक्रांत करण्याकरिता कमीतकमी चार प्रकार सिद्ध झाले : प्रवचन, पुराण, भजन व कीर्तन. प्रत्येक प्रकारचे आपापले रसायन तयार झाले. संगीत, कथन, उपदेश व अभिनय इत्यादी घटकांना त्यात कमीजास्त स्थान मिळाले. याशिवाय प्रादेशिक भेदांनुसार प्रस्तुत प्रकारांत फरक पडले. कीर्तनाचे भेद तपासणे, त्यांतील कायम लक्षणे व बदलती लक्षणे कोणती हे पाहणे भारताच्या सांस्कृतिक गतिशास्त्राच्या दृष्टीने उद्बोधक ठरते. इथे महाराष्ट्रातील कीर्तनपरंपरा निरखण्याचा यत्न केला आहे. मुख्यत: एक प्रयोगाधारित संपर्कक्रिया म्हणून.

संगीतविचारकांनी कीर्तनाचा आवर्जून विचार केला पाहिजे. कारण संपर्कमाध्यम म्हणून कार्य करणाऱ्या या संस्थेने अनेक शतके संगीताचा प्रचार केला आहे. दीर्घ परंपरा, आम जनतेला आवाहन, निवडक सांगीतिक साऱ्याचा वारंवार आणि सहेतुक उपयोग या कारणांनी समाजमन संगीतोन्मुख ठेवण्याची कामगिरी कीर्तनाने नेकीने बजावली आहे. राग, ताल यांसारख्या पायाभूत कल्पनांपासून ते आलाप, तिहाई, ध्रुवपद इत्यादी बांधणीच्या घटकांनी समाजमनात घर केले ते कीर्तनासारख्या प्रकारांमुळे. तांत्रिक वाटणाऱ्या सांगीतिक संकेतांना शब्दबद्ध न करता, निर्भाषिक व्यवहारातून समाजमनात रुजवण्याचे काम महाराष्ट्रांत (तरी) कीर्तनाने चांगले पार पाडले. पं. विष्णु दिगंबरांसारखा क्रियाशील संगीतकार मुंबई (१९२०) आणि नाशिक ( १९२१ ) येथील कीर्तनसंमेलनांना पुरस्कृत करण्याकरिता पुढे सरसावला हा काही योगायोग नव्हे ! मराठी नाट्यसंगीताच्या आद्य सुवर्णयुगात ( १८८०–१९२० ) कीर्तनसंगीताचा वापर नव्या सजावटीत, नव्या दमाने केला गेला होता अशी संगीतेतिहासाची साक्ष आहे याचाही विसर पडून चालणार नाही.

अनुक्रमणिका

महाराष्ट्रात कमी-अधिक जोराने रूढ असलेल्या कीर्तनपरंपरांची मांडणी पुढीलप्रमाणे करता येईल* :

सर्व संप्रदायांचा तपशीलवार विचार करावयाचा मानस नाही कारण सर्वांनी मूळ साचा नारदीय वा वारकरी कीर्तनाचा ठेवला आहे. कीर्तनभेदांपैकी कोणता आधी वा नंतर याचाही निर्णय करणे अवघड आहे. ज्या प्रकारची चर्चा अभिप्रेत आहे तीत कालिक पौर्वापर्य तितकेसे महत्त्वाचे नाही. पद्मपुराणातील ( इ. स. ४०० ) एका श्लोकाचा आधार घेऊन नारदीय कीर्तन अधिक प्राचीन असे म्हटले जाते.[१] वास्तवात कीर्तनात संगीत मुबलक वापरण्याची प्रथा प्राचीन आहे याचाच हा श्लोक पुरावा म्हटला पाहिजे.

प्रस्तुत प्राचीन वर्णनाबरोबर आधुनिक काळातील एक व्याख्याही तपासण्यासारखी आहे. वारकरी कीर्तन परंपरेचे एक अध्वर्यू धुंडामहाराज देगलूरकर यांनी कीर्तनाची बरीच व्यापक व्याख्या केली आहे.[२] त्यांच्या व्याख्येत महाराष्ट्राबाहेर प्रचारात असलेल्या कीर्तनपरंपरांचाही समावेश करणे शक्य आहे. उदाहरणार्थ, त्यांनी निर्देशलेल्या लीलाकीर्तनासाठी गुजराथ वा उत्तर भारतीय परंपरांकडे लक्ष वेधले. बाळकृष्णाच्या लीला आणि संबद्ध कथांना या वाहिलेल्या असतात. याउलट, गुणकीर्तनाचे त्यांचे वर्णन नारदीय कीर्तनास लागू पडते. धुंडामहाराजांचे नामकीर्तनाचे निर्देश वारकरी परंपरेतील कीर्तनास लागू पडतात. नामाचे महत्व आणि उपदेशपर निरूपण वारकरी कीर्तनाचा प्राण होय. भगवन्नामाच्या अखंड उच्चारणास वाहिलेल्या नाम सप्ताहांना नामसंकीर्तन म्हणावयास हरकत नाही. प्रयोगपरंपरांचे अखंडत्व लक्षात घेता निरनिराळ्या कीर्तनपरंपरांचे कालक्रम विचारात घेण्याऐवजी आज प्रचारात असलेल्या कीर्तनपरंपरांची बांधणी कशीकशी झाली असते ते पाहणे अधिक उद्बोधक ठरेल.

## वारकरी कीर्तन

वीणाधारी वारकऱ्याच्या बाजूंना दहा-वीस टाळकरी उभे असतात; त्याच्या डाव्या बाजूस काही अंतरावर मृदंगवादक असतो अशा थाटात भजनाने कीर्तनाची सुरुवात होते. बहुधा भजन असते जय जय राम कृष्ण हरी. वीणाधारी वारकऱ्याचा पुढाकार असतो. तो अनेकदा पुढे-मागे पावले टाकीत भजन करतो. भजनानंतर विठ्ठलमूर्तीचे वर्णन करणारे रूपाचे अभंग घेतले जातात, 'सुंदर ते ध्यान उभे विटेवरी' हा अभंग गायला जातो.

इतका वेळ गादीवर बाजूला बसलेले कीर्तनकार-बोवा आता उभे राहतात. आता टाळकऱ्यांच्या रांगेच्या मधे उभे राहून ते वीणाधाऱ्याकडून वीणा हाती घेतात. वीणाधारी मागे सरकतो. पुन्हा एकदा समूहाने भजन होते, 'रामकृष्ण हरि' किंवा 'ज्ञानेश्वर माऊलि' हे. आता 'रूप पाहता लोचनी' हा अभंग होतो नमनपर आणि पुन्हा 'रामकृष्ण हरि' भजन होते. वारकरी कीर्तनाचा पूर्वार्ध इथे संपतो.

दुसऱ्या अर्धास सुरुवात होते ती निरूपणासाठी बुवांनी निवडलेल्या अभंगाच्या गायनाने. अभंगगायनानंतर विठ्ठल रखुमाई हे भजन समूह गातो आणि मग निरूपणविषय अभंगाच्या पहिल्या दोन ओळी गायल्या जातात, विठ्ठल भजनाचा पुन्हा प्रयोग होतो. बुवा हातचा वीणा मूळच्या वीणाधाऱ्याकडे देतात, देवघेव करताना एकमेकांना वंदन करतात. आता निरूपणाच्या अभंगाचे विवेचन सुरू होते. निरूपण सुरू होण्याआधी बुवा उपरणे कंबरेला कसतात ! निरूपणास दुसरी संज्ञा प्रतिपादन अशीही आहे. निरूपण म्हणजे व्याख्या करणे



आणि शोध घेणे दोन्ही. अर्थ सांगणे आणि विषय स्पष्ट करण्याच्या बुवांच्या प्रयत्नाचे वर्णन भावार्थ सांगणे असे उचितपणे केले जाते. कारण अभंगांचे अन्वयार्थ लावण्यापलीकडे निरूपण पोचते.

दुसऱ्या कीर्तनार्धाच्या अंतिम टप्प्यावर बुवांना हार घातला जातो आणि त्यांच्या भाली बुक्का लावला जातो. बुवा तोच हार वीणाधाऱ्याच्या गळ्यात घालतात. टाळकरी अभंगाच्या पहिल्या दोन ओळी पुन्हा गातात. निरूपणात आता थोडे मार्गांतर होते, घेतलेल्या अभंगापासून काहीशी वाकडी वाट करून बुवा काही चिरंतन तत्त्वांकडे वळतात. उदा., नामाचा महिमा, जन्ममृत्युचक्र कसे भेदावे, संत कसे व्हावे, गुरूचा महिमा किती इत्यादी. मूळ अभंगापासून दूर जाऊन पुन्हा त्याकडे येणे आणि त्यातलाच मुद्दा जणू घट्ट गाठ मारल्याप्रमाणे पुन्हा पुन्हा 'मांडणे यासाठी मांडणी व रचनेचे कौशल्य लागते. मूळ अभंगाच्या प्रत्येक पुनरागमनानंतर 'ज्ञानेश्वर माऊली तुकाराम' या भजनाचा प्रयोग होतो. भजन चालू असता टाळकरी निरनिराळ्या तऱ्हेने आणि एकसाथ पावले धरतात. यानंतर अभंगाची शेवटची ओळ, जीत मुद्रा (रचनाकार संतकवीचे नाव) असते भैरवीसारख्या रागिणीत गाइली जाते. पुन्हा एकदा वीणाधारी पुढे येतो. विठ्ठलभजन होते. विठ्ठल, ज्ञानेश्वर आणि तुकाराम यांच्या आरत्या होतात. पसायदानाचे अभंग होतात आणि सुमारे दोन ते तीन तास चालणारे कीर्तन संपते.

## ऐतिहासिक टिप्पणी

वारकरी कीर्तन संप्रदायाचा जनक संत नामदेव (१२७०–१३५०) मानला जातो. विठ्ठलदर्शनानंतर देवाला पाठ न दाखवता चंद्रभागेच्या वाळवंटात येऊन नामदेव कीर्तन करी अशी प्रांगणीय परंपरा सांगितली जाते. टाळकरी वगैरेंसह घडणारे आजचे कीर्तन विष्णुबुवा जोग (१८६७-१९२०) वा/व भाऊसाहेब काटकर महाराज (१८१३–१८७८) यांनी रूपाला आणले असे नोंदले जाते.[१]

वीणा, पखवाज आणि टाळ इतकीच वाद्ये परंपरेस मान्य आहेत. ताल धुमाळी असतो. रागांबाबत जरासा अप्रत्यक्ष दुवा आहे. इतर संतकवींप्रमाणेच नामदेवाने देशभर यात्रा केल्या. 'ग्रंथसाहिब' या शीख धर्मग्रंथात त्याच्या ६१ रचना अंतर्भूत आहेत आणि निर्देशित रागांची संख्या १८ भरते. वारकरी संचात अधिक राग नसावेत.

निरूपणासाठी फक्त पाच वारकरी संतांचे अभंग घेतले जातात व यासाठी अनेक कारणे सांगितली जातात. आपल्याच अभंगसंचाचा तपशीलवार आणि कसोशीने अभ्यास व्हावा हे महत्त्वाचे कारण.

धोतर, लांब हाताचा अंगरखा, रेशमी वा कापडी फेटा, उपरणे, कपाळावर उभे गंध वा अष्टगंध, बुक्का, कानशिलावर चंदनाच्या मुद्रा आणि 'गळा तुळसीमाळ' असा थाट. वेष पांढरा, एकूण थाटात शुचिता आणि साधेपणावर भर हे ध्यानात येण्यासारखे.

## एकनाथी कीर्तन

एकनाथी कीर्तन वेधक मिश्रण म्हणून नजरेत भरण्यासारखे आहे. संत एकनाथ वारकरी पंथाचे अनुयायी इतकेच नव्हे तर आपल्या साहित्यातून, आचरणातून आणि व्यक्तिमत्त्वातून त्यांनी वारकरी परंपरेला नवीन चैतन्य प्राप्त करून दिले. ज्ञानेश्वरांच्या निधनानंतर तीनशे वर्षांनी 'ज्ञानदेवी'चा पुन्हा शोध लावून पंथीयांच्या भावजीवनाच्या मध्यधारेत तिची प्रतिष्ठापना करण्याचे श्रेयही एकनाथांचे. वारकरी वाचन-पठनांत एकनाथांच्या कृतींचा अंतर्भाव होतो हे स्वाभाविकच म्हटले पाहिजे

एकनाथांची कीर्तनशैली मात्र नारदीय शैलीकडे झुकली होती असे आढळते. या संदर्भात पुढील बाबी ध्यानात घेण्यासारख्या आहेत.

१) कीर्तनमर्यादा सांगणाऱ्या पदात स्वतः एकनाथ 'सगुण चरित्रे' कीर्तनात वर्णावी असे नोंदतात. कथाकथनास पद्धतशीर स्थान देण्यासाठी आख्यान लावणाऱ्या नारदीय परंपरेशी एकनाथांचा धागा जुळतो.[२] वारकरी कीर्तनाच्या निरूपणाच्या निखळ उपदेशकी भूमिकेपेक्षा एकनाथी मोहरा निराळा राहतो.

२) वारकरी सरणीपेक्षा एकनाथी कीर्तन नाट्यात्मतेकडे झुकते. भारुडांचा उपयोग या संदर्भात लक्षणीय असतो. त्याचप्रमाणे शृंगारास जागा असते. एकनाथांच्या गौळणींचे सहज स्मरण व्हावे. एकंदरीने कलात्मता आणि उपदेशकी भूमिकांत कलात्मतेकडे पारडे झुकलेले असते.

३) आजही एकनाथी कीर्तनकाराची शैली नारदीय कीर्तनाशी जवळीक साधते.

४) पगडी, अंगरखा आणि रेशीमकाठी किनारीचे उपरणे हा एकनाथी कीर्तनकाराचा पोषाखही नारदीय जातकुळी सांगतो.

## रामदासी कीर्तन

संत रामदासांच्या (१६०८–१६८१) व्यक्तित्वाचा ठसा नारदीय कीर्तनावर आढळू लागल्यामुळे प्रस्तुत शैली तयार होते. राजकीय-नैतिक बाबींत उपदेशकाची भूमिका बजावणाऱ्या रामदासांचे कीर्तनही वेगळ्या वळणाचे असावे याचे नवल वाटू नये. स्वतः कीर्तनकार असलेल्या रामदासांनी कीर्तनाचा महिमा गायला आहे, भक्तांनी कीर्तन करावे असा आग्रह धरला आहे इतकेच नव्हे तर आपल्या नेहमीच्या बारकाईने कीर्तन कसे असावे याचा तपशीलही वर्णिला आहे.[१] रामदासांच्या विवरणावरून त्यांनी प्रसृत केलेल्या कीर्तनशैलीची काही महत्त्वाची तथ्ये हाती लागतात :

१) कीर्तन वेधक, रंजक आणि उपदेशपर असावे हा एकनाथी कीर्तनमार्ग रामदासी परंपरेनेही स्वीकार्य मानला आहे.

२) नृत्य, गायन, विनोद, शृंगारिक पद्य, छंद, विविधता वगैरेंचा पुरस्कार करून कलात्मता व कारागिरीला प्रस्तुत परंपरेने वरचा क्रम दिला आहे.

३) रामदासकालापासूनच कीर्तनाला राजाश्रय मिळू लागला म्हणावयास हरकत नसावी. आपल्या गुरुपरंपरेतील मठांना छत्रपती शिवाजीने उदार आश्रय दिला. मठाधिपतींनी साजऱ्या करावयाच्या उत्सवात वगैरे कीर्तनाचे स्थान निरपवाद होते.

४) वाद्ये, छंद आणि वापरलेले साहित्य विविध उगमांचे असावे यासाठी (एकनाथी पूर्वजांप्रमाणेच) रामदासी कीर्तनानेही लोकसाहित्यादींचा वारसा धुंडाळला. व्यापक श्रोतृवृंद आकर्षून घेण्याचा हा मार्ग होय. एका ठायी न वसण्याच्या रामदासी परंपरेमुळे आपल्या कीर्तनसंचाद्वारा सांगीतिक साक्षरताप्रसार साधण्यात प्रस्तुत कीर्तनकार यशस्वी झाले असणार.

इतर विशेष :

दाढी, जटा, भगवी कफनी आणि उपरणे वा कधी त्याच रंगाचा फेटा रामदासी कीर्तनकाराचा वेगळेपणा सिद्ध करतात.

कीर्तनाची बांधणी नारदीय कीर्तनासारखीच असते. नमनास ' जय जय राम कृष्ण हरि ' व नंतर ' रामदास माऊली ' हे स्तवनपर पद्य. प्रतिपाद्य अभंग घेऊन पूर्वरंग आकारास येतो. रामदासचरित्रातील प्रसंगावर आख्यान आधारून उत्तररंग तयार. रामदासांच्या वचनांचे पदोपदी आधार घेतले जातात. पेटी, तबला, टाळकऱ्यांची साथ असते.

## नारदीय कीर्तन

एखाद्या नायककेंद्रित नाटकात रंगमंचावर नायक नसला तरी त्याचे अस्तित्व सारखे जाणवत राहावे तसे नारदीय कीर्तनाचे झाले आहे. इतर परंपरांची चर्चा करत असतानाही नारदीय कीर्तनाचा संदर्भ भोवती वावरत राहिला आहे. विशेषतः महाराष्ट्रात प्रस्तुत परंपरेचा विकास भरघोस झाला असल्याकारणाने कीर्तनाचे एकंदर विशेष तपासताना नारदीय कीर्तन ध्यानात घेतल्यास विवरण सोपे होते. प्रमुख वैशिष्ट्यांची पुढील चर्चा उपयुक्त ठरावी.

नमन अथवा मंगलाचरण :

कीर्तनकारास बहुधा बुवा म्हणतात. गणेश, सरस्वती, कुलदेवता, ग्रामदेवता आणि गुरू यांना संगीत नमन करून कीर्तनारंभ होतो.

जयजयकाराचे पद :

यानंतर जय जय राम कृष्ण हरि या पदाचे गायन (पठण नव्हे) होते. या पदाच्या एका रूढ नमुन्यात शुक आणि व्यास या आद्य कीर्तनकारांचा औचित्यपूर्ण निर्देश असतो. पुढे गुरुस्तुती. या टप्प्यावर बहुतेक कीर्तनकार भजन घेतात आणि श्रोत्यांनी त्यात सामील व्हावे असे वारंवार विनवितात.

पूर्वरंग : अभंग वा पद :

कीर्तनाचा खरा आरंभ पूर्वरंगाने होतो म्हटले पाहिजे. कीर्तनाच्या या पहिल्या अर्धात एखाद्या अभंगाच्या वा पदाच्या आधारे विशिष्ट विषयाचे धार्मिक–तात्त्विक–उपदेशपर विवरण केले जाते. भारताच्या इतर भागांतील व भाषांतील संतकवींच्या रचना आधारभूत धरण्याचे परंपरेस वावडे नसते. उदाहरणार्थ सूरदास, मीराबाई, तुलसीदास, नरसी मेहता इत्यादींच्या पदांची योजना आढळते.

प्रस्तुत पद वा अभंग रागतालादी चौकटीत नीटपणे बांधलेले असते इतकेच नव्हे तर सादरीकरणात सांगीतिक विस्तारही केला जातो. विषयविस्तार करीत असता पुन्हा पुन्हा बुवा पद/अभंगाकडे येतात आणि त्याचे गायन वारंवार करतात. अंशतः आणि अधिक




द्रुतगतीने अनेकदा पद/अभंगाच्या रागातच मध्येच एखादा तरानाही गातात. शिकवण पक्की ठसावी म्हणून उपदेशपर रचनेची भागशः, निरनिराळ्या लयींत आणि वारंवार पुनरावृत्ती केली जाते हे उघड आहे.

विषयविस्तारात बुवांची बहुश्रुतता प्रत्ययास येते. संस्कृत आणि मराठी साहित्यपरंपरांतून पोषक उदाहरणे, अवतरणे, कथा, चतुरोक्ती, युक्तिवाद विपुल आणि रसाळपणे देता येणे बुवांच्या विद्वत्तेचे आणि कलाकारीचे गमक मानण्यात येते. श्रुती, स्मृती, पुराणे आणि न्याय, व्याकरण, वेदान्तादींचा अभ्यास बुवांना आवश्यक ठरतो. मराठी वाङ्मयपरंपरेतील संत व पंतकवींवर भर दिसून येतो. एकंदरीने पूर्वरंगात बुवांच्या विद्वत्तेचा, बुद्धिमत्तेचा आणि तात्त्विक प्रगल्भतेचा कस लागतो. याशिवाय गुरुमुखातून घेण्याच्या इतर विद्यांप्रमाणे कीर्तनातही वक्तृत्व, तत्कालस्फूर्तता, कल्पनासाहचर्याची विविधता आणि अनेकरंगी सादरीकरणावर भर असतो. विवेचनाकरिता घेतलेल्या अभंग/पदाचे तात्पर्य सिद्ध व्हावे आणि ऐकणाऱ्याच्या मनावर ठसावे म्हणून बुवा कसोशीचा प्रयत्न करतात. अनेक विषयांतरे, मार्गांतरे करीत करीत पुन्हा अभंग/पदाकडे शेवटी येतात आणि तिथे पूर्वरंग संपतो.

भजन : पूर्वरंग संपल्यावर पुन्हा एकदा श्रोत्यांसह भजन केले जाते.

उत्तररंग : नारदीय कीर्तनाच्या दुसऱ्या अर्धास उत्तररंग म्हणतात.

प्रारंभी कीर्तन ठरविणारा आयोजक / यजमान बुक्का आणि हार आणतो. बुवांसमोर बसलेल्या मान्यवरांना बुक्का लावला जातो. बुवांना हार आणि बुक्का. बुवा बुक्का चारी बाजूंना उधळतात.

आता भजन केले जाते, सामूहिक आणि वाढत्या लयीने. गजर होतो. मात्र गजर एखाद्या विशिष्ट पंथापुरता मर्यादित नसतो.

गजरानंतर एखादे पद सादर केले जाते, अगदी आलाप, तान, तिहाई वगैरे सर्व खास संगीतविशेषांसह. काही वेळा कलासंगीतातील बंदिश गायली जाते. खुद्द बुवा तितके चांगले गाणारे नसले तर हार्मोनियमवादकाला गायला वाव दिला जातो. निष्कर्ष असा की सांगीतिक दृष्ट्या दर्जेदार गायन व्हावे असा हेतू असतो.

आख्यान : पूर्वरंगांतील पद/अभंगाच्या नैतिक/बोधपर आशयास पुष्टी देईल असे कथानक हा आख्यानाचा विशेष. कंबरेभोवती उपरणे कसून बुवा आख्यान लावतात आणि आपला आगळा एकपात्री प्रयोग सुरू करतात. संवाद, गायन, गजर, हावभाव, हालचाल / नृत्य, मूकाभिनय इत्यादींच्या कुशल वापरांतून आख्यान रंगविले जाते. महाकाव्ये, पुराणे वा संतचरित्रे धुंडाळून कथा निवडलेली असते. मोरोपंतादी पंतकवींच्या रचनांचा मुबलक वापर ध्यान खेचणारा असतो. पूर्वरंगात बुवांची व्युत्पन्नता कसाला लागते तर उत्तररंगात त्यांच्या रसिक व्यक्तित्वाचा आणि कलाकारीचा प्रत्यय येतो.

मूळपद : आख्यान वेधक, मनोरंजक आणि सादरीकरण कलात्मक असले तरी बोधपर अभंगादींचे तात्पर्य ठाशीवपणे समोर आगणे हा मूळ हेतू नजरेआड केला जात नाही. म्हणून बोधपर तत्त्वे आणि आख्यानातील घटनांचा जुळता अन्वयार्थ यांचे सारखेपण सतत दाखविले जाते. बुवांची कथा एकसारखी मूळ पदावर आणली जाते ती अशी ! मूळ पदाकडे वेगवेगळ्या संदर्भांतून पुन्हा पुन्हा येताना जी बेमालूम सांधेजोड करावी लागते, तीत बुवांच्या कल्पकतेचा निश्चित कस लागतो.

पसायदान : शेवटी देवतांचे स्मरण करून आरती होते. श्रोत्यांचा सहभाग अपेक्षित असतो. तबक फिरविले जाते व त्यात श्रोत्यांनी यथाशक्ती धन वाहावे अशी रूढी. बुवांनी देवतेला घातलेल्या साष्टांग दंडवतानंतर कीर्तन संपते.

### ऐतिहासिक टिप्पणी

प्राचीन इतिहास सोडल्यास संत एकनाथांच्या काळी (१५४८–१५९९) नारदीय कीर्तनास आकार आला म्हणणे तर्कपूत ठरेल. निखळ बोधपरता आणि काहीसे यांत्रिक नामसंकीर्तन यांपासून एकनाथांमुळे कीर्तन दूर सरकले असे म्हणता येईल. संत रामदासांच्या काळी (१६०८–१६६१) मिळालेला राजाश्रय आणि रामदासांची बोधरंजनाची व्यापक दृष्टी या कारणांनी प्रस्तुत परंपरेने विकासाचा पुढचा टप्पा गाठला. साहित्य आणि संगीतातील 'लोक'रंगावरचा रामदासी भर ध्यानात घेण्यासारखा होता. भौतिकाला नाकारून आध्यात्मिक वर चढविणे रामदासांना मंजूर नव्हते. त्यांच्या कलाकारीतही नाजूक नागरपणापेक्षा जोमदार प्रवृत्तिपरतेचा आढळ होता.

अनुक्रमणिका






उत्तर पेशवाईतील (१८ वे शतक) कीर्तनविलास **ही पुढची अवस्था** होय. नारदीय कीर्तनपरंपरेच्या स्वरूपनिश्चितीच्या दृष्टीने पाहता प्रस्तुत कालखंडातील **पुढील बाबी** ध्यानात घेण्यासारख्या आहेत :

१) प्रस्तुत कालखंडापासून पंत/भक्त कवींवरच परंपरेचा भर वाढला (उदा. श्रीधर १६५८–१७२९, मध्वमुनीश्वर १६८०–१७३४, अमृतराय १६९८–१७५३, महीपतीबुवा ताहराबादकर १७१५–१७९०, मोरोपंत १७२४–१७९४).

२) तमाशात नाव कमावलेले अनंत फंदी (१७४४–१८१९) व राम जोशी (१७५८–१८१३) यांसारखे कलाकार नारदीय कीर्तनाकडे वळू शकत होते कारण कीर्तनाचे रूप अधिक प्रतिष्ठित असले तरी बहुरूपी आणि रंजनधर्मी होते.

३) दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत अंताजी माणकेश्वर राज/दरबारी कीर्तनकार म्हणून नियुक्त झाला.

४) संबधित कालखंडात कलात्मतेकडे पारडे झुकल्याची इतरही लक्षणे दिसून येतात. बैठकीची लावणी नावारूपास पोचली ती याच काली. हिंदुस्थानी कलासंगीत आणि संगीतकारांना महाराष्ट्रात भरीव आश्रय मिळू लागला तोही याच युगात. कलात्मकतेकडे झुकलेली नारदीय कीर्तनपरंपरा सुटी घटना नसून एका व्यापक परिस्थितीचा परिणाम होती.

१८१८ नंतरचा, ब्रिटिश म्हणून वर्णिला जाणारा काळ कीर्तनपरंपरेच्या दृष्टीने पाहता काही महत्त्वाच्या घटना नोंदवितो.

अ) प्रस्तुत कालखंडातील अनेक कीर्तनकारांनी आपल्या गायनकौशल्यासाठी नाव कमावले. काहींचा नामनिर्देश इथे केला आहे.

विठोबाअण्णा दप्तरदार (१८०३–१८७३) : यांनी एका संन्याशाकडे गायनशिक्षण घेतल्याचे ऐकिवात होते.

गोविंदबुवा होशिंग : तिन्ही सप्तकांत लीलया फिरणाऱ्या आवाजाबद्दल प्रसिद्धी. ग्वाल्हेर घराण्याचे सुप्रसिद्ध हद्दू खां व हस्सू खां यांच्याकडून तारीफ.

गंगाधरबुवा काशीकर : धृपद-धमार, ख्याल, टप्पा व ठुमरी गात. ग्वाल्हेर घराण्याच्या परंपरेतील गायक.

नारायणबुवा गोगटे-फलटणकर : अण्णासाहेब किर्लोस्करांचे समकालीन. नाटकाचा श्रोतृवृंद नाटक सोडून यांच्या कीर्तनास लोटे असा लौकिक ! आकर्षक आवाज व शैली.

पिलुबुवा फलटणकर : लावणी उत्तम गात अशी प्रसिद्धी.

विष्णुबुवा ललित : महाराष्ट्राच्या किनारपट्टीत नाव. ताल इतका पक्का की मोठमोठे पखवाजी वचकून असत !

मोरेश्वरबुवा (जोशी) (मृ. १९१२) : कीर्तनकारांच्या चार पिढ्यांतील पहिल्या पिढीचे प्रतिनिधी. ग्वाल्हेर घराणे. धृपद–धमार गायन प्रसिद्ध.

कृष्णबुवा कवीश्वर (ज. १९१४) : पिढीजात कीर्तनकार व तराना इ. संगीतप्रकारांच्या गायनाबद्दल प्रसिद्ध.

हरिबुवा कऱ्हाडकर : गोड व चढा आवाज. आकर्षक गायनासाठी प्रसिद्ध.

ब) सुमारे १८८० च्या आसपास कीर्तनकारांनी साथीसाठी पायपेटी घेण्यास सुरुवात केली. सांगीतिक शक्यता नव्याने न धुंडाळल्यास परकी वाद्य सामावून घेणे कसे रुचले असते ?

क) नारदीय परंपरेचे 'पूर्वरंग–उत्तररंग' स्वरूप गोविंदबुवा होशिंग यांनी प्रस्तुत कालखंडात कायम केले असे कथन. गोविंदबुवांना एक कलात्म क्रांती घडविल्याचे श्रेय द्यायला हवे इतके नारदीय कीर्तनाचे रूप आगळे आणि परिणामकारक आहे! बुवांनी पुढे काशीला तारकाश्रम स्थापला आणि म्हणून त्यांच्या पठडीस तारकाश्रम संप्रदाय म्हणण्याचा प्रघात.

ड) उघड उघट कलात्म व कारागिरीचे म्हणता येतील असे काही विशेष इतर काही कीर्तनकारांबाबत नोंदविले गेले आहेत. उदाहरणार्थ :

हिंदुस्थानी कलासंगीतातील प्रावीण्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या गंगाधरबुवा काशीकरांचा जोड-आख्याने लावण्याबद्दल लौकिक असे ! दोन्ही आख्याने निरनिराळ्या भाषांत लावीत हे अधिक. एकदा एका उत्सवी कीर्तनमालिकेत पाच पूर्वरंग राम शब्दावर व पाच 'मरा' वर केले !

गणेशशास्त्री मोडक हे अंध कीर्तनकार. पंतकवींच्या रचना सोडवून सांगण्याबद्दल त्यांची इतकी ख्याती की पदव्युत्तर साहित्याभ्यासक त्यांच्या कीर्तनास येऊन टिपणे काढीत ! मोरोपंतांचे आर्याभारत विवरण

अनुक्रमणिका

करण्याबद्दल मुंबईच्या रामकृष्णबुवा ढोल्यांची ख्याती होती.

पिलुबुवा वडुजकरांची बांधीव कीर्तनाबद्दल ख्याती होती. आपले गद्य–पद्य विवरण ते फार दक्षतेने आखीत. मुरलीधरबुवा निजामपुरकरांचे नाव होते कीर्तनात हमखास रंग भरण्याच्या क्षमतेबद्दल.

प) नारदीय कीर्तनास मिळणारा राजाश्रय प्रस्तुत कालखंडात आम प्रघात झाल्यासारखा विपुल दिसतो.

ग्वाल्हेरचे जिवाजी महाराज गोविंदबुवा होशिंगांना गुरू मानत. बुवांची महाराजांनी रत्नपूजा केली होती. होळकरही बुवांना फार मानीत.

नेपाळ नरेशापासून अनेक नृपतींची रामचंद्रबुवा काशीकरांना आमंत्रणे असत. श्रीधरशास्त्री देशपांडे-नामक कीर्तनकार हिंदी, मराठी, गुजराती आणि संस्कृत भाषांत कीर्तन करीत ! तंजोर ते नेपाळ अनेक नरेश त्यांना मानीत. बुवांना बिदागीदाखल सोनेनाणेही मिळे !

फ ) परंपरेच्या चौफेर वाढीचे एक निदर्शन असे की कीर्तनकारांना मार्गदर्शक वाङ्मय प्रचुरपणे लिहिले जाऊ लागले. कीर्तनकारांची पिढीजात बाडे या संदर्भात प्रसिद्ध आहेत. कीर्तन आणि कीर्तनकार सांस्कृतिक दृष्टचा महत्त्वाचे वाटू लागल्यामुळे कीर्तन परिषदांचे आयोजन होऊ लागले. कीर्तनाचे शिक्षण देणाऱ्या संस्थांची स्थापनासुद्धा म्हणूनच महत्त्वाची. काही प्रयत्न पुढीलप्रमाणे नोंदता येतील :

**संस्था** : श्री हरिकीर्तनोत्तेजक सभा, पुणे, १८८३.
भद्रकाली मंदिर कीर्तन संस्था, नाशिक, १८९८.
कीर्तन पाठशाळा, पुणे, १९२७.
अखिल भारतीय कीर्तन संस्था, मुंबई, १९४०.

**कीर्तन संमेलने** :
नागपूर, १९१२, अध्यक्ष : दादासाहेब खापर्डे.
नागपूर १९१८, अध्यक्ष : लोकमान्य टिळक.

**पुस्तके** :
कीर्तनाचार्यकम्, संस्कृत, भागवत, काशी.
कीर्तन : कला आणि शास्त्र, कोल्हटकर.

## इतर विशेष

पांढरे धोतर, अंगरखा, उपरणे आणि लाल पगडी हा बुवांचा वेष असून डाव्या हातात मंजिऱ्या तर उजवा हात आविष्कारक हातवाऱ्यांसाठी मोकळा राहतो.

बहुधा कीर्तने देवळात होतात. बुवा देवाकडे तोंड करून उभे ठाकतात, अनेक वेळा गालिचा वा तत्सम खास चीज आंथरून. बुवा यावर मागे-पुढे करतात. हा गालिचा इ. नारदाचे रंगपीठच म्हणावयाचे. यावर इतर कोणी न बसण्याचा प्रघात पावित्र्यदर्शक मानायला हवा. बुवांच्या देवदर्शनात कशाचा अडथळा येऊ नये अशी दक्षता घेतली जाते. काही अंतरावर, स्वतः-समोर बुवा अनेकदा स्वतःचे इष्टदैवत / गुरू वगैरेंचे चित्र व त्यासमोर एखादी थाळी ठेवतात. भक्तमंडळी या थाळीत तांदूळ, फळे वगैरे स्वतःची भेट ठेऊ शकतात.

बुवांच्या डाव्या बाजूस पायपेटीवादक आणि त्याच्या मागे श्रोत्यांमधील स्त्रीवर्ग बसतो. उजवीकडे तबलावादक व त्याच्यामागे पुरुष श्रोते. झांज, वॉयलीन इ. साथीदार घेतल्यास ते बुवांच्या मागे बसतात.

### क

महाराष्ट्रातील वारकरी आणि नारदीय कीर्तन-परंपरांचे स्वरूप पाहिल्यावर प्रेरणा, कार्य आणि विकसनप्रवृत्ती यांविषयी काही निष्कर्ष ध्यानी येतात.

दोन्ही परंपरांचे श्रोत्यांबरोबरचे नाते एकाच प्रकारचे नाही. सामूहिक मनापर्यंत पोचावयाचे दोहोंचे उद्दिष्ट असले तरी प्रयोगदृष्टचा पाहता नारदीय कीर्तन एकत्व (सोलो) असते. याउलट निरूपणकर्ता, टाळकरी यांचा स्वतःचाच एक समूह असतो; शिवाय श्रोत्यांना ज्या तऱ्हेने आणि जितक्या वेळा कीर्तनात सामील होण्याचे आवाहन केले जाते (भजन, गजर इ. मधून) की त्यावरून वारकरी कीर्तन म्हणजे एक सामूहिक भक्तिक्रियाच होय असे म्हटले पाहिजे. विशिष्ट अभंग, त्यांचा विशिष्ट क्रम, श्रोत्यांच्या सामील होण्याविषयीचे निश्चित संकेत वगैरेंमुळे श्रोत्यांचा सहभाग इतका भरीव असतो की श्रोते प्रयोगकर्तेच बनतात. तुलनेने पाहता नारदीय कीर्तनकाराचा संच पेटी, तबला, कीर्तनकार येवढचापुरता मर्यादित असतो. कलासंगीताच्या मैफलीचा संच असाच कार्य करतो हा अपघात नव्हे. वारकरी कीर्तनकाराचा मृदंगसुद्धा डावीकडे ! नारदीय कीर्तनाने व कीर्तनकाराने आपल्यापुढे कलासंगीताचा नमुना ठेवला असावा म्हणण्यात अतिशयोक्ती होणार नाही. कीर्तन व मैफल यामागच्या प्रेरणांमध्ये समानता असल्याशिवाय नारदीय कीर्तनकाराला अशी स्फूर्ती झाली नसती. प्राचीन नामसंकीर्तन व समकालीन वाट-

करी कीर्तन यांच्यापासून दूर जात कलात्मतेकडे झुकलेली नारदीय प्रयोगपरंपरा उत्तर पेशवाईत रूपास आली कारण एकंदर वातावरण अशा घडामोडीस पोषक होते.

कलात्म प्रेरणांनी सिद्ध होणाऱ्या प्रयोगांत कलाकार आणि श्रोते यांचे नाते एका निराळ्या प्रकारचे असते. श्रोत्यांच्या संख्येपेक्षा अशा वेळी त्यांच्या गुणवत्तेवर बरेच अवलंबून असते. कलात्मतेच्या अंगाने उभे राहणाऱ्या प्रयोगांतील कलाकाराला श्रोत्यांना कला व कारागिरीद्वारा जिंकायचे असते. अशा वेळेला श्रोता पहिल्यापासून दक्ष असला तरी सुरुवातीपासून तो आस्वादक भूमिकेत नसतो. दुसऱ्या शब्दांत वर्णावयाचे तर कलात्मप्रयोगात एक संघर्ष-परिस्थिती अस्तित्वात असते आणि कलाकाराचे प्रभुत्व मान्य करण्याआधी श्रोते त्याची कसून परीक्षा घेत असतात. मैफली कलाकाराप्रमाणे कीर्तनकारही कीर्तनात रंग भरला व न भरल्याची भाषा करतो याचा अर्थ स्पष्ट आहे.

वारकरी कीर्तनाची अवस्था थोडी निराळीच म्हटली पाहिजे. वारकरी कीर्तनकार एका धर्मपंथाचा प्रतिनिधी व प्रवक्ता असतो. तत्त्वज्ञानाने व शिस्तीने बांधलेल्या एका दीक्षाधारी समूहासाठी तो बोलत असतो. कीर्तनकार आणि त्याचे श्रोते एकाच साखळीचे दुवे असतात. सर्वजण वारकरी असल्याकारणाने त्यांचे कीर्तन विशिष्ट स्वरूपाचे होते. अशा परिस्थितीत प्रयोगकर्ता–श्रोता एकमेकांस पहिल्यापासून स्वीकारते झाले तर नवल काय ? नारदीय कीर्तनातील श्रोत्याप्रमाणे वारकरी कीर्तनातील श्रोता संघर्ष-परिस्थिती निर्माण करीत नाही. आपली कलात्मता व कारागिरी सिद्ध करून श्रोत्यांना मान डोलवायला लावील अशा ईर्ष्येने वारकरी निरूपणकारास सज्ज व्हावे लागत नाही. व्यक्तिगत कामगिरीला वारकरी कीर्तनात वाव कमी असतो, आव्हान कमी असते. नारदीय कीर्तनाचे बहुसंध, व्यक्तिवादी, कलात्म-नाट्यात्म स्वरूप आणि वारकरी कीर्तनाचे एकसंध, सामूहिक आणि पंथवाचक रूप यांत मूलभूत भेद आहेत.

या संदर्भात एक ताळा नोंदण्यासारखा आहे. वारकरी कीर्तनात एकत्व, कलात्म आणि बहुविध संगीतपरतेस वाव नसल्याकारणाने वारकरी भजनाचा थाट वारकरी कीर्तनापेक्षा निराळा झाला. त्यांत एकत्व गायन पुढे आले, गायन कलासंगीतादींच्या जवळ सरकले आणि श्रोता खरोखर श्रोता झाला. शिवाय निरूपणाला जागा नसल्याकारणाने बोधपरतेचा अंकुश गेला. याच चालीवर नारदीय पठडीला निखळ कथाकथनाला पुराण आणि तत्त्वचर्चेला प्रवचन संपर्कप्रकार लाभले हे ध्यानात घेण्यासारखे आहे. असो.

नारदीय कीर्तनाची कलात्मता सहज ध्यानात येते. मूळ आचार्य नारद हाच संगीताचार्य होता ! पण अधिक महत्त्वाची आहे कीर्तनाची बांधणी. तात्त्विक चर्चेचा पहिला अर्ध व दुसऱ्या अर्धातील कथाकथन यांना सतत बरोबर चालवावे लागते. संगीतादींचा योग्य व वेधक उपयोग करावा लागतो. पांथिक बंधांनी ज्यांचे इमान बांधलेले नाही असा श्रोता नारदीय कीर्तनकाराला आपलासा करावा लागतो. परिणामी नारदीय कीर्तन बहुविध, बहुसंध व बहुद्देशी होते– एखाद्या नाट्यप्रयोगासारखे. मराठी संगीत नाटकाला आपले आरंभाधार नारदीय कीर्तनात शोधावेसे वाटले, वारकरी कीर्तनात नव्हे याला आंतरिक कारण होते.

नारदीय कीर्तनकाराच्या साधनेत त्याच्या प्रेरणाचे प्रतिबिंब उमटते. अनेक वर्षांची त्याची साधना परिणाम साधता यावा या उद्देशाने केली जाते. पाठांतरावर भर असतो पण तरीही पूर्ण पूर्वरंग, विषयवारीने एकत्र केलेली अवतरणे, पद्ये लिहून बाडे तयार केली जातात. यांचे पिढ्यान् पिढ्या जतन केले जाते आणि त्याबाबत बराच गुप्तपणा पाळला जातो. (इथेही हिंदुस्थानी संगीतकारांच्या प्रघाताची आठवण व्हावी). आख्यानांच्या तयारीतही विविधता आणि परिणामकारकता महत्त्वाच्या बाबी मानल्या जातात. नारदीय कीर्तनकार पंतकवींची पदे **गातात**, अनेकांना लावण्या चांगल्या येत. अनेकांनी हिंदुस्थानी कलासंगीताचा अभ्यास व तालीम आवश्यक मानली. प्रस्तुत सर्व खुणा नारदीय कीर्तनाच्या कलापरतेच्या आहेत.

नारदीय कीर्तनपरंपरेने कोणती वाद्ये आपलीशी केली ते पाहणेही अर्थपूर्ण आहे. कधीकधी नारदीयांनी स्वीकारलेली तंबुरी, पायपेटी, मृदंग/तबला, मंजिऱ्या, चिपळ्या आणि वारकरी पंथीयांचा वीणा, पखवाज/मृदंग व टाळ पहिल्याचा सांगीतिक सुधारणावाद आणि दुसऱ्याचा परंपरावाद दर्शवितात. नारदीयांना रंजनक्षमता महत्त्वाची वाटते असा निष्कर्ष आहे.

अनुक्रमणिका






आधुनिकतावादाने विशेषाभ्यासाला उत्तेजन मिळते. धर्मक्षेत्रातील मौखिक परंपरेला भजन, पुराण, प्रवचन, कीर्तन यांसारखे अनेक भक्तिमार्ग उत्क्रांत करावे लागले, कारण विविध कालखंडांत आधुनिकतावादाचा रेटा जाणवत गेला. तत्कालीन बोधनप्रकार, रंजनप्रकार, रंगकला, श्रोते आणि आश्रयदाते वगैरेंच्या स्वरूपांचा संकलित परिणाम होत होत कीर्तनादी प्रकार सिद्धीस आले. धर्मपर वा भक्तिपर वगैरे ढोबळ वर्णनाने बोळवण न करता संपर्कक्रियेतील गुंतागुंतीच्या घटना म्हणून त्यांचा अभ्यास व्हायला हवा.

**टीपा–**

१) कोपरकर, गं. ना., **पायोक नारदाचे,** स्वतः , पुणे, १९७७, परिशिष्ट ४, पृ. ४.
२) उपरि.
३) पाठक, यशवंत; **नाचू कीर्तनाचे रंगी;** कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे, १९८०, पृ. ७९.
४) कोपरकर, तत्रैव, परिशिष्ट ५, पृ. ५४.
५) **सार्थ श्रीदासबोध;** संपा. नारायणमहाराज रामदासी, के. भि. ढवळे; मुंबई, १९६७, ४–२–१३१–३४,





अनुक्रमणिका








# विज्ञानातील आत्मभाव आणि वादग्रस्तता*

र. गो. लागू

या लेखाचे शीर्षक वाचून कदाचित एखाद्याला चमकल्यासारखे होईल. विज्ञान हा वस्तुनिष्ठ अभ्यास-विषय आहे, त्यात भावनोद्दीपनाला जागा नाही, अशी सर्वसामान्यांची, जे विज्ञानात अनभिज्ञ आहेत त्यांची ढोबळ समजूत असते. परंतु वैज्ञानिक शोधांच्या जन्म-क्षणी वैज्ञानिकांना त्यांचा भावनावेग आवरता आला नाही, याचे उल्लेख विज्ञानेतिहासात अनेक ठिकाणी आढळून येतात. अशा प्रकारचा उत्कट आत्मानुभव फक्त वैज्ञानिकालाच येऊ शकतो आणि केवळ विज्ञानच त्याच्या मनात अशा अगम्य अवस्थेचे अवतरण करू शकते. यासाठी लुई पाश्चरचे उदाहरण घेता येईल. काही पदार्थांच्या द्रावणामधून ध्रुवित प्रकाश (Polarised light) जाताना त्या प्रकाशलहरींचा दोलन-सदिश काही कोनातून फिरतो, याला "प्रकाशीय वलन" (Optical rotation) असे म्हणतात. तो सदिश उजवीकडे फिरले की डावीकडे, हे अर्थात त्या पदार्थांवर अवलंबून असते. काही पदार्थ दक्षिणावर्ती (दोलन-सदिश उजवीकडे फिरविणारे) तर काही वामावर्ती (डावीकडे फिरविणारे) असतात. काही पदार्थांत हे दोन्हीही घटक उपस्थित असतात. लुई पाश्चरने जेव्हा दक्षिणावर्ती व वामावर्ती टार्टरेट्स (संयुगाचा एक वर्ग) वेगळी करण्यात यश मिळविले तेव्हा, असे सांगतात की, हा परिपक्व वैज्ञानिकही आनंदाने बेभान झाला आणि त्या आवेगात प्रयोगशाळेच्या बाहेर पळत येऊन त्याने चक्क एका साहाय्यकाला कडकडून मिठी मारली. केपलरच्या बाबतीतही हेच दिसते. इ. स. १६१९ मध्ये लिहिलेल्या आपल्या 'Harmonices Mundi' या ग्रंथात केपलरने सूर्याभोवती फिरणाऱ्या ग्रहांच्या गती-संबंधीचा त्याचा तिसरा नियम जाहीर केला. या ग्रंथातील पुढील उताऱ्यावरून त्याची उत्कट भावावस्था स्वच्छपणे प्रतीत होते. केपलर लिहितो—

"... मला कुणी थांबवू शकत नाही. मी माझ्या पवित्र सर्जनावेगात वाहून जात आहे. तुम्ही जर माफ कराल तर मी त्यात बेहोष होणार आहे. तुम्ही जर नाक मुरडणार असाल तर तेही मी सहन करणार आहे. देवाचे फासे आता पुढ्यात पडले आहेत, ग्रंथ लिहून झाला आहे. तो ग्रंथ कुणी वाचो अगर न वाचो, मला त्याची क्षिती नाही. स्वतः निर्माण केलेली अद्‌भुत विश्वरचना मनुष्याने चिंतनात सामावून घ्यावी म्हणून तो सर्वशक्तिमान परमेश्वर जर ६००० वर्षे तिष्ठत राहिला तर या नवीन ज्ञानाचे ग्रहण करण्यासाठी, पहिला वाचक भेटेपर्यंत, हा ग्रंथही शंभर वर्षे वाट पहायला तयार आहे. ..."

विज्ञानातील शोध लागताना निर्माण होणारे असे भावनोद्रेक आता सुपरिचित आहेत. मात्र अशा आवेगांमुळे शोधाच्या उपलब्धींवर काहीच परिणाम होत नाही, असे समजले जाते. विज्ञानाचा उगम जरी उद्दीपित आत्मभावाशी (Passion) निगडित असला तरी सर्वमान्य विज्ञानाचे क्षेत्र पूर्णपणे वस्तुनिष्ठ असते, असाच दृष्टिकोण सर्वस्वीकृत असतो. या लेखाच्या शीर्षकात "विज्ञानातील आत्मभाव" (Passions in Science) असा उल्लेख मी केला आहे आणि हे भावोद्दीपन केवळ मानवी मनाच्या पातळीवरील एक आगंतुक छायाक्रीडा नसून त्याच्याद्वारे विज्ञानाला एक अपरिहार्य योगदान करण्याचे तर्कशुद्ध कार्य घडते, हे दाखविण्याचा प्रयत्न मी येथे करणार आहे. कोणत्याही वैज्ञानिक विधानाला अंतर्भूत अशी एक गुणवत्ता, एक सत्यपातळी, असते. वैज्ञानिकाच्या मनातील आत्मभाव हा त्या गुणवत्तेला दिलेला प्रतिसाद असतो. ती गुणवत्ता जर आपल्याला वस्तुतः दिसली तर आपण ते विधान योग्य म्हणून स्वीकारतो, अन्यथा ते चुकीचे ठरते.

---

* मायकेल पोलान्यी यांच्या 'Passion and Controversy in Science' या लेखाच्या काही भागाचा अनुवाद.







ही गुणवत्ता कोणत्या प्रकारची असते? आत्मभावामुळे वस्तूंवर भावनांचे अवगुंठन चढते व त्याप्रमाणे त्या वस्तू आपल्या मनाला आकर्षक किंवा त्याज्य वाटतात. जर जवळिकेचे आत्मभाव निर्माण झाले तर काही तरी मौल्यवान, महत्त्वाचे गवसल्याची खात्री पटते. शोध लागण्याच्या वेळी होणारे वैज्ञानिकांचे भावनोद्दीपन एक प्रकारच्या बौद्धिक आत्मभावाशी संबंधित असते. बौद्धिक दृष्टचा काहीतरी महत्त्वाचे हाताशी आले आहे, विशेषतः विज्ञानाच्या संदर्भात ते अतिशय किमती आहे, याची ग्वाही या आत्मभावामुळे वैज्ञानिकाला मिळते. सर्जनक्षणी मनात अवतरणारा हा विश्वास, खरे म्हणजे विज्ञानाचाच एक भाग असतो. आधी उद्धृत केलेले केपलरचे शब्द हे तसे बाह्य विश्वातील एखादी ठोस वस्तुस्थिती दर्शविणारे शब्द नव्हते; परंतु त्याचबरोबर ते निव्वळ केपलरचे वैयक्तिक भावदर्शन घडविणारे आविष्कारही नव्हते. प्रत्यक्ष वस्तुनिष्ठ वैज्ञानिक परिस्थिती त्यांच्याद्वारे निर्देशित होत नसून, विज्ञान-उद्गमाचे यथार्थ प्रतिज्ञावचन म्हणून त्यांचा रोख दुसऱ्याच एका गोष्टींकडे आहे. केपलरने शोधून काढलेल्या वास्तविकतेबद्दल किंवा वस्तुसत्यांबद्दल (Facts) त्याच्या मनात जी वैज्ञानिक रुची किंवा ओढ उत्पन्न झाली, तिच्याकडे त्या शब्दांमुळे आपले लक्ष वेधले जाते.

या जगात अनेक वस्तुसत्ये आहेत. त्यांतील काही प्रात्यक्षिकांनी साक्षात सिद्ध (demonstrate) करता येणारी असतात व म्हणून ती वैज्ञानिक स्वारस्याची असतात, तर काही तशी नसल्याने ती वैज्ञानिक दृष्टचा नगण्य स्वरूपाची असतात. या दोन प्रकारांमधील फरक जोखणे वैज्ञानिक आत्मभावामुळे शक्य होते, अशी माझी समजूत आहे. कोणते वस्तुसत्य जास्त महत्त्वाचे व कोणते सामान्य याचे मूल्यमापन करणारा दिग्दर्शक, असे या आत्मभावाचे स्वरूप असते. अशा प्रकारचा मूल्यविवेक अखेरीस मानवी मनातील बौद्धिक सौंदर्याच्या आस्वादक्षमतेवर अवलंबून असतो, ज्याला तटस्थपणे एखाद्या चटपटीत व्याख्येत कधीही सामाविता येणार नाही अशा प्रकारचा तो एक भावनिक प्रतिसाद असतो, या गोष्टी महत्त्वाच्या.

कोणत्याही निरीक्षणाचे वैज्ञानिक महत्त्व वास्तविक त्या निरीक्षणाच्या सामान्यीकरणाच्या किंवा व्याप्तीकरणाच्या (Generalization) क्षमतेत असते. तरीही, केवळ वैशिष्ट्यपूर्ण घटनांच्या शोधांनाही कधी कधी सखोल वैज्ञानिक अर्थपूर्णता लाभू शकते. उदा., टायको ब्राह याने इ. स. १५७२ मध्ये एका नव्या अचल ताऱ्याचा (Fixed star) शोध लावला. खरे म्हणजे आकाशात नव्याने जन्माला आलेला तो एक नवदीप्त तारा (Nova) होता, तसेच वोहलर नावाच्या जर्मन शास्त्रज्ञाने पहिल्याप्रथम प्रयोगशाळेत युरिआ हे सेंद्रिय संयुग (Organic compound) तयार केले. वास्तविक हे दोन केवळ घटनाशोध होते. परंतु या शोधांना वैज्ञानिक मूल्य प्राप्त झाले ते त्यांनी विश्वाबद्दलचे, निसर्गाबद्दलचे, आपले काही समज बदलून टाकले त्यामुळे! ब्राहच्या काळापर्यंत अशी श्रद्धा होती की, तारांगणाचे ऊर्ध्वविश्व हे देवाचे वसतिस्थान असल्यामुळे तेथे यत्किंचितही परिवर्तन किंवा बदल शक्य नाही. ब्राहच्या नवताऱ्याने, जो काल नव्हता आणि आज जन्माला आला, ही समजूत खोटी ठरविली आणि ते विश्वही माणसाच्या अधोविश्वाप्रमाणे प्रायोगिक विज्ञानाच्या कक्षेत येऊ शकते हे दाखवून दिले. ज्या नियमांनी तारे, ग्रह, त्यांच्या मार्गांशी निबद्ध असतात त्याच नियमांनी प्रयोगशाळेतील लंबकाची गती निश्चित होते, हे पुढे न्यूटनने पूर्णतः सिद्ध केले. ब्राहने या अटळ परिपाकाचे सूतोवाच केले इतकेच. तसेच, वोहलरच्या आधीच्या काळी सेंद्रिय पदार्थ फक्त जीवनप्रेरणेनेच तयार होतात, निर्जीव पदार्थांच्या रासायनिक प्रक्रियांनी ते निर्माण करता येणार नाहीत, अशी सार्वत्रिक समजूत होती. वोहलरने प्रयोगशाळेत युरिआ बनवून ही समजूत खोटी पाडली आणि जीवरासायनीचा पुढचा मार्ग मोकळा केला, रसायनशास्त्राला नवे दालन उघडून दिले.

ब्राह किंवा वोहलर यांच्या प्रत्यक्ष शोधांनी कोणतेच नवे नियम सिद्ध केले नाहीत. त्या घटनाशोधांना जे मोल प्राप्त झाले ते त्यांत अनुस्यूत असलेल्या व्यापक गर्भितार्थामुळे. अशा प्रकारचे शोध आपल्याला प्रस्थापित ज्ञानापेक्षा जास्त गूढ, अस्पष्ट आणि तरीही अतीव महत्त्वाचे असे काहीतरी सुचवितात; अंधुक परंतु सखोल अशा कोणत्या तरी अर्थपूर्णतेचा निर्देश करतात; अनुभवाच्या एका अधिक विशाल क्षेत्राचे अचूक आकलन व्हावे याचे वचन त्यात दडलेले असते. विशालीकरणाची क्षमता हा विज्ञानातील सखोलतेचाच एक पैलू

असतो. आणि सखोलता हासुद्धा आपल्या एका भावनेचा, आपण वास्तवाशी एक नवा, जास्त व्यापक, स्पर्श करीत आहोत या भावनेचा, एक अनुभव असतो. या अनुभवाशिवाय, केवळ नवीन घटनांचे अनावरण किंवा अचूक मोजमापन वैज्ञानिक दृष्टचा व्यर्थ ठरते.

हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी एक उदाहरण घेऊ. १९१४ साली हार्वर्डला टी. डब्ल्यू. रिचर्ड्स नावाचे एक रसायनशास्त्रज्ञ काम करीत होते. त्यांनी निरनिराळचा मूलद्रव्यांच्या अणुभारांच्या किंमती इतक्या अचूक मोजल्या की त्यांच्यापूर्वी अशी अचूकता कुणाच्याच अणुभारमापनात आढळली नव्हती; तसे शक्यच झाले नव्हते. या कामासाठी रिचर्ड्सला नोबेल पुरस्कारही मिळाला. त्यांच्या प्रत्यक्ष मोजमापांना आजपर्यंत कुणीही आव्हान दिलेले नाही. परंतु १९३२ साली फ्रेडरिक सॉडी या वैज्ञानिकाने अशा मोजमापांची खिल्ली उडविली. त्याने लिहिले की, " समजा एखाद्या बाटल्यांच्या ढिगात काही बाटल्या रिकाम्या आहेत, तर काही अर्धवट आणि काही पूर्ण भरलेल्या आहेत. अशा बाटल्यांचे सरासरी वजन काढणे जेवढे अर्थहीन, तेवढेच रिचर्ड्सच्या मोजमापांचेही आहे. त्यात काहीच वैज्ञानिक स्वारस्य नाही." यातली गोम होती समस्थानकांची ( Isotopes ). प्रत्येक मूलद्रव्याला समस्थानके ( म्हणजे एकाच प्रकारच्या अणूच्या निरनिराळचा वजनांच्या जाती ) असतात आणि त्यांचे निसर्गात आढळणारे प्रमाणही निश्चित असते. रिचर्ड्सच्या काळी समस्थानके माहीत नव्हती. म्हणून, त्याने मोजले ते एकाच प्रकारच्या अणूंचे वजच नसून त्या त्या मूलद्रव्यात उपस्थित असलेल्या समस्थानकांचे सरासरी वजन होते. अर्थात, समस्थानकांच्या शोधानंतर, अशा मोजमापांना काहीच अर्थ उरत नव्हता. अणुभारासारखी राशी, जी विश्वाचे एक अर्थपूर्ण अंग म्हणून १९१४ साली सर्व वैज्ञानिक समजत होते, ती अखेरीस सरासरी राशी म्हणून अशा प्रकारे अर्थहीन ठरली. (अर्थात, प्रत्येक समस्थानकाचा अणुभार ही आजही महत्त्वाची राशी आहेच.) मूळ राशीत चूक अशी काहीच नव्हती. परंतु तिच्यातील वैश्विक अर्थपूर्णता लोप पावल्यामुळे तिला विज्ञानात पुढे स्थान राहिले नाही.

वैज्ञानिक गुणवत्ता ही जरी एखाद्या व्याख्येच्या चौकटीत चपखलपणे बसविता येत नसली तरी ती अस्तित्वात नसते असे नव्हे. बहुतांश वेळा तिचा यथातथ्य अंदाज करता येतो. बऱ्याच विज्ञानकालिकांत संशोधननिबंध प्रसिद्ध करण्याआधी ते परीक्षकांकडे पाठविण्यात येतात. या निबंधांवरचा प्रसिद्धिखर्च योग्य ठरेल एवढे मोल त्या निबंधांमध्ये आहे की नाही याची शहानिशा त्या परीक्षकांना करायची असते. किंवा संशोधनासाठी दिलेले अनुदान कारणी लागले आहे की नाही हेही कधी कधी संबधितांना पहायचे असते. याचा अर्थ, निखालस खोटे काय आहे आणि त्याचबरोबर उघडउघड नगण्य किंवा सामान्य प्रतीचे काय आहे, हे ओळखण्याची कुवत वैज्ञानिकांमध्ये असावीच लागते. प्रत्येक माहितीज्ञान वैज्ञानिक ज्ञान होऊ शकत नाही. निसर्गविज्ञानांच्या प्रयोजनावर बोलताना ख्यातनाम जर्मन शास्त्रज्ञ फ्रिड्रिश कोहलराऊश (१८४०–१९१०) याने असे सांगितले की, गटारातून वाहणाऱ्या पाण्याचा वेग अचूकपणे मोजण्यातही, एक वैज्ञानिक म्हणून, तो स्वतः संतोषी असेल, तेही एक वैज्ञानिक संशोधनकार्य म्हणूनच तो त्याच्याकडे पाहील. अर्थात, हे उद्‌गार काढताना त्याने प्रत्यक्ष वस्तुस्थितीबद्दल कोणतेच खोटे विधान केले नव्हते. तरीही त्या उद्‌गारांत काहीच तथ्य नव्हते, कारण "वैज्ञानिक गुणवत्ता" या संकल्पनेबद्दलची त्याची समज साफ चुकली होती. एखादे निरीक्षण अचूक केले एवढ्यावरून केवळ त्याला वैज्ञानिक महत्ता प्राप्त होत नाही. विचारात विसंगती न आणताही चुकीचे निष्कर्ष टाळता येतात, हे कोहलराऊशच्या वरील अनपढ वचनावरून आपल्याला शिकता येते. याचा एकमेव मार्ग म्हणजे, विज्ञान हे पूर्णतः वस्तुनिष्ठ असते या आदर्शपरायण समजुतीचा आपण पूर्णतया त्याग करण्यास सिद्ध होणे, निदान त्याकडे तारतम्याने पाहणे.

विज्ञान शंभर टक्के वस्तुनिष्ठ नसते या आपल्या नव्या भूमिकेला दुजोरा सापडतो तो केपलरच्या आधी उल्लेख केलेल्या ग्रंथाच्या शीर्षकातच. या ग्रंथाचे इंग्रजी नाव आहे, " Harmonics of the World ". या शीर्षकातील Harmonics हा शब्द महत्त्वाचा आहे. Harmonics म्हणजे एखाद्या संगीतस्वराचे (कंप्रतेचे) सहसंवादी स्वर. (सूर्याभोवती फिरणाऱ्या ग्रहांच्या कक्षा एका संगीतमय नात्याने निबद्ध आहेत, असा या शीर्षकाचा अर्थ आहे.) हा सहसंवादी पट ओळखू येणे, जाणवणे, हे महत्त्वाचे. वैज्ञानिक महत्ता जोखण्याचे

प्रातिभिक सामर्थ्य सुसंवादी "स्वरमेल ऐकू येण्याच्या" क्षमतेवर निर्भर असते, या गोष्टीची सूचना या शीर्षकावरून आपल्याला मिळते. विज्ञानाच्या बौद्धिक सौंदर्याला आपले मन जो भावनिक प्रतिसाद देते त्यात ही संवेदना दडलेली असते. अर्थात, विज्ञानाचा प्रत्येक भाग मुळातच यथातथ्य आहे याचा विश्वास असल्याखेरीज तो भाग सौंदर्यगुणाने मंडित आहे, असे म्हणता येत नाही. म्हणून आपला भावनिक प्रतिसाद जर प्रत्यक्ष विश्वव्यवहारावर अधिष्ठित असेल तरच त्याला वैज्ञानिकदृष्ट्या काही प्रतिष्ठा प्राप्त होते. एखाद्या वैज्ञानिक शोधाने जर वास्तवतेचे नवे दर्शन घडविले तरच तो "सुंदर" ठरतो, अन्यथा नाही. सौंदर्याला वास्तविकतेचे अधिष्ठान आवश्यक असते.

शोधामुळे नवे ज्ञान उजेडात येते हे खरे. परंतु त्याबरोबर एक नवे परिदर्शनही घडते. ही नवी दृष्टी म्हणजे काही ते ज्ञान नव्हे वास्तविक ते अंतर्भेदन (Jnsight) प्रत्यक्ष उपलब्ध झालेल्या ज्ञानापेक्षा कमी विश्वासार्ह असते. याचे कारण ती एक अस्पष्ट अटकळ असते. परंतु एका अर्थाने ते प्रत्यक्ष ज्ञानापेक्षाही जास्त महत्त्वाचे असते. तोपर्यंत अज्ञात असलेल्या आणि कदाचित असंभव वाटणाऱ्या गोष्टींची पूर्वसूचना त्यात असते. विश्वात घडणाऱ्या घटनांच्या स्वरूपाबद्दल जो दर्शनव्यूह आपल्या मनात सिद्ध होतो तोच आपल्याला भविष्यातील सर्व अनुभवांचे सार काढण्यासाठी मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडतो.

अशा तऱ्हेचे मार्गदर्शन अपरिहार्य असते. बौद्धिक आत्मभावाच्या अनुपस्थितीत जर संशोधन केले तर ते अखेरीस आपल्याला तथ्यहीन, नगण्य, अशा माहितीच्या वाळवंटात नेऊन सोडेल. आपल्या जाणिवेतील वास्तवतेच्या भानव्यूहाला आपली सौंदर्यसंवेदना प्रतिसाद देते. कोणते प्रश्न महत्त्वाचे, वैज्ञानिक स्वारस्याचे आणि म्हणून पाठपुरावा करण्यासारखे आहेत, याची सूचना या आत्मभावाकडून मिळाली पाहिजे. ज्या संकल्पना आणि प्रायोगिक संबंधसूत्रे मूलतः यथार्थ म्हणून स्वीकारयोग्य असतील त्यांच्या संदर्भात उपलब्ध पुरावा जरी कधी कधी विरोधी ठरण्याची शक्यता असली तरी त्याच संकल्पनांचा पाठपुरावा केला पाहिजे. हे दिग्दर्शन करणे वैज्ञानिक आत्मभावाने करावयास हवे. याउलट कोणत्या सूत्रांचा, त्यांना आधारभूत पुरावा असूनही व त्या पुराव्याचे समर्थन करणाऱ्या पर्यायी संकल्पना आपल्याजवळ नसूनही, त्याग करायचा याची सूचनाही याच भानव्यूहाने करायची असते. वेळोवेळी पथदिग्दर्शन करण्याचे हे काम वैज्ञानिक आत्मभावाचे असते.

निवड करण्याचे हे काम दुसऱ्या एका कामाशी संलग्न असते. या दुसऱ्या कार्याची कल्पना केपलरच्या ग्रंथातील पुढील उताऱ्यावरून येऊ शकते.

"जेव्हा, २२ वर्षांपूर्वी, आकाशातील ग्रहांची अंतरे आणि प्लेटोचे पाच घनांचे आकार यांचा संबंध मी शोधून काढला तेव्हाच जे भाकित मी केले होते– टॉलेमीची सहसंवादाची विचारसरणी माझ्या आढळात येण्यापूर्वीपासूनच जे मी मनाशी घट्ट धरून ठेवले होते– ज्याचे अभिवचन मी या ग्रंथाच्या शीर्षकातच माझ्या मित्रांना दिले (हे शीर्षक माझ्या संशोधनाची खात्री होण्यापूर्वीच मी या ग्रंथाला देऊन टाकले होते)–ज्याचा शोध घेण्यासाठी मी सोळा वर्षांपूर्वी प्रस्थान ठेवले– ज्यासाठी माझ्या खगोलचिंतनाचा सर्वाधिक काळ मी व्यतीत केला आणि टायको ब्राह्च्या प्रयोगशाळेत येऊन राहिलो– अखेरीस ते मी प्रकाशात आणले आहे आणि माझा स्वतःचाच पूर्वी कधी विश्वास बसला नसता एवढ्या स्वच्छपणे, त्याची सत्यता जाणली आहे..."

भविष्यकाळातील संशोधनाच्या स्थूल वाटचालीची अटकळ ज्या सहसंवादी जाणिवेमुळे बांधता येते त्या जाणिवेचे अस्तित्व ठामपणे प्रतिपादणे, एवढेच काही बौद्धिक आत्मभावाचे काम नसते. या आत्मभावामुळे विशिष्ट उपलब्धींच्या संभाव्यतेच्या पूर्वसूचना मिळतात आणि तेवढेच महत्त्वाचे म्हणजे, आत्यंतिक परिश्रमाच्या विकट काळात त्या उपलब्धींचा ध्यास सतत जागता ठेवण्यासाठी लागणारी चिकाटी संशोधकाला प्रदान केली जाते. म्हणजे येथे वैज्ञानिक गुणवत्ता जोखण्याची क्षमता ती गुणवत्ता साक्षात हस्तगत करण्याच्या क्षमतेत मिसळून जाते– कलावंताची कलात्मक जाण जशी त्याच्या प्रत्यक्ष सर्जनसामर्थ्यात विलीन होते त्याप्रमाणे. वैज्ञानिक आत्मभावामुळे निर्माण होणाऱ्या सर्जनप्रेरणेचे स्वरूप हे असे दुहेरी असते.

परंतु केपलरच्या वरील उताऱ्यावरून आणखीही एक गोष्ट आपल्या लक्षात येते. सत्यलक्ष्यी असलेल्या आत्मभावाचे स्वरूप स्खलनशीलतेपासून नेहमीच संरक्षित असते असे नव्हे. ग्रहभ्रमणाच्या कक्षांमध्ये केपलरला

पाच घनांचा संबंध दिसतो आणि त्याने तो हर्षभरित होतो. त्या वेळी माहीत असलेल्या सहा ग्रहांची सूर्यापासूनची अंतरे क्रमाक्रमाने मोठ्या होत जाणाऱ्या प्लेटोच्या पाच घनांच्या आकारांशी सुसंगत, म्हणजे त्या घनांना अंत:स्पर्शी व बाह्यस्पर्शी काढलेल्या गोलांच्या त्रिज्यांएवढी, असावीत असा त्याचा विश्वास होता. अर्थात, त्या काळी वास्तवाशी कितीही मिळतेजुळते वाटले तरी ते सर्व निरर्थक होते, हे आपल्याला आज चांगले ठाऊक आहे. याचे साधे कारण म्हणजे, विश्वाचे मूलभूत सहसंवाद अंकांनी किंवा भूमितीय आकारांनी व्यक्त होतात ही गोष्ट आज आपण स्वीकारू शकत नाही. परंतु केपलरच्या मनात वास्तवतेसंबंधीची ही चुकीची समजूत असूनही तिनेच अखेरीस त्याला ग्रहभ्रमणांच्या त्याच्या तीन सुप्रसिद्ध नियमांपर्यंत आणून पोचविण्याचे ऐतिहासिक कार्य केले. यामुळेच, प्लेटोच्या विचारसरणीचा विशिष्ट भाग स्वीकारण्याचा प्रमाद करूनही, केपलर आजही एका महान वैज्ञानिकाच्या रूपाने आपल्यासमोर येतो. याउलट तो जेव्हा सूर्यामध्ये वसत असलेल्या चित्-शक्तीबद्दल बोलू लागतो किंवा ग्रहसंगीताचे स्वर नेहमीच्या सांगीतिक लिपीमध्ये व्यक्त करू लागतो तेव्हा तो वैज्ञानिक राहत नाही, तर गूढरंजनी दार्शनिक ठरतो. म्हणजे येथे आपण प्रमादांचे दोन वेगवेगळे प्रकार करू शकतो : कालांतराने चुकीचे म्हणून सिद्ध झालेले वैज्ञानिक अंदाज आणि केवळ निखालस खोटीच नव्हेत तर बिनबुडाची असणारी अवैज्ञानिक भाकिते.

अचूक अंदाज बांधण्याच्या प्रयत्नात सर्जनशील वैज्ञानिक आपले उभे जन्म खर्ची घालतात. या प्रयत्नात त्यांच्या अंगी असलेल्या सातत्याचे पोषण करून पथदिग्दर्शन करण्याचे काम सर्जनशील आत्मभाव (Creative Passion) करतो. त्यांच्या कार्यामुळे आपल्याला प्रतीत होणाऱ्या जगाचे आकलन अधिक सखोल होते आणि त्या जगाचा सारा अर्थच पालटतो. म्हणून आपण त्या कार्याला सर्जनात्मक म्हणतो. हा बदल अपरिवर्तनीय असतो. एकदा तो घडला की मग पुन्हा मागे जाता येत नाही. जो प्रश्न मी एकदा सोडविला तो पुन्हा मला भेडसावू शकत नाही. माझी नजरच बदलून जाते. वेगळे पाहणारा आणि विचार करणारा मी इतरांहून भिन्न होतो. समस्या आणि तिचे निराकरण यांमध्ये असलेली दरी, नव्या दर्शनाची शोधदरी, मी ओलांडलेली असते. सर्जकाच्या या स्वपरिवर्तनामधून आणखी एक प्रश्न उत्पन्न होतो.

कोणत्याही गोष्टीचा अर्थ आपण एका संदर्भलावीत असतो. नव्या शोधामुळे या आकलन व्यूहात काही प्रमाणात बदल होऊ शकतो. ज्या प्रमाणात हा बदल घडण्याची शक्यता असते त्या प्रमाणात तरी जुन्या व्यूहामध्ये विचार करून नव्या शोधापर्यंत पोचणे तर्कदृष्ट्या अशक्य असते. याचा अर्थ, आधीच माहीत असलेल्या एखाद्या विशिष्ट विचारसरणीचा चिकाटीने वापर करून नवा शोध हस्तगत करता येत नाही. नव्या शोधासाठी अस्सल नवोन्मेषी आदिप्रज्ञा लागते. त्यासाठी आपल्या बौद्धिक संदर्भव्यूहातच परिवर्तन होण्याची आवश्यकता असते. निराळ्या शब्दांत म्हणजे, आपल्यातच बदल घडवून आणण्याची गरज असते. परंतु, ज्यामध्ये आपण स्वत:ला सर्वस्वी झोकून देतो अशा सर्व उदात्त कार्यांप्रमाणे, अशा प्रकारचा व्यक्तित्वबदल घडून येण्यासाठी यशसिद्धीची दुर्दम्य प्रेरणा लागते, नवोन्मेषी आदिप्रज्ञा नेहमीच आत्मभावी, ऊर्जापूर्ण, असते.

शोध घेण्याची ही तळमळ कोणत्याच वैयक्तिक लाभाच्या विचाराने प्रेरित झालेली नसते. इतर क्षुधांचा रोख स्वत:च्या शमनासाठी ओरबाडून घेण्याकडे असतो. बौद्धिक प्रेरणांचे तसे नसते. या प्रेरणा, योगदान करून, जग समृद्ध करायला निघालेल्या असतात. या वाटचालीपोटीच एक नवा प्रश्न निर्माण होतो. या शोधकार्यामुळे इतर माणसांपुढे एक नवे आव्हान उभे राहते. कारण नव्या शोधाच्या स्वरूपात प्राप्त झालेले ज्ञान इतरांनीही स्वीकारावे, असा त्या प्रेरणेचा आग्रह असतो. बौद्धिक प्रेरणांना प्रतिसाद उपलब्ध झाल्याशिवाय त्यांचे समाधान होत नाही. यामुळे शोधकर्त्याच्या मनात एक प्रकारचा तणाव उत्पन्न होतो. स्वत: प्रगट केलेल्या नव्या उपलब्धींवर जर सार्वत्रिक अविश्वास दिसून येऊ लागला तर त्याच्या दबावाखाली, स्वत:चीही त्याच प्रकारची धारणा होऊ लागेल व त्यामुळे आपण केलेले कार्य मातीमोलाचे ठरेल ही भीती त्यामागे असते. आपल्याला झालेले परिदर्शन एक तर विजयी तरी झाले पाहिजे किंवा पराभूत, मृत तरी झाले पाहिजे. यांशिवाय तिसरा पर्यायच नसतो. यातूनच लोकमतपरिवर्तनाचा आत्मभाव (Persuasive Passion) निर्माण होतो.

अनुक्रमणिका

परिवर्तनाचा हा आत्मभाव शोधप्रेरणेच्या आत्मभावाशीच संलग्न असतो आणि त्याच्याप्रमाणे याच्यापुढेही एक अटळ दरी उभी असते. नव्या दर्शनामुळे निर्मात्याने आपल्या आकलनव्यूहात योग्य ते बदल करून घेतलेले असतात. परंतु इतर लोक मात्र जुन्या चाकोरीतच अडकून पडलेले असतात. व्यूहबदलाची व्याप्ती जेवढी असेल तेवढ्या प्रमाणात संशोधक व इतर यांच्यामध्ये एक प्रकारचे वैचारिक अलगपण उत्पन्न होते. मात्र, संशोधकातील प्रबोधनप्रेरणा त्याला हा दुरावा मिटविण्यासाठी उद्युक्त करते. आपल्याला जसे आकलन झाले आहे तसे ते इतरांना व्हावे व नवे ज्ञान सर्वमान्य व्हावे, हा यामागील उद्देश असतो.

परंतु हे काम सहजसुलभ नसते. विज्ञानातील केवळ एखादी नवी संकल्पना लोकांनी स्वीकारावी म्हणून त्यांचे मन वळविण्याचे प्रयत्न करणे हीच गोष्ट अतिशय अवघड असते. त्यातच जर नवी संकल्पना समजण्यासाठी नव्या विचारव्यूहाची आवश्यकता असेल तर हा प्रश्न अधिकच जटिल बनतो. कारण, अशा वेळी, युक्तिवादाचा उपयोग होत नाही. जोपर्यंत आपण प्रस्थापित व्यूहामध्ये इतरांशी युक्तिवाद करतो तोपर्यंत त्यांना त्या व्यूहाचा त्याग करायला लावणे शक्य होत नाही. म्हणून तर्कशुद्ध सिद्धतेला, परिवर्तन होईल अशा प्रकारच्या, मतजुळणीच्या प्रयत्नांची जोड देणे भाग पाडते. प्रतिपक्षाचा विचारव्यूह पर्याप्त नाही हे दाखवूनच, त्या संदर्भाप्रमाणे विचार करता येणार नाही याचे समर्थन होऊ शकते.

आत्मभावाशी अतूट जुळणी झालेल्या बुद्धिविश्वावरील अशा प्रकारच्या मूलाघाताची परिणती प्रतिपक्ष नामोहरम होण्यात अनिवार्यपणे होते. प्रतिपक्ष कधी कधी भ्रष्टबुद्धी असल्यासारखा भासू लागतो आणि, वादविवादाच्या वादळात, याचा अर्थ तो अनाडी, विक्षिप्त किंवा अप्रामाणिक असावा असा सहजपणे केला जातो. वैचारिक आत्मभावांच्या या द्वंद्वात प्रत्येक बाजू दुसऱ्या बाजूकडील व्यक्तींची अपरिहार्यपणे बौद्धिक अवहेलना करण्यासाठी उद्युक्त होते. मतपरिवर्तनाच्या या आत्मभावातूनच (Persuasive Passion) विज्ञानातील वादग्रस्तता उत्पन्न होते. अशा प्रकारचे दुर्दैवी वाद–प्रतिवाद कदाचित प्रगतीच्या गतिविधींप्रमाणे अटळ असावेत, अशी माझी समजूत आहे. ज्या आत्मभावामुळे नवे ज्ञान आणि परिवर्तनप्रेरणा कार्यरत होतात आणि हिरीरीचे युक्तिवाद अटळ होतात ते सर्व वैज्ञानिक प्रगतीसाठी चालूच राहिले पाहिजे. खरे म्हणजे, वैज्ञानिक सत्याच्या या अंगभूत बाजूला तिचे रास्त स्थान देण्यासाठी विज्ञानाच्या समग्र तत्त्वज्ञानाचाच पुर्नविचार करण्याची निकड आहे.










# इस्लामी संस्कृतीची रूपरेखा*

कौशिक

इस्लामचा उदय आणि त्याचा विकास ह्या घटना इतिहासाच्या प्रकाशझोतात घडून आल्या आहेत. वैदिक धर्म किंवा झोरोस्टियन धर्म यांचा प्रारंभ जसा प्राक्-इतिहासाच्या धूसर संधिप्रकाशात अर्धवट दडलेला आहे तसे इस्लामचे नाही. ह्या धर्माचा विकास एका पृथगात्म अशा संस्कृतीत झाला. ही संस्कृती उत्क्रांत होत असताना तिने परक्या सांस्कृतिक परंपरा आत्मसात केल्या, काही प्रमाणात त्यांच्यात बदल केले व पुढे त्यांतील काही वर्ज्य केल्या. भिन्न संस्कृतींची परस्परांवर क्रिया–प्रतिक्रिया होणे, त्यातून सांस्कृतिक परिवर्तन घडून येणे, एका संस्कृतीचा दुसऱ्या संस्कृतीवर प्रभाव पडणे ह्या मानवी इतिहासात सदैव चालत असलेल्या प्रक्रियांची काही स्पष्ट आणि महत्त्वपूर्ण उदाहरणे, सातवे ते बारावे शतक ह्या कालखंडात इस्लामी संस्कृतीचा जो विकास झाला त्याच्यात आढळून येतात.

इस्लामी संस्कृती हा एका मूलभूत प्रेरणेचा आविष्कार आहे असे म्हणता येईल. ईश्वर, विश्व आणि माणूस यांची स्वरूपे आणि त्यांचे परस्परसंबंध ह्यांविषयीच्या सिद्धांतांची एक संपूर्ण व्यवस्था हे ह्या आविष्काराचे एक अंग आहे. ह्या व्यवस्थेच्या चौकटीत आदर्श मानवी जीवनाचे जे चित्र इस्लामने सिद्ध केले आहे ते ह्या आविष्काराचे दुसरे अंग होय. ह्या दोन अंगांची एकमेकांपासून फारकत करता येणार नाही. एक सिद्धांतप्रणाली आणि तिच्यावर आधारलेली आदर्श जीवनपद्धती ह्या दोन्ही अंगांद्वारा इस्लामची श्रद्धा साकारली जाते.

ख्रिस्ती धर्माप्रमाणे इस्लाम हा प्रकटित (रिव्हील्ड) धर्म आहे आणि ज्या व्यक्तीद्वारे हे प्रकटन झाले तिला, म्हणजे महंमद पैगंबर यांना इस्लामी श्रद्धेमध्ये मूलभूत असे स्थान आहे. ह्या बाबतीतही ख्रिस्ती धर्म आणि इस्लाम यांच्यामध्ये साम्य आहे. महंमद पैगंबरांनी जो संदेश प्रकट केला त्याच्यावर श्रद्धा ठेवणे पुरेसे नाही. ईश्वराने अखेरचे प्रेषित म्हणून महंमद यांची निवड केली ही अर्थपूर्ण गोष्ट आहे अशीही श्रद्धा बाळगणे आवश्यक आहे. ‘ मी अशी श्रद्धा बाळगतो की ईश्वराशिवाय ( अल्ला ) अन्य कुणी देव नाही आणि महंमद हे ईश्वराचे प्रेषित आहेत ’ ह्या ब्रीदवाक्यात इस्लामी श्रद्धेचा गाभा व्यक्त झाला आहे.

महंमद स्वतःला केवळ एक माणूस मानतात. कोणत्याही स्वरूपाचे देवत्व आपल्या ठिकाणी आहे असा त्यांचा दावा नाही. तुम्ही प्रेषित आहात तर आपले प्रेषितत्व सिद्ध करण्यासाठी चमत्कार करून दाखवा असा आग्रह झाला असता कुराण हा ग्रंथ हाच माझा चमत्कार आहे असे ते म्हणत. हा चमत्कार त्यांनी केलेला आहे ह्याचा अर्थ एवढाच की कुराण त्यांना प्रकट झाले आणि त्यांच्याकरवी इतरांसाठी प्रकट झाले. ईश्वराकडून त्यांना जे साक्षात संदेश येत ते सोडले तर इतर बाबतीत त्यांचे विचार किंवा कृती, इतर माणसांचे विचार आणि कृती यांच्याप्रमाणेच प्रमादशील असण्याची नेहमीच शक्यता असे. श्रद्धाळू मुसलमानांसाठी आपण आदर्श घालून दिला आहे आणि ह्या आदर्शानुसार जगण्याचा त्यांनी प्रयत्न केला पाहिजे असे त्यांनी स्वतः कधी मानले नाही. पण हळूहळू, काल उलटत गेला तसा त्यांचे जीवन हे आदर्श जीवन होते आणि मानवी आणि अतिमानवी परिपूर्णतेचे सार त्यांच्या व्यक्तित्वात प्रतिबिंबित झाले होते असे मानण्यात येऊ लागले. वेगवेगळ्या युगांनी आपापल्या आकांक्षांना आणि आदर्शांना अनुसरून त्यांना वेगवेगळ्या स्वरूपांत पाहिले : एकाला ते इंद्रियदमन करणारे महान योगी भासले, दुसऱ्याला ते साक्षात्कारी संत म्हणून दिसले, तर कुणाला ते गूढवेत्ते.

---

* हा लेख जी. ई. फॉन ग्रुनबाउम यांच्या ‘ धि प्रोफिल ऑफ् मुस्लिम सिव्हिलिझेशन ’ ह्या लेखावर आधारलेला आहे. हा लेख ‘ इस्लाम ’ ह्या त्यांच्या लेखसंग्रहात समाविष्ट आहे.

अनुक्रमणिका

ईश्वराचा संदेश एकच आणि सार्वत्रिक असतो. पण वेगवेगळ्या जनसमूहांना किंवा जमातींना, तो वेगवेगळ्या काळांत, भिन्न संदेशवाहकांकडून पोचविला जातो. ईश्वराचा संपूर्ण संदेश एका आदिग्रंथात समाविष्ट झालेला आहे आणि त्याचा काही भाग प्रत्येक संदेशवाहकाकरवी किंवा प्रेषिताकरवी, त्याच्या आणि त्याच्या जमातीच्या भाषेत, त्या जमातीसाठी प्रकट करण्यात येतो. भूतकाळात असे अनेक प्रेषित होऊन गेलेले आहेत. इस्लामी परंपरेप्रमाणे त्यांची संख्या १ लक्ष २४ हजार इतकी आहे. पण महंमद पैगंबरांकरवी अंतिम आणि परिपूर्ण असा ईश्वरी संदेश प्रकट झाला आहे. येथे ईश्वरी प्रकटन समाप्त झाले आहे. मोझेस आणि जीझस हे महंमदांचे पूर्वसूरी होते आणि महंमदांना प्राप्त झालेल्या संदेशाचे ह्या पूर्वसूरींनी प्रकट केलेल्या संदेशांशी जे साम्य होते त्याच्या आधारावर आपलाही संदेश प्रमाण आहे असे महंमद मानीत. पण आपल्या धर्मग्रंथांचे जे सार आहे तेच महंमदांनी प्रकट केलेल्या संदेशात आढळते असे यहुदी आणि ख्रिस्ती मानीत नाहीत असे जेव्हा महंमदांना आढळून आले तेव्हा त्यांना विषाद वाटला. यहुद्यांनी आणि ख्रिस्त्यांनी त्यांना लाभलेला मूळ संदेश भ्रष्ट केला आहे, त्यात त्यांनी अनेक असत्यांची भर घातली आहे आणि आब्राहमला जो धर्म ईश्वराने सांगितला त्याची त्याच्या शुद्ध स्वरूपात पुन:स्थापना करण्यासाठी आपल्याला जगात पाठविण्यात आले आहे अशी त्यांची खात्री झाली. आब्राहमचे आणि अरबांचे नाते असे की आब्राहम हा इस्माइलचा पिता आणि इस्माइल हा अरबांचा पूर्वज. प्रेषिताचे अनुयायी त्याचा मूळ संदेश भ्रष्ट करतात अशी एक कल्पना होती. कुराण हा ग्रंथ अविकृत स्वरूपात उपलब्ध असल्यामुळे महंमदांचा संदेश भ्रष्ट होण्याला अवसर नाही.

इसवी सनाच्या ६ व्या शतकात अरबी जमातींमध्ये धार्मिक परिवर्तनाला प्रारंभ झाला होता असे आढळून येते. परंपरेने अरबी टोळ्या अनेक देवतांची उपासना करीत, त्या मूर्तिपूजक होत्या. त्यांच्या धार्मिक कल्पना प्राथमिक स्वरूपाच्या होत्या. मक्का हे एक प्रमुख शहर होते. व्यापारामुळे ते भरभराटीला आले होते. यहुदी आणि ख्रिस्ती यांच्या मोठ्या वसत्या मक्केमध्ये होत्या आणि त्यांच्या धार्मिक कल्पनांचा मक्केच्या रहिवाश्यांना परिचय झाला होता. आपल्या पारंपरिक धार्मिक समजुतीच्या जागी अधिक शुद्ध, बौद्धिक दृष्ट्या अधिक प्रगल्भ आणि सकस अशा श्रद्धेच्या शोधात अनेकजण होते. ऐहिक जीवनाच्या पलीकडे असलेल्या पारलौकिक अस्तित्वाच्या जाणिवेचा उदय झाला होता आणि ही जाणीव उत्कट होऊ लागली होती. महंमदांची जी पहिली उत्स्फूर्त वचने आहेत त्यांच्यात जगाच्या अंताविषयीचे भय, ईश्वरी निवाड्याच्या दिवशी न्यायपीठासमोर उभे राहावे लागेल तेव्हा चित्ताचा होणारा थरकाप ह्यांचाच प्रामुख्याने आविष्कार झालेला आहे. केवळ दगड किंवा लाकडे असलेले हे देव सोडून देऊया, स्वर्ग आणि जग ह्यांचा निर्माता आणि प्रभू असलेला असा एकमेव ईश्वर आहे ह्या सत्याला कवटाळूया आणि मग अंतिम निर्णयाच्या दिवसाच्या घोर भीतीपासून आणि चिरंतन नरकवासाच्या शिक्षेपासून आपली सुटका होईल असा त्यांचा आशय आहे. पापाची जाणीव माणसांना होत होती. आपण दुष्कृत्ये करतो ह्याची एक नवी भीती त्यांना वाटू लागली होती. नरकातील अग्नीच्या भडकत्या ज्वाळा त्यांना दिसू लागल्या होत्या. त्यांच्यापासून त्यांना संरक्षण हवे होते आणि हे संरक्षण महंमदांनी देऊ केले.

ख्रिस्ती कल्पना वेगळी होती. ॲडमने केलेल्या आज्ञाभंगाच्या पातकामुळे माणसाचे पतन झाले आहे आणि त्याचा परिणाम म्हणून माणसाची प्रकृतीच भ्रष्ट झाली आहे. हे मूळ धुवून काढल्याशिवाय माणूस तारला जाणार नाही. त्याची मूळ निरागस, निरामय प्रकृती त्याला परत प्राप्त होणे म्हणजे माणसाचे तारण होणे होय. ईश्वर माणूस म्हणून जगात अवतरतो, माणसासाठी स्वत:चा बळी देतो आणि ह्या आत्मबलिदानाने माणसाचे पाप धुवून काढले जाते, माणसाचे तारण होते. अशा मूळ पापाची आणि त्याच्यापासून माणसाचे जे तारण साधायचे आहे त्याची कल्पना इस्लाममध्ये नाही. माणूस स्खलनशील आहे खरा. पण स्खलन आणि त्याच्यामुळे ओढवणारी शिक्षा माणसाला टाळता येतील. ह्यासाठी खऱ्या ईश्वराचे ज्ञान हवे आणि माणसाने कसे वागावे ह्याविषयीचे जे आदेश त्याने दिले आहेत त्यांचे ज्ञान हवे. ह्या आदेशांना अनुसरून जो जगेल तो स्वर्गाला जाईल. त्यांचा भंग जो करील तो नरकाला जाईल. स्वर्गसुख साधायचा आणि नरकवास टाळायचा जो मार्ग आहे तो पैगंबरांनी प्रकट




अनुक्रमणिका



केला. स्वर्गसुख कसे साधावे ह्याचे तंत्रज्ञान त्यांनी प्रकट केले असे म्हणता येईल. आपल्या प्रकृतीत भिनलेल्या पापाची यातनामय जाणीव, हे पाप धुवून काढून परत निरामय होण्याची तळमळ, माणसाच्या प्रेमाने त्याच्यासाठी यातना भोगणारा देव ह्या ख्रिस्ती जाणीवा इस्लामला परक्या आहेत.

जगाचा अंत जवळ आला आहे अशी जाणीव महंमदांच्या प्रारंभीच्या उत्स्फूर्त वचनांत होती. ख्रिस्त आणि त्याचे अनुयायी ह्यांचाही असाच विश्वास होता. ख्रिस्ताच्या अनुयायांनी ही समजूत काही दशकांनंतर सोडून दिली असे दिसते. महंमदांच्या नंतरच्या वक्तव्यातून ही जाणीव विरल होत गेल्याचे अनुभवाला येते. जर ईश्वर काही काळ जग टिकवून धरणार असेल तर महंमदांच्या श्रद्धाळू अनुयायांच्या जमातीची जगात स्थापना करून ईश्वराने जे आदेश प्रेषिताकरवी प्रकट केले होते त्याचे तंतोतंत पालन करणाऱ्या सामूहिक जीवनमार्गाची स्पष्ट आखणी करणे आवश्यक होते. इस्लाम ही अशी ईश्वराच्या आधिपत्याखाली अनुसरली जाणारी जीवनसरणी आहे. गर्भधारणेपासून तो दफनापर्यंतच्या मानवी जीवनाच्या सर्व अवस्था ह्या जीवनसरणीने नियमित केल्या आहेत. जीवनाचे धार्मिक किंवा पारलौकिक क्षेत्र आणि ऐहिक क्षेत्र असा भेद ती मानत नाही. जीवनाचा बारीकसारीक तपशीलही धर्माशी संबंधित असतो. प्रत्येक कृती हा धार्मिक विधीच असतो. ह्यामुळे जीवन साचेबंद झाले हे जसे खरे आहे त्याचप्रमाणे अगदी क्षुद्र मानल्या गेलेल्या कृतींनाही धार्मिक प्रतिष्ठा लाभली हेही खरे आहे. व्यक्तीचे जीवन ही ईश्वराने आदिष्ट केलेल्या कृत्यांची मालिका बनली. मुस्लिम समाजालाही हे स्वरूप प्राप्त झाले. इस्लामच्या सुरुवातीच्या अनुयायांच्या दृष्टीने राज्य हे ईश्वराचे राज्य होते, सैन्य ईश्वराचे सैन्य होते, खजिना ईश्वराचा खजिना होता.

तेव्हा इस्लामची प्रेरणा ही योग्य, सम्यक अशा जीवनमार्गाचा शोध घेण्याची प्रेरणा होती. ह्या जीवनमार्गात अंतर्भूत असलेले आदेश आणि ऐहिक जीवनातील गरजांची निकड ह्यांच्यामधील संघर्षात इस्लामच्या आंतरिक इतिहासाचे सूत्र आढळते. ह्या आदर्श जीवनसरणीला सुव्यवस्थित रूप देणे आणि तिची अंमलबजावणी करणे ही धर्मशास्त्राच्या भाष्यकारांची जबाबदारी होती. ती त्यांची मक्तेदारीही बनली. ह्या जीवनसरणीला त्यांनी अधिकाधिक संकुचित रूप दिले. ह्याच्यामागे आपल्याकडून चुकीचा आदेश दिला जाऊ नये अशी काळजीही होती. पण ह्याचा परिणाम असा झाला की मध्ययुगाच्या उत्तर काळात इस्लामी समाजाचे प्रत्यक्ष स्वरूप आणि आदर्श इस्लामी जीवनसरणी ह्यांच्यातील दरी झाकण्याचे प्रयत्न अटळपणे करावे लागले; कल्पना आणि वस्तुस्थिती ह्यांच्यात मेळ उरला नाही. कोणत्याही समाजात हे द्वंद्व अपरिहार्यपणे असते. इस्लामी समाजाच्या नंतरच्या इतिहासात हे द्वंद्व अधिकच प्रखर स्वरूपात दृग्गोचर होते.

बौद्धिक सिद्धांतांपेक्षा आचरणाला इस्लाममध्ये अधिक महत्त्व आहे हे त्याच्या पाच आधारस्तंभांवरून स्पष्ट होते. प्रत्येक मुस्लिम व्यक्तीवर बंधनकारक असलेले हे पाच मूलभूत आदेश आहेत. पैगंबरांनी असे म्हटले आहे ( असे मानण्यात येते ) की " इस्लामची उभारणी पाच गोष्टींवर झाली आहे : ईश्वराशिवाय ( अल्लाशिवाय ) देव नाही आणि महंमद हे त्याचे प्रेषित आहेत; प्रार्थना; जकात; मक्केची यात्रा आणि रमझनाचा उपवास. "

सम्यक जीवनमार्गाने जगणे हे आयुष्याचे मूलभूत प्रयोजन जर साधायचे असेल तर ह्या जीवनमार्गाचे माणसाला अधिकृत असे ज्ञान उपलब्ध असले पाहिजे. मानवी बुद्धी स्खलनशील असते. तेव्हा संशयातीतपणे सत्य असलेले सिद्धांत आणि बंधनकारक कर्तव्ये ह्यांच्याविषयीच्या आपल्या ज्ञानाचा उगम अतिमानवी असला पाहिजे. प्रत्येक नियम हा प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे ईश्वराने घालून दिलेला नियम असला पाहिजे. कुराण म्हणजे महंमदांना जी प्रकटने प्राप्त झाली होती त्यांचा संग्रह. हे ईश्वराचेच महंमदांना उद्देशून केलेले बोलणे आहे. तेव्हा जीवनाचे नियमन करण्याचा सर्वोच्च अधिकार कुराणाचा आहे. मुसलमानांच्या दृष्टीने कुराण सर्व गोष्टींना स्पर्श करते पण धार्मिक श्रद्धा, कायदे आणि पूर्वीच्या प्रेषितांचा इतिहास हे त्याचे खास विषय आहेत. कुराण हा पहिला अरबी ग्रंथ आहे. त्याची रचना सयमक गद्यात केलेली आहे. वृत्ताचे बंधन त्याच्या भाषेला नसले तरी तिला ताल आहे. खलिफा उथमान यांनी कुराणाची जी अधिकृत आवृत्ती प्रसिद्ध केली तिच्या ११४ सुरा (विभाग) आहेत. त्यांचा क्रम त्यांच्या लांबीला अनुसरून लावलेला आहे. जीवनाच्या पारलौकिक अंगाविषयीच्या सुरा अतिशय सुंदर आहेत.



अनुक्रमणिका

ज्या स्वरूपाचे विचार अरबी भाषेत पूर्वी मांडण्यात आले नव्हते ते व्यक्त करताना महंमदांना अनेक नवीन भाषिक प्रयोग घडवावे लागले. कायद्यांची मांडणी करताना कुराणातील भाषा काहीशी क्लिष्ट व बोजड बनते. नंतरचे अरबी ग्रंथकार घटनांचे कथन अतिशय नेमकेपणे व सफाईदारपणे करतात. त्यांच्याशी तुलना करता, पूर्वीच्या प्रेषितांच्या गुंतागुंतीच्या घटनांनी भरलेल्या कथा सांगण्यासाठी महंमदांनी जे कथनतंत्र वापरले आहे ते सदोष वाटते. परंतु मुसलमानांच्या दृष्टीने कुराण हा ईश्वरांचा शब्द आहे. तेव्हा भाषासौष्ठवाच्या दृष्टीनेही तो अतुलनीय आहे. कुराणाच्या भाषेला तोड असू शकत नाही. कुराणाच्या भाषेची ही जी अनन्यसाधारणता आहे तिच्या वैशिष्ट्याचे आकलन आणि उलगडा करण्याच्या प्रयत्नांतून अरबी साहित्यशास्त्राला चालना मिळाली. कुराणात जे शब्द वापरले आहेत त्यांची व्युत्पत्ती समजून घेऊन त्यांच्या अर्थाचे स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे याविषयी मुसलमानांत एकवाक्यता आहे. पण ह्याच्यापुढे जाऊन कुराणातील वाक्यांच्या अर्थावर भाष्य करणे कितपत आवश्यक आहे ह्याविषयी त्यांच्यात मतभेद आहे.

पण कुराणात अंतिम सत्य प्रकट झाले आहे. तेव्हा आपला वैयक्तिक दृष्टिकोण किंवा आपल्या पंथाचा दृष्टिकोण आणि कुराणातील विधाने ह्यांच्यात संवाद साधणे अत्यावश्यक आहे. ह्या गरजेतून कुराणावर अनेक तत्त्वज्ञानात्मक, गूढवादी, विशिष्ट पंथाच्या सिद्धांतांचे समर्थन करणारी अशी भाष्ये अटळपणे रचण्यात आली आहेत. जेव्हा कुराणातील वाक्यांचा सरळ शाब्दिक अर्थ ह्या कामी उपयोगी पडत नाही तेव्हा अर्थात लाक्षणिक अर्थाची कास धरण्यात येते.

कुराणाचा कितीही लवचिकपणे अर्थ लावला तरी प्रत्येक धार्मिक प्रश्नाचे उत्तर कुराणात सापडेल हे संभवत नाही. ह्यासाठी 'सुन्नेचा आश्रय घ्यावा लागतो. 'सुन्ना' म्हणजे प्रेषितांची वचने आणि कृती यांच्याविषयीच्या परंपरा. जीवनाचे नियमन करण्याचा सुन्नेचा अधिकार कुराणाच्या खालोखालचा आहे. जर कुराणात एखाद्या गोष्टीविषयी काही वचन नसेल तर प्रेषितांचे खाजगी वचन किंवा त्यांच्या कृतिविषयीचे एखाद्या समकालीनाने केलेले निवेदन त्या बाबतीत निर्णायक ठरते. मुसलमान जमातीच्या जाणीवेत हळूहळू महंमदांच्या स्वरूपाचे रूपांतर घडून आले. ईश्वराचा केवळ मानवी असलेला प्रेषित किंवा संदेशवाहक हे मूळचे स्वरूप होते. महंमद हा अलौकिक, दैवी शक्तीने संपन्न असलेला पुरुष आहे अशा श्रद्धेने घेतली. ह्यामुळे आपापल्या पंथाच्या मतांचे समर्थन करणारी, पुढे होणाऱ्या ऐतिहासिक घटनांचे भविष्य वर्तवणारी आणि साधारणपणे मुस्लिम जमातीच्या त्या त्या वेळच्या भावना प्रतिबिंबित करणारी वचने प्रेषितांच्या तोंडी घालणे अधिक सोपे झाले. जमातीच्या दृष्टीने सुन्नेला एवढे महत्त्व आले की प्रसंगी कुराणांतील स्पष्ट वचनेही सुन्नेच्या अधिकारामुळे बाजूला सारण्यात आली. कुराण आणि सुन्ना ह्यांच्या खालोखाल इज्माचा अधिकार आहे. इज्मा म्हणजे मुसलमान जमातीची सममती (कॉन्सेन्सस). 'माझ्या जमातीची कोणत्याही भ्रामक समजुतीविषयी एकवाक्यता होणार नाही' असे प्रेषितांचे एक वचन आहे आणि त्याच्यावर इज्माचा अधिकार आधारलेला आहे. इज्मा हा बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्याचा मार्ग आहे आणि सुन्ना हाही वस्तुतः ह्याच स्वरूपाचा दुसरा मार्ग आहे. धर्मशास्त्रज्ञांची सममती (इज्मा) नवीन काय करावे हे सांगत नाही पण जी प्रथा किंवा समजूत रूढ झाली आहे तिला मान्यता देते. ह्यामुळे संतांच्या संप्रदायासारख्या इस्लामविरोधी गोष्टींना इस्लाममध्ये स्थान देणे शक्य झाले. रूढ व्यवहार आणि इस्लामी आदर्श ह्यांच्यामधील तफावतीला मर्यादा घालता आली.

तथापि इस्लाम परंपरावादी आहे. ज्या उदाहरणांचा आदर्श म्हणून अनुकरण करण्यासाठी स्वीकार करायचा ती प्राचीनतम काळातील उदाहरणे असतात. महंमदाच्या प्रारंभीच्या अनुयायांची पिढी ही सर्वोत्कृष्ट पिढी होय. त्यांच्यानंतरची पिढी तिच्या खालोखाल चांगली. त्यानंतर जग बिघडत चालले आहे आणि त्याचा पूर्वनिर्णित अंत होईपर्यंत ते बिघडत जाणार. आजच्या पिढीला ज्या प्रथा वारसा म्हणून लाभलेल्या आहेत त्यांच्यात बदल करण्याचा तिला अधिकार नाही; कारण बदलामुळे अधिक बिघाड होणार. धार्मिक बाबतीत कोणतीही नवीन गोष्ट प्रविष्ट करण्याचा कुणालाही अधिकार नाही. नवीन गोष्ट त्याज्यच असणार. जो धर्मात काही नवीन गोष्ट आणतो तो शिक्षेला पात्र असतो. तेव्हा धर्मसुधारक आपल्या सुधारणेचे समर्थन करताना नेहमी प्रेषितांच्या वचनाचा किंवा कुराणातील उक्तीचा आधार घेतो. इस्लामचे प्रारंभीचे जे सुवर्णयुग होते त्याच्याकडे परतणे हेच आपल्या सुधारणेचे उद्दिष्ट आहे अशी त्याची भूमिका असते.

अनुक्रमणिका

जी मूळ प्रथा होती ती आपल्याला बाजूला सारायची नाही किंवा तिच्यात बदलही करायचा नाही; फक्त तिच्यात ज्या गोष्टी मागाहून घुसल्या आहेत किंवा ज्या विकृती शिरल्या आहेत त्या काढून टाकायच्या आहेत असे त्याचे म्हणणे असते. अलौकिक पुरुषांचे, सर्जनाचे युग मागे पडले आहे. ही वृत्ती केवळ धार्मिक बाबतीतच आढळून येते असे नाही. अरबी काव्याची जी इस्लामपूर्व परंपरा होती तिच्या मर्यादांत सर्व काव्य सामावून घेण्यासाठी साहित्यशास्त्रज्ञ प्रयत्नांची शर्थ करतात. साहित्याने नवीन परिस्थितीशी जुळवून घ्यावे, नवीन भावनांचा आविष्कार करावा ह्याला ते प्रतिबंध करतात. हे प्रयत्न यशस्वी ठरत नाहीत ही गोष्ट वेगळी. फक्त ९ व्या आणि १० व्या शतकांत बौद्धिक जगामध्ये यौवनांची ऊर्मी आढळून येते. प्राचीनांची बरोबरी आपण करू किंवा त्यांच्याहून सरस ठरू असा उत्साह तेव्हा वातावरणात होता. आफ्रिकेमध्ये जी फातिमिड राजवट स्थापन झाली तिने आपल्या प्रचारात आपला राजवंश तरुण आहे; बगदादच्या आबासीद घराण्यासारखा वृद्धत्वाने जर्जर झालेला नाही ह्या गोष्टीवर भर दिला होता. पण सर्वजण ह्या आत्मविश्वासात सहभागी होते असे नाही. अकराव्या शतकात तो मावळूही लागला. जीवनाचे नियमन करणारे आदर्श भूतकाळात शोधण्याची जी सर्वसाधारण वृत्ती होती तिच्यावर त्याचा फारसा प्रभाव पडला नाही.

परंपरेचा अधिकार सुदृढ करण्यासाठी व्यक्तीच्या स्वतंत्र विचारांना प्रतिबंध करावा लागतो. प्रेषितांची बनावट वचने वाढू लागली आणि हळूहळू त्यांचा महापूर लोटल्यांसारखे झाले. ह्या परिस्थितीला तोंड देण्यासाठी अस्सल वचनांपासून नकली वचने बाजूला काढणे जमातीला भाग पडले. ह्यासाठी वचनांच्या आशयाचे विश्लेषण करण्याची पद्धती अवलंबिण्यात आली नाही; तर एखाद्या वचनाचा जो शेवटचा निवेदक असेल त्याला आणि प्रेषितांना जोडणारी विश्वसनीय साक्षीदारांची अखंड साखळी आहे की नाही ह्याचा अभ्यास संग्राहकांनी केला. ह्यामुळे चरित्रलेखनाला बहर आला. अरबी भाषेमध्ये व्यक्तींची जितकी अभ्यासपूर्वक चरित्रे लिहिली गेली आहेत तितकी अलीकडच्या काळापर्यंत पाश्चात्त्य भाषांमध्येही नव्हती. पण ह्यामुळे विद्वानांना बनावट विधाने प्रेषितांच्या मुखात घालायला प्रतिबंध झाला असे घडले नाही. आणि प्रेषितांची जी वचने अस्सल मानली जातात ती आधुनिक मनाला विश्वसनीय म्हणून स्वीकारता येण्यासारखी आहेत असेही नाही.

प्रार्थना हा जो पाच आधारस्तंभांतील एक आधारस्तंभ आहे तो प्रार्थनाविधी आहे; व्यक्तीने ईश्वराची केलेली आळवणी नव्हे, किंवा ईश्वराशी साधलेले मानसिक सायुज्य नव्हे. हा विधी म्हणजे कित्येक विशिष्ट वचनांचा एक गुंतागुंतीचा क्रम आहे. विशिष्ट शारीरिक हालचालींच्या समवेत ही वचने उच्चारली जातात. शरीराच्या अवयवांचे प्रक्षालन केल्यानंतर आणि शरीराचे काही अवयव झाकल्यानंतरच प्रार्थनेला सुरुवात करता येते. दिवसाच्या ठरलेल्या पाच वेळा प्रार्थना केली पाहिजे असा नियम आहे. मशिदीत सर्वांनी मिळून इमामामागे उभे राहून प्रार्थना करणे हे सर्वांत उत्तम. प्रार्थनाविधीच्या सर्व तपशिलाचा धर्मशास्त्रज्ञांनी कसून अभ्यास केला आहे आणि कोणत्या प्रासंगिक परिस्थितीत प्रार्थनाविधी करण्यात आला तरीही तो फोल ठरेल ह्याचा निर्णय करण्याचा प्रयत्न केला आहे. तेव्हा धर्मशास्त्रज्ञांच्या मते प्रार्थनेचे प्रामाण्य बाह्य कृती आणि उद्गार हे नियमांना धरून असण्यावर अवलंबून असते. आंतरिक वृत्तींवर ते अवलंबून नसते. गझाली यांच्यासारख्या धार्मिक वृत्तीच्या व्यक्ती अर्थात ह्या मताला विरोध करतात.

ईश्वराची सत्ता निरंकुश आहे ह्या विचाराने इस्लाम भारलेला आहे. ईश्वर एक आहे, तो सर्वशक्तिमान आहे, नैतिक नियमांनी तो जखडलेला नाही, माणसाचे योग्य मार्गदर्शन करण्याचे, त्याच्या आज्ञापालनाबद्दल त्याला पारितोषिक देण्याचे आणि आज्ञाभंगाबद्दल त्याला शिक्षा देण्याचे बंधन त्याच्यावर नाही. माणसाच्या, म्हणजे ईश्वराच्या सर्वश्रेष्ठ निर्मितीच्या असाहाय्य दुबळेपणाच्या विरोधात ईश्वराची महती स्पष्ट होते. निसर्गाचे अनुल्लंघनीय असे नियम आहेत, एक चिरंतन अशी निसर्गव्यवस्था आहे आणि तिचे पालन करायला ईश्वर बांधलेला आहे हे तत्त्व इस्लाम स्वीकारीत नाही. हे तत्त्व नाकारण्याचे खरे कारण त्याच्यात काही संकल्पनात्मक विसंगती आहेत हे नाही. ईश्वराच्या निरंकुश माहात्म्याला कसलीही मर्यादा घालू नये हा विचार त्याच्यामागचे खरे कारण आहे. ईश्वराच्या ह्या माहात्म्याची छाया म्हणून माणसाकडे हीनता येते आणि विश्वाच्या शासनव्यवस्थेत लहरीपणाला स्थान मिळते ह्याची क्षती करण्यात येत नाही. निसर्गात ज्या

घटना घडतात त्यांच्यात काही नियमबद्धता दिसून येते हे खरे. पण ही केवळ ईश्वराची प्रथा आहे. त्याने घालून दिलेल्या वज्रलेप, अनन्यथाकरणीय नियमांचे बंधन सृष्टीवर नाही किंवा त्याच्या स्वतःवर नाही. असे असले तरी एखादा दयाळू सुलतान जसा आपल्या प्रजेला कनवाळूपणे वागवितो, तिच्यावर जो भार असतो तो हलका करण्याचा प्रयत्न करतो, तिच्या वर्तनाकडे क्षमाशील दृष्टीने पाहतो आणि एखाद्याने जरी आगळीक केली असली तरी आपल्याला प्रिय असलेल्या कुणी त्याच्यासाठी रदबदली केली तर ती तो ऐकून घेतो, तसे ईश्वराचे माणसाशी वर्तन असते. ईश्वर आणि माणूस यांच्या संदर्भात अर्थात माणसाच्या वतीने रदबदली करण्याचे कार्य आणि अधिकार प्रेषित महंमदांचा आहे. ईश्वराचा अनुग्रह जेव्हा एखाद्या व्यक्तीवर होतो तेव्हाच ती ईश्वराकडे वळते. आणि हा अनुग्रह कुणावर करायचा आणि कुणावर नाही हा ईश्वराचा निरंकुश असा निर्णय असतो. कुराणात म्हटल्याप्रमाणे, "ईश्वराची इच्छा असेल त्याप्रमाणे तो कुणालाही गैर मार्गाकडे नेतो आणि त्याची इच्छा असेल त्याप्रमाणे तो कुणालाही सन्मार्गावर नेतो. तसेच, "आम्ही अनेक जिन आणि माणसे यांच्यासाठी नरक निर्माण केला आहे."

मुताझिल हे इस्लामच्या सिद्धांतांचे तार्किक विवरण आणि परिष्करण करणारे तत्त्ववेत्ते होते. त्यांचा उदय आठव्या शतकात झाला. सनातन (ऑर्थोडॉक्स) इस्लामची ईश्वराची संकल्पना मानवरूपवादी (अॅन्थ्रापॉमॉर्फिक) होती. तिचा मुताझिलांनी अव्हेर केला. ईश्वर एक आहे हा मूलभूत इस्लामी सिद्धांत आहे. तेव्हा ईश्वराच्या एकतेचा अर्थ अत्यंत तार्किक कठोरतेने लावला पाहिजे असा त्यांचा युक्तिवाद होता. जे जग ईश्वराने निर्माण केले आहे त्याचे अधिकात अधिक कल्याण साधण्याच्या दृष्टीने जे कृत्य सर्वांत अधिक शहाणपणाचे असेल ते ईश्वर नेहमी करतो अशी त्यांची शिकवण होती. तिच्यामुळे अर्थात ईश्वराच्या निरंकुश सार्वभौमत्वाला मर्यादा पडते. मानवी वर्तन आणि ईश्वराची प्रतिक्रिया यांचा नैतिक मेळ घालण्याचा मुताझिलांनी प्रयत्न केला. त्यात मानवाविषयीची एक वेगळी दृष्टी गर्भित आहे. ईश्वर माणसाला न्याय देतो असे आग्रहाने प्रतिपादन करून मानवी प्रतिष्ठेचे ते संरक्षण करीत आहेत. पण सनातनी इस्लामचा दृष्टिकोण ह्याच्या विरुद्ध होता आणि तो त्याने कधी सोडून दिला नाही.

मुसलमानांच्या पहिल्या पिढीची जी धर्मश्रद्धा होती तिच्यावर भीतीचा पगडा होता. त्या काळातील सर्वांत प्रतिभावंत असा संत म्हणजे हसन अल् बसरी हे होत. ते अत्यंत कडक व्रते आणि यमनियम यांचे पालन करीत. 'त्यांची शिकवण आणि उपदेश श्रोत्यांना पश्चात्तापाचे आवाहन करण्याला मुख्यत्वे वाहिलेला असे. ईश्वराचा क्रोध पुढे सहन करावा लागू नये म्हणून माणसाने पश्चात्ताप केला पाहिजे. ह्या क्षणभंगुर जीवनाविषयी आणि ह्या नाश पावणाऱ्या जगात जे काही आहे त्या सर्वांविषयी माणसाने तुच्छतेची वृत्ती धारण केली पाहिजे असा उपदेश ते करीत... एक माणूस एक हजार वर्षे नरकयातना भोगल्यानंतर अखेरीस त्याची मुक्तता होणार आहे असे जेव्हा हसन यांनी ऐकले तेव्हा ते विलाप करू लागले. 'त्या माणसासारखे माझे भाग्य असेल तर किती चांगले होईल' असे उद्‌गार त्यांनी काढले. माणसाचे ईश्वराशी जे नाते आहे त्याला धर्मशास्त्रज्ञांनी जवळजवळ कायदेशीर संबंधाचे स्वरूप दिले होते. ईश्वराचे अमूक अमूक तपशीलवार आदेश आहेत आणि माणसाने आपल्या सर्व कृत्यांत ह्या आदेशांचे पालन केले पाहिजे असे हे नाते बनले होते. ह्याची प्रतिक्रिया म्हणून ज्यांची धार्मिक श्रद्धा जिवंत होती त्यांनी ईश्वराशी साक्षात संबंध जोडण्याला, त्याच्या सान्निध्यात जगण्याला महत्त्व दिले. ईश्वराची भीती आणि ईश्वराविषयीचा पूज्यभाव ह्यांच्या जोडीने ईश्वरावरचे प्रेम आणि ईश्वरावरील आश्वासक विश्वास ह्या भावनांना त्यांनी ईश्वर-मानवाच्या नात्यात स्थान दिले. ईश्वराची अनन्यपणे आणि शुद्ध भावाने भक्ती केली की भक्त ईश्वराच्या समीप जातो, त्याला ईश्वराचे साक्षात दर्शन होते, ईश्वराच्या अस्तित्वात स्वतःच्या अस्तित्वाला तो अत्यानंदाने बुडवून टाकतो. ईश्वर आणि माणूस यांच्या दरम्यान अनंत दरी आहे अशी धर्मशास्त्रज्ञांची शिकवण आहे. साक्षात्कारी अनुभवाच्या संकल्पनेने ही दरी बुजविण्याचा प्रयत्न गूढवादी भक्तांनी केला. कित्येक गूढवाद्यांनी तर अद्वैतवादाचा आश्रय करून चाकर आणि मालिक यांच्यात तादात्म्याचे नाते प्रस्थापित केले. पण एकंदरीत गूढवाद्यांनी तर्काचा जो आधार घेतला त्याचे उद्दिष्ट सनातनी इस्लामचे जे नियम आणि तत्त्वे आहेत त्यांच्यात आणि गूढानुभवात विसंगती नाही, तसेच



अनुक्रमणिका

प्रेषिताला एकट्याला लाभलेल्या संदेशाद्वारे माणसांना आध्यात्मिक सत्यांचे ज्ञान होते असे मानण्याशी आणि ईश्वराचा साक्षात अनुभव माणसाला येऊ शकतो असे मानणे सुसंगत आहे हे सिद्ध करण्याचे होते. गूढवादी आणि इस्लामचे अधिकृत भाष्यकार ह्यांच्यात सुप्त विरोध होता. गूढवाद्यांच्या भूमिकेत ईश्वर आणि मानव यांच्या स्वरूपाविषयीचे आणि परस्परसंबंधांविषयीचे जे सिद्धांत अध्याहृत होते त्यांचे त्यांनाच यथार्थ आकलन झाले नव्हते. हे सिद्धांत जेव्हा स्पष्ट झाले तेव्हा गूढवादी आणि अधिकृत इस्लाम ह्यांच्यामधील विरोधाला तोंड फुटले.

हे घडण्यापूर्वी गूढवादी निःसंकोचपणे आणि धिटाईने ईश्वराशी जवळीक साधीत. राबिया अल् अडवियया ह्या संत-कवयित्रीचे पुढील उत्स्फूर्त उद्गार पहा—

मी तुझ्यावर दोन प्रकारांनी प्रेम केले, एक स्वार्थी प्रेम
आणि दुसरे तुला साजेसे प्रेम.
स्वार्थी प्रेमात इतर सर्वांना विसरून मी फक्त तुझेच स्मरण करीत राहिले.
जेव्हा मी तुला साजेसे प्रेम केले तेव्हा तू तुझे अवगुंठन दूर केलेस,
तुझे दर्शन मला व्हावे म्हणून
तू माझी आशा, माझा विसावा, माझा आनंद आहेस.
माझे हृदय तुझ्याशिवाय इतर कुणावर प्रेम करू शकत नाही.

गूढवादी सुफींची भूमिका अबू नस्र अस्-सराज ह्यांनी अशी मांडली आहे. "सनातनी मुसलमान आणि धर्मशास्त्रज्ञ जे सिद्धांत स्वीकारतात आणि त्यांनी जी शास्त्रे रचली आहेत ती सुफी मान्य करतात. धार्मिक कायद्यांत ज्या अडचणी उद्भवतात त्यांचे निरसन करण्यासाठी सुफीही ह्या शास्त्रांचा आश्रय घेतात. जर शास्त्रांत मतभेद आढळले तर सर्वांत सक्त आणि उत्कृष्ट पर्याय असेल त्याची निवड करावी हे तत्त्व ते स्वीकारतात. ईश्वराच्या आदेशांविषयी ते पूज्यबुद्धी धारण करतात; त्यांतून ते पळवाटा शोधीत नाहीत. सनातनी मुसलमान आणि धर्मशास्त्रज्ञ ह्यांनी जी तर्कबद्ध शास्त्रे रचली आहेत त्यांच्या संबंधातील सुफींचे आचरण असे आहे. पण ही शास्त्रे ते मागे टाकतात आणि गूढवादी भक्ती व नैतिक साधना यांच्या उत्तुंग शिखरावर ते आरूढ होतात; हे केवळ त्यांचे प्रदेश आहेत.

कुराण आणि सुन्ना यांची चर्चा धर्मशास्त्रज्ञ करतात. पण ह्या साहित्यात 'पश्चात्ताप', 'तितिक्षा', 'भीती' आणि 'आशा' ह्या भावनांचे जे उल्लेख येतात त्यांचा खरा आशय फक्त सुफींना माहीत असतो. कुराण आणि सुन्ना ह्यांच्यातच सर्व सुफी-शिकवण सामावलेली आहे. पण प्रकटनाची ही जी भावनात्मक अंगे आहेत त्यांचा साक्षात अनुभव फक्त सुफींना आलेला असतो. अधिकृत इस्लामच्या सिद्धांतांशी असा समन्वय साधण्याचा प्रयत्न जरी सुफींनी केला तरी सुफींचा गूढवाद आणि इस्लामी धर्मशास्त्र यांत मूलभूत स्वरूपाचा विरोध आहे यात शंका नाही. अनुभव हे आध्यात्मिक जीवनाचे साध्य आणि सार आहे असे मानले तर बाह्य धर्माचरण आणि धर्मशास्त्रातील आदेशांचे पालन ह्यांना खरे धार्मिक महत्त्व उरत नाही. आपल्या भूमिकेपासून निष्पन्न होणारा हा तार्किक निष्कर्ष अनेक सुफींनी काढला. धर्मशास्त्रज्ञांच्या दृष्टीने इस्लामचे सिद्धांत आणि धार्मिक आदेश यांच्याविषयीचे सुफींचे औदासिन्य पाखंडी आणि समाजविरोधीही होते. सुफींच्या दृष्टीने जे गूढ सत्य प्रत्यक्ष अनुभवायचे असते त्याची तार्किक मांडणी करण्याचा खटाटोप व्यर्थ असतो. जलाल अद्दिन रूमी ह्या प्रसिद्ध सुफीने म्हटले आहे—

"हा सिद्धान्त त्या सिद्धान्ताचा प्रतिस्पर्धी आणि कडवट वैरी बनला आहे आणि त्यामुळे अनुकरण करणारा (इतरांची मते स्वीकारणारा) शृंगापत्तीत सापडला आहे.
(संशयवादाच्या) दुष्ट सूचनांची मुस्कटदाबी प्रेमानेच होऊ शकते.

हे (प्रिय) आत्म्या, प्रेमच केवळ विवादाला आळा घालते कारण युक्तिवादाशी मुकाबला करताना जेव्हा तू साहाय्यासाठी हाक देतोस तेव्हा प्रेमच तुझी सुटका करण्यासाठी धावून येते."

श्रद्धावान मुसलमानाच्या सबंध जीवनावर आणि विचारांवर आपला अधिकार आहे असा इस्लामचा दावा आहे. मुसलमान जमात ही इस्लामी श्रद्धेची धारक असते. इस्लामी जीवनसरणी मुसलमान जमातीच्या जीवनसरणीत, कृत्यांत आणि विचारांत मूर्त झालेली असते. ख्रिस्ती समाजात ख्रिस्ती धार्मिक श्रद्धेचा अधिकृत अर्थ लावणारी आणि तिच्या शुद्धतेचे संरक्षण करणारी चर्च ही संस्था असते. मुस्लिम

समाजात असे वेगळे चर्च नाही. सबंध मुस्लिम जमात हीच मुस्लिम श्रद्धेची पालक असते. इस्लामी श्रद्धा जीवनव्यापी असल्यामुळे इस्लामी समाजाला राजकीय प्रश्नही धार्मिक पायावर सोडवावे लागतात. इस्लाममध्ये जे पहिले पंथ उदयाला आले त्यांचे मूळ धार्मिक आणि सामाजिक दृष्टिकोणातील खोलपर्यंत पोचलेल्या भिन्नतेमध्ये होते यात शंका नाही. पण त्या काळच्या एकंदर राजकीय परिस्थितीत ह्या पंथांना जमातींचे स्वरूप प्राप्त झाले आणि समग्र मुसलमान जमातींमध्ये उपजमाती म्हणून त्या नांदू लागल्या. हा पंथ समतावादी होता. धर्माच्या आदेशांचे कडकपणे पालन केले पाहिजे ह्यावर त्याचा भर होता. वैध राज्यकर्त्याच्या अंगी कोणत्या प्रकारची पात्रता असली पाहिजे आणि ही पात्रता एखाद्याच्या अंगी आहे की नाही हे ठरविण्याचा अधिकार कुणाचा असतो ह्या मुद्द्यांवर त्यांचा बहुसंख्य मुसलमानांशी विरोध होता. ह्यातून त्यांचा वेगळा पंथ उभा राहिला. शिया पंथ फुटून निघण्याचे मूळ कारण म्हणजे खलिफा बनण्याचा अधिकार कुणाचा आहे ह्याविषयी असलेला मतभेद होय. शियांच्या मते हा अधिकार प्रेषितांचे चुलत बंधू आणि जामात अली यांचा आणि त्यांच्या वंशजांचा होता. अली यांचा मुलगा हुसेन यांचा लढाईत मृत्यू झाल्यानंतर ही शक्यता मावळली. इमाम, म्हणजे इस्लामी जमातीचा नेता कोण असावा हा ह्या वादाचा मुद्दा होता. पुढे शियापंथीयांनी 'इमाम' ह्या संकल्पनेचा विकास करून ईश्वरविद्येत ( थिऑलॉजी ) तिला मूलभूत स्थान दिले. ईश्वराचा माणसात आविष्कार होतो हे जुने मत त्यांनी उचलून धरले. ( सुन्नी इस्लामप्रमाणे माणूस ही ईश्वराची केवळ निर्मिती आहे आणि ईश्वर आणि माणूस यांच्यात पूर्ण द्वैत आहे. ) इमामच्या प्रकृतीत हा ईश्वरी अंश अंतर्भूत असतो– इतर माणसांत नसतो– आणि म्हणून परलोकात चिरंतन सौख्य प्राप्त होण्यासाठी इमामचे मार्गदर्शन आणि मध्यस्थी आवश्यक असते.

सुन्नी मुसलमानांनी राज्याचे कार्यक्षेत्र आणि अधिकार यांच्याविषयी एक मर्यादित संकल्पना घडविली. सुन्नी राज्य हे कल्याणकारी राज्य नाही. ग्रीक (प्लेटो, ॲरिस्टॉटल) संकल्पनेप्रमाणे प्रजेचे सौख्य हे राज्याचे प्रयोजन असते आणि राज्यात सहभागी होऊन व्यक्ती आपले हित साधत असते. ह्या संकल्पनेहूनही सुन्नी संकल्पना भिन्न आहे. घझालीने तिचे केलेले विवरण असे आहे : धार्मिक जीवन चांगल्या प्रकारे संघटित व्हावे हे ईश्वराचे एक उद्दिष्ट आहे. ज्याचा अधिकार लोक मान्य करतील आणि ज्याच्या आदेशांचे ते पालन करतील असा इमाम असल्याशिवाय असे संघटन होणे शक्य नाही. कुराण आणि सुन्नी ह्यांच्या अधिष्ठानावर इस्लामी धर्मशास्त्रात जो कायदा सुव्यवस्थित स्वरूपात मांडण्यात आला आहे त्याला अनुसरून प्रजेला जगता यावे अशी व्यवस्था हे इमामचे आणि त्याच्या हवाली करण्यात आलेल्या राज्यसंस्थेचे एकमेव कार्य आहे. तेव्हा मुस्लिमेतरांपासून मुस्लिम भूप्रदेशाचे संरक्षण करणे, त्याचा विस्तार करणे आणि आपल्या प्रदेशात मुस्लिम प्रजेला आपली धार्मिक कर्तव्ये निर्वेधपणे पार पाडता यावीत म्हणून कायदा आणि सुव्यवस्था यांची अंमलबजावणी करणे ही इमामची प्रमुख कर्तव्ये होत. महंमद पैगंबर हे मुसलमान जमातीचे नेते होते आणि खलिफाकडे परंपरेने हे नेतृत्व येते. पण महंमद हे प्रेषित होते आणि त्यांनी कायदे घालून दिले. हा अधिकार आणि ही कार्ये खलिफाकडे येत नाहीत. प्रेषितांच्या आदेशांचा अधिकारी धर्मशास्त्रज्ञांनी जो अर्थ लावला आहे त्याला अनुसरून ह्या आदेशांचे पालन होत आहे हे पाहणे हे खलिफाचे काम आहे. पण ह्या आदेशांचा अर्थ लावण्याचा अधिकार खलिफाला नाही. मग ह्या आदेशांत भर घालण्याची किंवा त्यांतील काही आदेश रद्द करण्याची गोष्ट दूर राहिली. राज्याचा कारभार करताना खलिफा जे हुकूम सोडील ते अर्थात पाळावे लागतील. धर्मशास्त्रात सांगितले आहेत त्यापेक्षा अधिक कर तो प्रत्यक्षात लादेलही. पण हे कृत्य अवैध राहील. धर्मनिष्ठ व्यक्तींनी शासनव्यवहारात, विशेषतः न्यायदानाच्या कामात गुंतू नये. त्यात धोका असतो. धर्मशास्त्राच्या कायद्यांना अनुसरून न्याय देणारा अधिकारी म्हणजे काजी. पण अनेकदा असे प्रसंग येतात किंवा अशी परिस्थिती उद्भवते की जिच्या आधारे त्यांच्याविषयी निर्णय करता येईल अशी तजवीज धर्मशास्त्रातील कायद्यांत नसते. तेव्हा हळूहळू इस्लामी देशांत समांतर न्यायदानाची व्यवस्था प्रचलित झाली. धर्मशास्त्रातील अपरिवर्तनीय कायद्यांचा धर्मशास्त्रज्ञांनी जो अर्थ लावला असेल त्याला अनुसरून न्याय देणारे एक न्यायालय. दुसरे न्यायालय ज्या कायद्याला अनुसरून न्यायदान करीत असे तो कायदा 'ऐहिक' असे.



अनुक्रमणिका

उदा., मोंगलांनी इराण जिंकल्यावर तेथे लागू केलेला आपला कायदा किंवा इजिप्त आणि तुर्कस्तान ह्या देशांत पूर्वापार रूढी आणि राज्यकर्त्यांचे पूर्वीचे निर्णय ह्यांच्यापासून विकसित झालेला कायदा. सर्वसाधारणपणे धर्मशास्त्रातील कायदा वैयक्तिक बाबीपुरता मर्यादित असे. तेव्हा धर्मशास्त्रातील कायदा सामाजिक व वैयक्तिक व्यवहाराच्या सर्व क्षेत्रांना लागू करावा अशी परंपरावादी सुधारकांची नेहमीची एक मागणी असे.

ऐहिक आणि धार्मिक गोष्टी एकमेकांत कशा गुंतलेल्या असत हे अली यांनी सिफिनच्या लढाईपूर्वी आपल्या सैनिकांना उद्देशून केलेल्या भाषणावरून च गल्या प्रकारे दिसून येते.

" स्वतःचे बलिदान करा ! ईश्वराचे डोळे तुमच्याकडे लागून आहेत आणि तुम्ही प्रेषिताच्या चुलतभावासोबत आहात. फिरून हल्ला करा आणि पलायनाचा तिरस्कार करा, कारण त्याचा डाग तुमच्या अपत्यांना लागेल आणि निर्णयाच्या दिवशी तुमच्या वाट्याला अग्नी येईल. तुमच्यासमोर हे प्रशस्त सवाद (इराकच्या फळबागा) आहे आणि हे भले थोरले तंबू आहेत. रक्त भरपूर वाहू द्या. कारण ह्या टेकडीवर सैतान आपले दोन्ही बाहू पसरून उभा आहे. एक बाहू त्याने हल्ला करण्यासाठी पसरला आहे आणि पळून जाण्यासाठी एक पाय त्याने मागे घेतला आहे. तो तेथे पाय रोवून उभा राहिला आहे, सत्य प्रकट होईपर्यंत तो तेथून हलणार नाही. पण तुम्ही ह्या लढाईत विजयी व्हाल; ईश्वर तुमच्या सोबत आहे आणि तुमच्या कृत्याच्या पुण्यापासून तुम्हाला तो वंचित होऊ देणार नाही.

सुन्नी राज्यकर्त्यांप्रमाणे शिया इमाम हे केवळ राजकीय सत्ताधीश नाहीत. त्यांचे एक विशिष्ट आध्यात्मिक कार्य आहे. ते ईश्वर आणि माणूस यांच्यामधील मध्यस्थ किंवा दुवा आहेत. त्यांनी रदबदली केल्याशिवाय माणसाला ईश्वरदत्त शिक्षा टाळता येणार नाही. माणसाला आध्यात्मिक जीवनात नेहमी मार्गदर्शनाची आवश्यकता असतें आणि निष्पाप अशा इमामशिवाय कुणी माणूस मार्गदर्शन करू शकत नाही. इमामला कायदे करण्याचा विशेषाधिकार असतो हेही ह्यापासून निष्पन्न होते. पण इमाम प्रत्यक्षात सत्ताधारी असला पाहिजे किंवा जगात दृश्य स्वरूपात वसत असला पाहिजे असा निष्कर्ष ह्यावरून काढता येणार नाही. बहुसंख्य शियांच्या मते शेवटचे ऐतिहासिक इमाम महंमद अबुल कासीम हे इ. स. ८७९ साली अंतर्धान पावले पण आध्यात्मिक मार्गदर्शनाचे आपले कार्य त्यांनी चालू ठेवले आहे. ईश्वराने ठरविलेल्या वेळी ते पुन्हा अवतीर्ण होतील आणि उघडपणे जगाची सत्ता आपल्या हाती घेतील. आजचे सत्ताधीश हे गुप्त झालेल्या इमामचे केवळ प्रतिनिधी आहेत. १९०६ मध्ये बनविण्यात आलेल्या इराणच्या पहिल्या राज्यघटनेत इराणी संसद ह्या युगाच्या (गुप्त) इमामच्या अनुमतीने प्रस्थापित करण्यात येत आहे असे विधान होते.

ज्यांनी परिपूर्ण सत्य स्वीकारलेले आहे (म्ह. मुसलमान) आणि ज्यांनी त्याचा अव्हेर केला आहे (म्ह. इतर) यांच्यामध्ये समानता असू शकत नाही. ज्या धार्मिक जमातींचे प्रेषितांमार्फत प्रकट झालेले धर्मग्रंथ होते– 'किताबी' उदा., यहुदी किंवा ख्रिस्ती– त्यांना महंमदांनी मर्यादित मान्यता दिली. पण जे बहुदेवतावादी आणि मूर्तिपूजक होते त्यांना मुसलमान होण्याचे आवाहन तरी करण्यात येत असे किंवा त्यांना मृत्यूला कवटाळावे लागे. मुसलमान हीच राज्यकर्ती जमात होती. किताबी जमातीतील एखादी व्यक्ती जर स्वेच्छेने मुसलमान बनली तरच ती राज्यकर्त्या जमातीत सामील होऊ शकत असे. मुस्लिम राज्याच्या प्रदेशांत वसणाऱ्या इतर धार्मिक जमातींशी तहनामे करून त्यांना आंतरिक स्वायत्तता देण्यात येत असे. मुसलमानेतरांवर मुसलमानांच्या तुलनेने अधिक कर लादण्यात येत असत, लष्करात किंवा शासकीय अधिकाराच्या जागांवर त्यांना नेमले जाऊ नये अशी सैद्धान्तिक भूमिका होती. (व्यवहार वेगळा असू शकत असे.)

आपले प्रेषितकार्य हे सबंध मानवजातीसाठी आहे असे महंमद पैगंबर आपल्या जीवनात मानीत असोत, नसोत, मुस्लिम जमातीने त्याचा अर्थ तसा लावला. धर्माचा प्रसार करणे आणि मुस्लिम सत्तेखालील भूमीचा विस्तार करणे हे खलिफाचे प्रमुख कर्तव्य होते. धर्मशास्त्राच्या कायद्याप्रमाणे ज्यांनी मुस्लिम-श्रद्धा स्वीकारलेली नसते त्यांच्याशी शांतता राखणे शक्य नसते. परंतु धोरण म्हणून बराच काळ युद्धबंदी पत्करता येईल. परंतु जोपर्यंत कोणत्याही प्रदेशावर मुस्लिमेतरांचे नियंत्रण आहे तोपर्यंत सत्याच्या राज्याचा जगभर प्रसार करण्याची कामगिरी पूरी होणार नाही. (अपूर्ण)



अनुक्रमणिका

# ट्रोल्स विरुद्ध इब्सेन

अनिरुद्ध कुलकर्णी

'ट्रोल्स' ह्या नॉर्वेजियन शब्दाचा अर्थ भुतेखेते. लोककथांतून आणि खेडेगावांतील जुन्या समजुतींतून भुतेखेते, पिशाच्चे, समंध, वेताळ, डाकिणी, यांच्याविषयीचे अंधविश्वास जुन्या व मध्ययुगीन काळात देशोदेशी आढळून येतात. नॉर्वे त्याला अपवाद नव्हते. ट्रोल्स या शब्दाचा हा वाच्चार्थ सोडून इब्सेनने त्याचा लक्ष्यार्थही लावला. अंधश्रद्धा, रूढी, गैरसमजुती, भ्रामक नीतिकल्पना, दडपलेल्या अतृप्त इच्छा म्हणजेही ट्रोल्सच. जुन्या काळात भुतेखेते जशी समाजाला घेरून होती, तशाच या गोष्टी आपल्या तथाकथित सुधारणाऱ्या समाजांना व व्यक्तींच्या मनांना वेढून बसल्या आहेत. इब्सेनचे आयुष्य या ट्रोल्सशी, या भुताखेतांशी चाललेली लढाई होती. व्यक्तिगत पातळीवर; पण लढाई. एका मित्राला आपल्या नाटकाची भेटप्रत देताना इब्सेनने स्वतःच्याच काव्यातील ओळी त्याच्यावर लिहिल्या होत्या–

" To live is to war
 with trolls in heart and soul,
To write is to sit
 in judgement on oneself."

या ओळी फार प्रसिद्ध झाल्या आहेत. इब्सेनच्या जीवितकार्याचे सारच जणू त्यांत नेमकेपणे शब्दबद्ध झाले आहे. शोकनाट्यात संघर्ष असतो, अनेक प्रकारचा आणि अनेक पातळ्यांवरचा संघर्ष असतो हे उघड आहे पण इब्सेन जगण्याकडेच संघर्ष म्हणून पाहात होता. लिखाणाची प्रक्रिया त्या मानाने बैठी आणि सोपी होती. स्वतःचा न्यायनिवाडा स्वतःच करण्यासारखे ते होते. पण मूलभूत महत्त्व होते ते तुम्ही कोणाकोणाशी आणि आणि कशासाठी झगडलात, किती जिद्दीने झगडलात याला. तुम्ही ट्रोल्सशी झगडलात की नाही याला. जीवन ही वेडसर माणसाने सांगितलेली कथा आहे आणि ती निरर्थक आहे अशी त्याची भावना कधीच नव्हती. वाऱ्यांच्या भूमीतून आलेल्या इब्सेनने स्वतःकडे लढणारा आणि जीवन म्हणजे लढाई अशा दृष्टीने पाहिले. आणि अशी लढाई देऊ पाहणाऱ्या अनेक अविस्मरणीय व्यक्तिरेखा निर्माण केल्या. बऱ्याच वेळा पराभूत होणाऱ्या पण झुंजणाऱ्या व्यक्तिरेखा.

आपल्याकडे आपण लोकहितवादी, फुले, आगरकर, शिंदे, आंबेडकर यांसारख्या सुधारकांकडे झगडा देणारी व्यक्तिमत्त्वे म्हणून पाहातो. त्यांच्याकडे इब्सेननेही ट्रोल्सशी झगडणारी माणसे म्हणून त्याच्या पद्धतीने पाहिले असते, इतकी त्याने ही कल्पना व्यापक केली होती. रोझमर्स-होम पासूनच्या नाटकांमध्ये तर ट्रोल्स म्हणजे माणसांच्या मनातील सुप्त दडपलेल्या आकांक्षा, वासना होतात आणि त्यांच्याशी शोकात्म संघर्ष देण्यात माणसे खर्ची पडतात. ट्रोल्स 'हृदय आणि आत्म्यात' दिसतात. ही नाटके मनोविश्लेषणात रस असणाऱ्यांना मार्गदर्शक ठरली व आवडली. 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग । आंतर्बाह्य मन आणि जग' ही उक्ती इब्सेनने जो ट्रोल्सचा विचार केला आहे त्या बाबतीत आठवावी अशी आहे. इब्सेनचा हा विचार, त्याच्या इतर अनेक पैलूंत जशी 'उत्क्रान्ती' झालेली दिसते तसाच 'उत्क्रांत' झालेला दिसतो. पण पहिल्यापासून अगदी शेवटपर्यंत हा पैलू किंवा धागा शाबूत मात्र आहे. जीवन ही एक आनंदयात्रा आहे, जीवन ही एक एकमेकांत मिसळून जाणाऱ्या सुरांची गोड रचना आहे अशी धारणा इब्सेनमध्ये येत नाही. ( पेअरला मात्र झोलवेय्गने आपले जीवन सुंदर गाण्यात रूपांतरित करून टाकले आहे असे अखेरीस वाटून जाते.). त्याचे नायक-नायिका उद्दिष्टाप्रत पोहोचोत न पोहोचोत, त्यांचा झगडा, संघर्ष मिटत नाही. त्यांची असंतुष्टता, खिन्नताही कधी सरत नाही. निर्णायक ठरते ते त्यांचे मरणच.

'ट्रोल' हा डोळ्याला दिसणारा एक 'दुष्ट' शक्तीचा प्राणी असतो. जुन्या स्कॅण्डिनेवियन कथांत तीनतोंडी राक्षसासारख्या ट्रोलचे वर्णन येते, पण साधारणपणे तो माणसांसारखाच असतो; फक्त फार

अनुक्रमणिका






दणकट, वेडाविद्रा आणि ओंगळ एवढेच. माणसांमध्ये असणारे, माणूस म्हणून असणारे व माणुसकीचे गुण ट्रोलमध्ये नसतात. घृणास्पद आणि दुष्ट भाग तेवढा असतो. तो माणसासारखा दिसतो म्हणून तर जास्त भयानक वाटतो. जसा डॉ. जेकिल ॲण्ड मि. हाईड मधील मि. हाईड भयानक वाटतो. माणसाचे अनुकरण करण्याची वृत्तीदेखील ट्रोलमध्ये दिसून येते. ट्रोलमुळे आपले ट्रोलमध्येच रूपांतर होईल ही सर्वांत मोठी भीती माणसाला वाटते. ट्रोल्स गावाबाहेर, रानावनाच्या आसपास अपरात्री दिसतात. पण ते उंच हिमपठारांवर, फ्येलसवर राहातात. त्यांची स्वतंत्र अशी सृष्टीच असते. तेथेही राजा, प्रजा, सरदार, दरकदार ही उतरण व उच्चनीचता असते. या सृष्टीचे दर्शन आपल्याला 'पेअर ग्यून्ट' नाटकाच्या दुसऱ्या व तिसऱ्या अंकांत घडते. आपल्याकडेही भुताखेतांची अशी स्वतंत्र सृष्टी असते असे वेताळपंचविशीसारख्या कथांमागे गृहीत धरलेले आहे.

'Sunlight or benighted
Folk thronged in 'tis true,
The bright day unblighted
To the dark was united
They were one, not two'

ह्या एका नोर्स लोकगीतात म्हटल्याप्रमाणे ट्रोल्सची सृष्टी ट्रोल्सच्या एकोप्याचे दर्शन घडविते. माणसांच्या सृष्टीत मतभेद, गट, पक्ष आणि मारामाऱ्या असतात, पण भुतांच्या राज्यात एकोपा नांदत असतो. डोंगरातील ट्रोल्सची आणि मृतात्म्यांची ताकद दाखविणाऱ्या कथा ख्रिस्तपूर्व काळापासून नॉर्वेजियन जीवनात आहेत. भुतेखेते आणि dark powers च्या दंतकथा इतक्या मोठ्या प्रमाणावर युरोपमधील कुठल्याही देशात अगदी आयर्लंडमध्येसुद्धा आढळत नसतील असे म्हणतात. अगदी सुरुवातीचे नोर्स वाङ्मय तर असल्या कथांनी भरलेले आहे. अत्यंत थंड आणि जीवनाला प्रतिकूल, असे एकाकी करणारे वातावरण ह्यांचा प्रभाव कारणीभूत झाला असावा. ब्रान्द, घोस्ट्स्, रोझमर्स होमसारखी, किंवा स्ट्रिण्डबर्गचीही नाटके वाचीत असताना ट्रोल्सविषयीच्या दंतकथा स्कॅण्डिनेवियन लोकांच्या रक्तातच भिनल्या होत्या व आहेत हे लक्षात घ्यावे लागते.

हिमचर्चमध्ये वा अन्यत्र नायकावर हल्ला करणारे ट्रोल्स हे केवळ मनाला होणारे भासही नाहीत किंवा उंचीवरची पिशाच्चेही नाहीत तर जणू या दोहोंच्या मीलनातून निर्माण झालेले प्राणी आहेत असे ब्रॅडब्रुक बाईंनी[१] म्हटले आहे, त्या म्हणण्यात वातावरणाचा घटकच सूचित केला गेला आहे. अंधाऱ्या प्रदीर्घ रात्री कडाक्याची थंडी, महिनेन् महिने कुंद वातावरण, अत्यंत विरळ वस्ती, मोजकी लोकसंख्या आणि आहे तेथे गर्द वनराजी यांचा परिणाम स्कॅण्डिनेव्हियातील आदिम समाजांवर झाला असणार आणि त्यातूनच ट्रोल्स-कथा वाढीस लागल्या असणार.

अशा ट्रोल्सचे अस्तित्व अक्षरशः शब्दशः अस्तित्व इब्सेन मानीत नव्हता हे उघडच आहे. पण या कल्पनेने त्याच्या मनात बालपणापासून आकर्षण निर्माण केले होते. आईने सांगितलेल्या किंवा इतर कोणी सांगितलेल्या आणि लहानपणीच ऐकलेल्या कथांचा हेन्रिकच्या बालमनावर सखोल ठसा उमटला. 'पेअर ग्यून्ट' मधील पेअरची आई ऑझ्अ आपल्या मुलाने लग्नमंडपातील वधूच पळवून नेली हे ऐकल्यावर हादरते. तिला वेगळ्याच प्रकारचे दुःख होते. विपन्नावस्था होती, पेअरचे वडील तर दारूडे, घरात इतर कोणी नाही, अशा अवस्थेत आपण सत्याला सामोरे जाऊ शकत नव्हतो तेव्हा स्वतःला आणि पेअरला रिझविण्यासाठी आपण पेअरला परिकथा आणि ट्रोल्सच्या रसभरीत कथा ऐकवल्या आणि त्यांतूनच थिल्लर, अवखळ मनाच्या पेअरने हे दुष्कृत्य केले असा अन्वयार्थ ती लावते. पेअरला लहानाचा मोठा करायचा व घराण्याला पुन्हा चांगले दिवस आणायचे हे तिचे स्वप्न धुळीला मिळते. वयाने तारुण्याच्या उंबरठ्यावर आलेला पण मनाने बालवयातच रेंगाळणारा पेअर तिच्या आकांक्षांचा चुराडा करतो :

"काही थापा मारतात तर ढोसतात काहीजण ब्रँडी
हाय्, पण आम्ही लागलो परिकथांच्या नादी
राजकन्या, ट्रोल्स नी झपाटल्या पशूंच्या कथा
पळविलेल्या वधू... पण स्वप्नातही नव्हते आले माझ्या
त्या सैतानाच्या कथाच घेतील त्याचा ताबा!"

असे ऑझ्अ तिच्या सुनेला म्हणजे अगदी तरुण असणाऱ्या झोलबेथला सांगते. परिकथा आणि ट्रोल्सच्या कथांची इब्सेनने केलेली ब्रॅण्डी आणि थापांशी तुलना





अनुक्रमणिका

मार्मिक आहे. मार्क्सने धर्म आणि अफू यांची केलेली तुलनाही येथे कोणाला आठवेल. ऑझ्अ आणि पेअर संबंधांचे चित्रण आपण प्रत्यक्ष आपल्या आईच्या व स्वतःच्या संबंधावरून केले होते हे इब्सेन म्हणत असे. पेअर ग्यून्टची आई ऑझ्अ ही अठराव्या शतकातील स्त्री आहे. खानदानी पण अशिक्षित. तिचा या ट्रोल्स-कथांवर विश्वास असेलही वा नसेलही. पण तिने तो विश्वास पेअरच्या मनात नकळत रुजविला आहे खरा. पेअरच्या या कृत्यामुळे पेअरवर पकड वॉरंट निघते. पेअरला फाशी दिले जाण्याचीही शक्यता आहे. पेअर पळून जातो पण ऑझ्अची शेतीवाडी जप्त होते. तिला भीक मागायची वेळ येते. अर्थातच हा धक्का सहन न होऊन आधीच विपन्नावस्थेत असलेली ऑझ्अ झोलवेग्यला मागे सोडून मरण पावते. पेअरला ट्रोल्सने झपाटलेला आहे आणि तो त्यामुळेच काळीमा फासणारी कृत्ये करतो, थापा मारतो अशी तिची समजूत झाली असल्यास नवल नाही. आपल्याकडेही नादान वा दुर्दैवी निघालेल्या मुलांचे पालक, दोषांचे खापर कुंडल्यांतील ग्रहांवर फोडतात आणि मुलगा चांगलाच आहे. असे समजतात तसा हा प्रकार होतो. आईचे मन इब्सेनने किती हळूवारपणे रंगविले आहे हे आपण समजू शकतो. इब्सेनच्या मनातही ट्रोल्सचे आकर्षण त्याच्या आईनेच नकळत निर्माण केले हे इब्सेन जाता जाता सांगून जातो.

गत्तापर्चा डेव्हिल्स म्हणजे तांबड्या जिभा असणारी विशिष्ट पिशाच्चे. यांच्या छोट्या मूर्ती इब्सेनच्या लिखाणाच्या टेबलावर ठेवलेल्या असत. 'मी जे लिहितो त्यात ट्रोल असला पाहिजे' असे तो एका मित्राला म्हणाला आणि त्याच्यापाशी मोठ्या पिशाच्यांविषयी त्याने बोलणे केले. अगदी अडीअडचणीच्या वेळीच मी त्याला बाहेर बोलावतो. खोलीचे दार मी लावून घेतो नि मग त्याला बाहेर काढतो. माझ्या बायकोला, सुझानालादेखील हा ट्रोल दिसत नाही. हा ट्रोल म्हणजे वायलीन वाजविणाऱ्या व पायाने ठेका धरणाऱ्या अस्वलासारखा आहे, असे इब्सेनने एका संभाषणात गांभीर्यमिश्रीत गमतीने सांगितल्याची कथा सुप्रसिद्ध आहे. आर्चर या ब्रिटिश समीक्षक व इब्सेनची नाटके भाषांतरीत करणाऱ्या लेखकाने अशा मूर्ती इब्सेनच्या खोलीत नसत असे म्हटले आहे तर मायरने ही मूळ कथा देऊन[२] कदाचित असे असेल की प्रत्यक्ष लिखाण करायच्या वा नोट्स् काढायच्या वेळीच इब्सेन या मूर्ती समोर ठेवीत असेल एरवी टेबलाच्या ड्रॉवर-मध्ये ठेवीत असेल अशी मल्लीनाथी केली आहे.

इब्सेनला वाढत्या वयातही ट्रोलची कल्पना आकर्षक व अर्थपूर्ण वाटत होती. आपण जे लिहू त्यात पैशाचिक वाटेल इतके प्रतिभेचे, अद्भुततेचे सामर्थ्य असले पाहिजे असे त्याला वाटत होते, एवढाच अर्थ आपण काढू शकतो. ट्रोलच्या खुद्द शारीरिक अस्तित्वावर त्याचा विश्वास होता हे इब्सेनचे एकूण जीवन पाहता अशक्य कोटीतले वाटते. लेखक त्यांना आवडणाऱ्या वस्तू टेबलावर वा लिहिण्याच्या खोलीत ठेवतात ही सर्वसाधारण गोष्ट आहे. त्यात विशेष काही नाही. कोणीही कलावंत निर्मितीला पूरक वातावरणच निर्माण करणार ( महात्मा गांधीदेखील त्यांच्या खोलीत तीन माकडांच्या मूर्ती ठेवीत असल्याची कथा प्रसिद्ध आहे). इब्सेन नावडणारे तत्कालीन लेखक वा समीक्षक इब्सेनचा चेष्टेने 'ट्रोल्सचा राजा' म्हणून उल्लेख करीत असत, तेव्हा त्यांच्यासमोर अशा कथा आणि त्याचे 'पेअर ग्यून्ट' हे नाटक असे.

'पेअर ग्यून्ट' हे ट्रोल-नाटचच आहे.[३] अंतिम मुक्तीसाठी नकळत आणि 'स्व'चे जतन करण्यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करण्याच्या पेअरच्या मार्गात ट्रोलसकझी विघ्ने आणतात, त्याला घोळात घेऊन कसे त्यांच्या जगतात नेतात, त्याला इतर काही ट्रोल्स स्वतःसारखे करण्याचा कसा डाव टाकतात पण पेअर कसा नशीब जोरावर असल्याने सुटतो; हा विक्रम, वेताळांवर कशी मात करतो हे या नाटकात मजेशीर-पणे मांडले आहे. पण पेअरच्या आधीच्या नाटकातूनही भुतेखेते, ट्रोल्स यांचे दर्शन घडते. ऑन दि विद्दा म्हणजे 'हिमपठारावर' या कवितेत अगदी तरुण वयात कवी डोंगरात जातो नि तेथे त्याला 'शिकारी' भेटतो. हा शिकारी त्याला त्याच्या दरीतील गावाशी असलेले सर्व संबंध जीवनाच्या सम्यक् दर्शनासाठी तोडणे भाग पाडतो असे दाखविले आहे. हा शिकारी troll–like आहे. आणि त्याच्या प्रभावाने झपाटला गेलेला कवी दरीतील सामान्य दैनंदिन जीवनाकडे परत येऊच शकत नाही. 'ओलाफ लीलये क्रान्स' या सुखान्तीकेतील नायक ओलाफ हा खानदानी शेतकरणीचा मुलगा आहे. पण त्याला 'आल्फहील्ड' नावाची सुंदर वन-कन्या भुरळ घालते, असा भाग येतो. वस्तुतः आल्फहील्ड निरागस आणि अतिशय सुंदर अशी आदिवासी



अनुक्रमणिका

कन्या आहे पण गावकरी मात्र तिच्याकडे ट्रोलने झपाटलेली मुलगी म्हणून बधतात. ओलाफच्या आईला किर्स्टनला तर ती चक्क ट्रोल-डाकीणच वाटते.

गेर्द ही 'ब्रान्द'मधील असामान्य व्यक्तिरेखा आहे. काही गावकरी तिला ट्रोलने झपाटलेली समजतात तर काहीजण तिला ट्रोल-कन्याच मानतात. ब्रान्दला तिच्याकडे नक्की कोणत्या दृष्टीने पाहावे हे समजत नाही. ती केवळ अर्धवट व दुर्दैवी भटकी मुलगी आहे हे त्याला पटत नाही. तिच्यात काहीतरी अद्भुत सामर्थ्य आहे हे त्याला निश्चित जाणवते. पण इब्सेनने ही व्यक्तिरेखा troll–like म्हणूनच रंगविलेली वाटते. अशा troll–like व्यक्तिरेखेत अद्भुत सामर्थ्य दाखविले जाते परंतु दुष्टावा, निर्घृणता अशी काहीच नसते. अशी व्यक्ती मेल्या व्यक्तीचे पिशाच्च तर नसतेच नसते.

ट्रोलसविषयीच्या कल्पना, कथा व संकेत हे पार ख्रिस्तपूर्व काळातील आहेत. क्रॉसची खूण, बायबलमधील प्रार्थना किंवा चर्चच्या घंटांचे आवाज यांसारख्या गोष्टी ट्रोलसना घाबरवितात व पार पळवून लावतात असे 'पेअर ग्यून्ट'मध्ये दाखविले असले तरी मूळ ट्रोलसकथा ख्रिस्तपूर्व काळाला जाऊन भिडतात. ख्रिश्चन चौकटीत भुताखेतांचे स्वतंत्र राज्य मानले आहे नि त्याचे आधिपत्य सैतानाकडे– ल्यूसिफर म्हणजेच मेफिस्टोफिलीझकडे सोपविले आहे. ख्रिश्चन धर्मातील या दंतकथेचे दर्शन 'पॅरडाईज् लॉस्ट' वाचणाऱ्या वाचकांना झालेले असते. अवघड आणि लॅटिनप्रचुर इंग्लिशमध्ये एका जुन्या दंतकथेचे, मिथ्चे दर्शन. ग्योएथेचे 'फाऊस्ट'देखील हीच सैतान कथेची चौकट स्वीकारते आणि त्या संकेतात शोकनायकाची व्यक्तिरेखा रंगविते. इब्सेनने मिल्टनचे महाकाव्य वाचलेले नव्हते पण शेक्सपीअरची काही नाटके आणि ग्योएथेचे 'फाऊस्ट' वाचलेले होते. ख्रिश्चन भुताखेतांची चौकट गृहीत धरून इब्सेनने 'प्रिटेन्डर्स' हे ऐतिहासिक नाटक लिहिले आहे. यातील खलनायक बिशप निकोलस हा ख्रिश्चन आहे. त्यामुळे साहजिकच या नाटकात प्राचीन नोर्स ट्रोलविश्व समोर ठेवण्यापेक्षा ख्रिश्चन संकेताच्या चौकटीचा वापर केलेला आहे. एक प्रसंग विलक्षण प्रभावी आहे–

संन्याशांचा एक घोळका पराभूत मन:स्थितीत असणाऱ्या स्कूल्येला भेटतो. राजा स्कूल्ये एकटा आहे व त्याला मार्ग सापडत नाही. एक संन्यासी त्याला रस्ता दाखविण्यासाठी मागे थांबतो. त्या वेळचा हा प्रसंग आहे.

(...झाडी. धुके दूर होते आणि आकाशात तांबडा धूमकेतू कुंद हवेतून, अर्धवट धुक्यातून चमकताना दिसतो).

**स्कूल्ये** : पीटर, माझा मुलगा (मागे सरकून) हा: ! आकाशात चमकते आहे धगधगती तलवार !

**संन्यासी** : (झाडाच्या तोडलेल्या बुंध्यावर त्याच्या मागे बसत) हा पाहा मी आलो.

**स्कूल्ये** : कोण आहेस तू ?

**संन्यासी** : तुझ्या जुन्या ओळखीतला.

**स्कूल्ये** : इतका पांढराफटक पडलेला माणूस मी कधीच पूर्वी बघितला नव्हता.

**संन्यासी** : ओळखतोस तू मला ?

**स्कूल्ये** : मला एल्गेसेतरला घेऊन जायचं कबूल केलेला संन्यासीच ना तू ?

**संन्यासी** : तुला अगदी सिंहासनावर बसवू शकणारा मी आहे.

**स्कूल्ये** : खरंच करणं जमेल हे तुला ?

**संन्यासी** : तू जर मनात आणलंस तर मी करू शकतो.

**स्कूल्ये** : पण कसं करणार हे तू ?

**संन्यासी** : पूर्वीप्रमाणेच मी तुला उंच डोंगरावर घेऊन जाणार नि तेथून तुला जगाचे वैभव दाखविणार.

**स्कूल्ये** : जगाचे सारे वैभव मी मोहमयी स्वप्नात पाहिलेले आहे.

**संन्यासी** : अरे, ती स्वप्ने मीच पाठविली होती तुझ्याकडे.

**स्कूल्ये** : कोण आहेस तू ?

**संन्यासी** : दूत, जगातील सर्वांत जुन्या तोतयाचा दूत.

**स्कूल्ये** : जगातील सर्वांत जुन्या तोतयाचा ?

**संन्यासी** : त्या 'पहिल्या' सरदाराकडून आलोय मी. ज्याने सर्वांत मोठ्या साम्राज्याविरुद्ध बंड पुकारले आणि ज्याने स्वत:चे अंतिमदिनापर्यंत टिकेल असे राज्यही स्थापन केले त्याच्याकडून.

**स्कूल्ये** : (मागे सरकत दचकून ओरडतो) बिशप निकोलस !

**संन्यासी** : (उठत) ओळखलंस ना आता ? काहीच दिवसांपूर्वी होतो आपण स्नेही. आता केवळ तुझ्यासाठी मी परत आलोय.

अनुक्रमणिका

एकाच गलबतात होतो आपण एकत्रपणे सुकाणू धरून.
एकत्रच जलप्रवास केला आपण काही वर्षे.
मृत्युसमयी थरथरा कापत होतो मी कारण
ससाण्याने रुतविले होते, त्याचे पंजे खोल माझ्या हृदयात
अंत्यस्तवनांची केली मी मागणी,
त्यांना सांगितल्या घंटा वाजवायला.
प्रार्थना मी खरेदी केल्या, त्या सुस्वरात गायिल्या गेल्या.
त्यांनी चौदा म्हटल्या मी सातच स्वीकारल्या.
पण स्वर्गाची महाद्वारे मला गेली नाहीत उघडली.

**स्कूल्ये :** म्हणजे तू येतो आहेस तर खालून ?

**संन्यासी :** हो ! पाताळातील राज्यातून येतोय मी
ज्यांची उगाचच केली जाते फार फार बदनामी.
इतर जागांपेक्षा काही नाही ती वाईट अन् उष्ण-
ताही नाही तेथे दाहक, सांगितली जाते तशी. ...

यानंतर, सुरुवातीच्या पराभवामुळे हाय खाल्लेल्या राजा स्कूल्येच्या मनात, आता पिशाच्च झालेला आणि सैतानाचा निश्चितपणे हस्तक झालेला बिशप निकोलस नॉर्वेचे संपूर्ण राज्य जिंकण्याची आकांक्षा परत जागी करतो. मी नाही तर माझा मुलगा तरी राजा होईल आणि संपूर्ण नॉर्वेवर एकछत्री राज्य करेल हा विचार स्कूल्येच्या मनात प्रज्वलित होतो. या प्रवेशातील संन्यासी 'काळचा वेषात' आहे. नुकत्याच मेलेल्या निकोलसचे ते भूत आहे. या ठिकाणी जी भाषा, जी सांकेतिकता दिसते ती ग्योएथेच्या फाऊस्टशी जुळणारी आहे आणि नाटकाची एकंदर चौकट शेक्सपीयरच्या मॅकबेथसारखी आहे. ह्योकोन हा राजा होऊ नये असे सैतानाला वाटते कारण ह्योकोनची परमेश्वरावर भक्कम श्रद्धा आहे आणि तो प्रकाशाचा पुत्र आहे. उलट राजा स्कूल्ये हा देखणा, अनुभवी असला तरी मनाने द्विधा होणारा, दुबळा आहे आणि म्हणूनच सैतानाला तो आपल्या तावडीत सापडेल याची खात्री आहे. एकसंघ नॉर्वेची निर्मिती होणे आणि ह्योकोन त्याचा राजा होणे हे ईश्वरी प्रयोजन मानले तर स्कूल्ये साहजिकच–ईव्हिल–दुरात्मा ठरतो व एकूण झगडा दैवी शुभशक्ती विरुद्ध सैतानी दुष्टशक्ती यांच्या पार्श्वभूमीवर रंगविला जाऊ शकतो. बिशप निकोलस ही असामान्य व्यक्तिरेखा निर्माण करून इब्सेनने नेमके हेच साधले आहे. अर्थात ऐतिहासिक शोकनाटकाच्या चौकटीत हे दृश्य 'भास' म्हणून येते. शेक्सपीयरच्या किंवा ग्योएथे यांच्या नाटकांतील दृश्यांपेक्षा ते कमी 'वास्तविक' पण तितकेच निर्णायक राहाते. महत्त्वाची आणि इब्सेनने कटाक्षाने दाखविलेली गोष्ट म्हणजे स्कूल्येला बिशप निकोलस पिशाच्च होऊन भेटला हे पाहणारा तिसरा कोणीच नाही. म्हणजे स्कूल्येच्या दृष्टीने घडलेली प्रत्यक्ष घटना तर इतरांच्या दृष्टीने ऐकीव वाटेल अशी घटना असे या दृश्याचे स्वरूप आहे. या प्रवेशाच्या शेवटी संन्याशाचे पिशाच्च अचानक अंतर्धान पावते आणि स्कूल्ये भानावर येतो असे दाखविले आहे. म्हटले तर घडलेली घटना, म्हटले तर खचलेल्या मनाला झालेला भास अशी ही क्लृप्ती आहे आणि नेमकी हीच क्लृप्ती इब्सेनने पुढे 'पेअर ग्यून्ट' या नाटकात जरा मोठ्या प्रमाणावर वापरली आहे. पेअरच्या डोक्यावर मार बसल्याने तो बेशुद्ध होतो व त्या अवस्थेत ट्रोलचा सारा भाग घडून जातो असे इब्सेनने तेथे दाखविले आहे.

'पेअर ग्यून्ट' नाटकातील ट्रोल-जगतात भरपूर भुतेखेते आहेत. म्हातारी भुते, त्यांची मुले, नातवंडे, त्यांचे परस्परांतील व्यवहार हे सारेच तेथे चालले आहे. मानवी नैतिक तत्त्वज्ञानाच्या नेमके उलट तत्त्वज्ञान ट्रोल्सचे आहे. कारण त्यांचे जगच मुळी 'मृत्यूनंतरचे' जग आहे. पण या जगताचा एक मुख्य प्रतिनिधी म्हणून ब्योय्ग ( Boyg ) हा ट्रोल इब्सेन रंगवितो. ज्या 'गुब्रान्द्सदाल'च्या लोककथेतून इब्सेनने १८ व्या शतकातील पेअरचे पात्र उचलले आहे त्या कथेत ब्योय्ग एकदाच येतो. आसब्योर्नसन ह्या विद्वान संशोधकाने अनेक लोककथा एकत्र संकलित करून त्यांचा अभ्यास केला होता. त्याच्या संकलनात ब्योय्ग 'ग्रेट ब्योय्ग ऑफ एतनेदाल' या नावाने येतो. हा ट्रोल अक्राळविक्राळ, घसरडा हात लावताच शिसारी येईल असा आहे. डोंगरातील स्वतःच्या झोपडीकडे परतणाऱ्या पेअरचा मार्ग तो अडवितो कुठल्याही बाजूने पेअर पळू लागला तरी हा गिळगिळीत आकार त्याला आडवा येतोच. पेअर मोठ्या मुश्किलीने त्याचे डोके हुडकून काढतो ती त्यात तीन गोळ्या झाडतो. पण व्यर्थ; कारण ब्योय्गवर कुठल्याच शस्त्राचा परिणाम होऊ शकत नाही. आसमंत मात्र चेष्टा करताना हसावे तशा खदखदा हास्याने भरून जातो. ब्योये या

नॉर्वेजियन शब्दाचा अर्थ वाकविणे, वाकणे. बिगेन हा जर्मन शब्दही वेडेवाकडे, अक्राळविक्राळ असे सूचित करतो. ज्यामुळे मार्ग बदलावा लागतो असे काहीतरी असाही एक अर्थ आहे. ब्योय्ग हा सर्वांत भयानक ट्रोल आहे कारण त्याला निश्चित आकार नाही.

The Boyg who was wounded
the Boyg who is whole
the Boyg who was slain
and the Boyg who's a live !

असे त्याचे वर्णन आहे. होमरच्या ओडिसीत एकाक्ष ट्रोल आहे तर जुन्या चिनी लोककथांतून ड्रॅगोन आहे. ड्रॅगोन हा पंख असलेला सर्पराज आहे. पण या मंडळींना दृश्य असा आकार आहे. ब्योय्गला तो नाही. तो ब्योय्गला मारण्यात पेअरला यश येत नाही. बॉण्ड फिल्मस्‌मध्येदेखील असे अपयश बॉण्डला स्वीकारावे लागत नाही. मग पेअरची सुटका होते तरी कशी ? तर ती चर्चच्या घंटा वाजू लागल्याने होते. शुभशक्ती सूचित करणारे घंटानाद ऐकल्यावर ब्योय्ग पळ काढतो. आजही हॉरर ऑफ ड्राक्यूलासारख्या चित्रपटात अशी क्लृप्ती वापरली जाते. जुन्या वायकिंग-काळातील कथांत ट्रोल हा अस्वलासारखा किंवा हिम-मानवासारखा कल्पिला जाई. ब्योय्ग हे पिशाच्च त्याच्या निराकारत्वामुळे आपल्याही लक्षात राहाते.

ब्योय्गचे दुसरे वैशिष्टय हे की, तो ट्रोल-तत्त्वज्ञान मांडतो. इब्सेनी तत्त्वज्ञानात ‘ स्व ’ जपण्याला कमालीचे महत्त्व आहे. तुम्ही अगदी राज्य मिळवले पण तुमचा ‘ स्व ’ हरपला तर त्याची किंमत कवडी-मोल होते असे पेअर त्यांच्या मित्रांना सांगतो. पण ब्योय्गच्या तत्त्व-ज्ञानात ‘ स्व ’ गहाण टाकण्याला महत्त्व आहे. शास्त्रज्ञ फाऊस्ट जसा त्याचा ‘ आत्मा ’ मेफिस्टोफिलिस्‌कडे गहाण टाकतो त्याप्रमाणे पेअरने त्याचा ‘ स्व ’ ट्रोल मंडळींकडे गहाण टाकावा हा ब्योय्गचा आग्रह आहे. हा आग्रह पाहिल्यावर ट्रोल्सशी लढणे म्हणजे काय ? याचा अर्थ उलगडू शकेल. ट्रोल्सशी लढणे म्हणजे स्वतःचा स्व शाबूत राखणे, स्वतःची वैशिष्टये टिकवून धरणे. केवळ सत्ता व संपत्तीसाठी स्वतःला विकत राहणारा माणूस दुसरा ट्रोलच होतो. त्याला विधि-निषेधाची काही पर्वा राहात नाही. तो काहीही अनन्वित कृत्ये करू शकतो आणि करू लागतो. अतिरिक्त व्यसना-धीनताही माणसाचे ट्रोलमध्ये रूपांतर करू शकते. प्रकाशाच्या सृष्टीतून तो अंधाराच्या सृष्टीत प्रवेश करतो. पेअर दोनदा पूर्ण नष्ट होण्याच्या, म्हणजे ट्रोल होण्याच्या अडचणीत सापडतो आणि कर्मधर्मसंयोगाने वचावतो.

पेअरवर आणखी एक बाका प्रसंग ट्रोल्स आण-तात आणि इब्सेनने मोठ्या कौशल्याने तो रंगविला आहे –

**स्त्री** : नमस्कार पेअर महाराज, पलायन-पटू पेअर !

**पेअर** : कोण आहेस तू ?

**स्त्री** : तुझी जुनी मैत्रीण आहे मी पेअर. जवळच राहाते मी. आपण शेजारी आहोत.

**पेअर** : आपण ? मला तर हे प्रथमच कळतंय्.

**स्त्री** : तुझी झोपडी बांधली गेली ना तेव्हां मीही माझी झोपडी शेजारीच बांधली.

**पेअर** : (निघून जाऊ लागतो) मी गडबडीत आहे–

**स्त्री** : पोरा तू नेहमीच, असायचास
पण मीही असे नेहमीच तुझ्या मागावर
नि अखेरीस पकडलंच मी तुला.

**पेअर** : घोडचूक केलीस बये.

**स्त्री** : होय– फार फार पूर्वी !
ज्या दिवशी तू दिलीस मला भरमसाठ वचनं ?

**पेअर** : मी नि भरमसाठ वचनं ? काय आहे ही भानगड ?

**स्त्री** : माझ्या वडिलांच्या घरी. तू सपाटून प्यालास
ती रात्र तू दिसतोस विसरला.
पार पार विसरला.

**पेअर** : मला माहीत नाही तेच विसरलोय मी म्हणायचं.
अगं भकतीस काय, भेटलो तरी कधी आपण ?

**स्त्री** : पहिली भेट हीच होती आपली शेवटची.
(मुलाला) जारे आण तुझ्या वडिलांना काही प्यायला. तहानलेत ते.

**पेअर** : ह्याचा मी बाप ? अगं तूच प्यायलेली दिसतेस. तुला असं म्हणायचं की–

**स्त्री** : या डुकराची कातडी हात लावून पाहिलीस तर कळेल. कुठायत तुझे डोळे ? हे पोर जसं पांगळं आहे तसाच तू आहेस मनाने पांगळा, हे दिसत नाही तुला ?

**पेअर** : तुला खरंच वाटतंय की–

**स्त्री** : तू निसटून जातोय्स की काय ?

**पेअर** : हे टंगाळं कार्टं–

अनुक्रमणिका






**स्त्री** : कसा भराभर वाढलाय पहा.

**पेअर** : चांडाळणे ... तू बतावणी करतेस काय ?

**स्त्री** : पेअर, मी म्हणते तू आहेस बैलोबा. चालीरीती नसलेला. टेकडीच्या बाजूला तू मला मोहात पाड-लेस तेव्हा होते तेवढी सुंदर मी नाही आता हा दोष काय माझा ? सुगीच्या दिसात मला मुलगा झाला तेव्हा सैतानच होता सुईणपण करायला. नव्हते दुसरे कोणी. आता मी कुरूप आहे त्यात आश्चर्य काय ? मी राहावे सुंदर कायमचे, असे वाटत असेल तुला तर ते त्या बायडीला दाखवून दे. तिला दृष्टिआड, पार मनातूनही हाकलून दे. हे तर कर नि पाहा टाकून देते मी हा ओंगळपणा.

**पेअर** : हे डाकिणी, कैदाशिणी दूर हो माझ्यापासून. तोंड काळे कर.

**स्त्री** : अरे जा, पाहा तर खरं हटतेय का मी ?

**पेअर** : टाळकंच फोडीन मी तुझं.

**स्त्री** : पाहा तर खरं ते करून !
अरे पेअर, मी खाऊ शकते घणाघाती ठोसे. प्रत्येक दिवशी येईन मी येथे– दरवाजातून डोकवीन– तुमच्या हालचालींवर लक्ष ठेवीन शेकोटीपाशी तुम्ही बसलेले असाल. तू तिला प्रेमाने कुरवाळू लागशील. तेव्हा बसेन मीही शेजारी नि माझा वाटा मागीन. हो मग. वाटून घेऊ तुला मी नि ती. अच्छा ! जाते मी लाडक्या. जा उद्या नि कर लग्न.

**पेअर** : नरकातील भयस्वप्न म्हणजेच तू.

**स्त्री** : हो मी विसरतच होते.
अरे हलक्या पावलाच्या बदमाषा
या पोराला तू वाढविलेच पाहिजे.
हे भडव्या, जायचंय का तुला बापाकडे.

**मुलगा** : ( पेअरकडे पाहून थुंकतो ) हॅं: थांब जरा कुऱ्हाडच घालतो तुझ्या डोसक्यात.

**स्त्री** : आश्शी ! काय डोकं आहे पण पोराचं. मोठा होशील तेव्हा होशील अगदी बापासारखा.

**पेअर** : (पाय आपटीत) पार दूर चालते व्हा तुम्ही.

**स्त्री** : फार जवळ आहोत म्हणून का ?

**पेअर** : (मुठी आवळत दातओठ खात) हे सारं निर्माण झालंय–

**स्त्री** : केवळ विचार नि वासनांतून,
बिच्चारा दुर्दैवी पेअर !

**पेअर** : ती तर जास्तच दुर्दैवी म्हणायची.
झोलवेय्य– माझा निर्मळ ठेवा.

**स्त्री** : खरंच– निरपराध्यांनाच सोसावं लागतं नेहमी–
वडील प्याले म्हणून पोराला भोसाडलं
त्याच्या आईने तेव्हा सैतान हेच म्हणाला !
(ती पोराबरोबर जंगलात निघून जाते. जाताना पोरगा पेअरकडे flagon टाकतो)

**पेअर** : वळसे घेऊन जा ! ब्योयग म्हणेल तसंच केलं पाहिजे मला.
माझा राजवाडा कोसळलाय् आता धुळीत !
तिच्याभोवती वाढलीय भिंत जणू– मी किती जवळ होतो.
आता सारंच बनलंय कुरूप– माझा आनंद झालाय् जख्ख
वळसे घेऊन जा ! दुसरा मार्गच नाही आता सरळ तिच्याकडे नेणारा...

यानंतर, पश्चात्ताप, दु:खाचे कढ, बायबलचे पठण इत्यादी सारे पेअरला आठवते. पण या साऱ्यांवर त्याचा विश्वास तर नसतो. आपल्यापासून ट्रोल-स्त्रीला मुलगा झालाय ही घटना खरी असो वा खोटी; तिची नुसती शक्यताच पेअरचा सारा आनंद पार नष्ट करते. तो अगतिक होतो नि देश सोडून जातो. पेअरची तथा-कथित पत्नी झोलवेय्य त्याची वाट पाहाण्याचे आश्वासन देते. अगदी आयुष्याच्या अंतापर्यंत वाट पाहावी लागली तरी ती पाहाण्याचे आश्वासन. आणि दिलेला शब्द ती निर्धाराने पाळतेही.

हा प्रवेश रंगभूमीवर छान वठतो आणि नाटकातही तो मोक्याच्या जागी आहे. पण या प्रवेशाचे मोल आणखी आहे. इब्सेनच्या जीवनातील एका अत्यंत कडवट घटनेचे प्रतिबिंब त्यात उमटले आहे. तरुणपणी विश्वविद्यालयीन विद्यार्थी असताना हेन्रिक्, ग्रिमस्टाड् या गावी राहात होता. दिवसा औषधे तयार करणाऱ्या वैद्याच्या दुकानात काम आणि रात्री अभ्यास असा दिनक्रम असे. आर्थिक परिस्थिती कमालीची वाईट. अशा परिस्थितीत जीवनाचा अनुभव नसणाऱ्या हेन्रि-कला सोफी एल्झ्अ नावाच्या (देखण्या) मोलकरणी-पासून अनौरस मुलगा झाला. या प्रकरणाचा गाजावाजा झाला नाही, कारण सोफी गाव सोडून दुसऱ्या गावी निघून गेली व पुढे हलाखीचे आयुष्यच तिच्या वाटचाला आले. ही घोडचूक इब्सेनला आयुष्यभर








अनुक्रमणिका

खोलवर डाचत राहिली. तिचेच प्रतिबिंब या ठिकाणी स्पष्टपणे उमटले आहे.

एकीकडे झोलवेय्यचे सौंदर्य आणि विशुद्धता तर दुसऱ्या बाजूला पेअरचे ट्रोल्सनी भ्रष्ट केलेले जीवन व त्यामुळे त्याच्या मनात निर्माण झालेली खंतभावना आणि अगतिकता यांचे अतिशय तरल व काव्यात्म चित्रण या व नंतरच्या प्रवेशांत इब्सेनने केले आहे. झोलवेय्यच्या अंगाला स्पर्शही करण्याची आपली लायकी नाही असे पेअरला वाटल्यास नवल नाही. पण या अधःपतनापासूनही पेअर वाचणार आहे याची खात्री आपल्याला वाटते. कारण ब्योयूगने आधीच म्हणून ठेवले आहे की पेअर फारच शक्तिमान आहे; कारण त्याच्या पाठीशी चारित्र्यवान स्त्रियांचे प्रेम व सदिच्छा आहेत. दस्तयेवस्कीच्या रास्कोलनिकफचे जसे पुनरुत्थान सोनियामुळे होते तसेच पेअरचेही झोलवेय्यच्या निस्सीम प्रेमाच्या सामर्थ्यामुळे होणार आहे.

निसर्गाचा विचार बाजूला ठेवून एकदा का आपण निसर्गातीत दैवी शुभशक्ती मानली की तिचा व्यत्यास म्हणून अशुभ पैशाचिक शक्ती मानणे येते. कारण केवळ दैवी शुभ-शक्ती सर्वच मानवी व्यवहारांचे स्पष्टीकरण देऊ शकत नाही आणि एकदा या दोन शक्ती–दोन्ही अति-नैसर्गिक (सुपर-नॅचरल) –मानल्या की माणूस आणि मानवी जीवन हे त्यांचे संघर्षस्थान होतेच. 'प्रिटेन्डर्स', 'ब्रान्द' आणि 'पेअर ग्यून्ट' ही तीनही नाटके लिहिणाऱ्या इब्सेनचा या अन्वयार्थावर विश्वास नव्हता; पण त्याने निवडलेल्या कथा व त्यांचा काळ या दोहोंमुळे त्याला या अन्वयार्थाला, नाटककार या नात्याने, नाटकातील व्यक्तींच्या दृष्टिकोणातील घटक म्हणून स्वीकारावे लागले. 'पेअर' मध्ये या अन्वयार्थाचा फायदा असा झाला की ट्रोल्सच्या मुखातून त्याला तत्कालीन समाजातील ज्या ढोंगी गोष्टी खटकत होत्या, त्यांच्यावर उपहास-विडंबनात्मक टीका करता आली. पण लवकरच हा मार्ग सातत्याने वापरता येण्यासारखा नाही हे त्याच्या लक्षात आले. शेक्सपीअरने भुतांचा, डाकिणींचा, चेटकिणींचा वापर केलेला आहे. पण तो त्याचा त्यांच्यावर विश्वास असावा म्हणून. तसा त्याचा विश्वास नव्हताच याबद्दल आपल्याजवळ (म्हणजे ब्रिटिशांजवळही) खात्रीशीर पुरावा काहीच नाही. भुतेखेते कपोलकल्पित आहेत, त्यांना अस्तित्व नसते असे निःसंदिग्धपणे मांडलेले त्याच्या नाटकात तरी आढळत नाही. आणि त्याचा काळ म्हणजे इंग्लंडमधील सोळावे पुनरुज्जीवनाचे शतक पाहता, ते आपल्याला आश्चर्यकारकही वाटत नाही. ग्योएथे हा प्रबोधनाचा नाटककार आहे. त्याने 'फाऊस्ट'चा लोककथा म्हणून, भाष्यार्थासाठी वापर केला आहे. त्याच्या इतर साहित्यकृतींत असा वापर क्वचितच आहे. इब्सेनची तुलना ग्योएथेशी होऊ शकते. 'पेअर ग्यून्ट'ला नॉर्वेजियन 'फाऊस्ट' म्हटले जाते त्याच्यामागे हा एक भाग आहे. [ इब्सेनचे व्यक्तिमत्त्व 'डेमॉनिक' होते, दुष्टात्म्यासारखे होते, असे काही परिचितांनी म्हटलेले त्याच्या चरित्रग्रंथांतून आढळते, पण ते ज्या अर्थाने आहे त्या अर्थाने खरा डेमॉनिक स्ट्रिण्डबर्ग होता असे दिसते. ] विशेष हे आहे की, लेडी इंगेर, फीस्ट ॲट सोलहूग, वार्यकिग्ज ही नॉर्वेजियन पार्श्वभूमी असलेलीच नाटके आहेत; पण त्यांत मात्र ट्रोल्सचा वापर येत नाही. लेडी इंगेरलाही 'भास' होतात पण ट्रोल्सची सृष्टी कोणत्याही पात्राला झपाटत नाही. यावरून ऐतिहासिकता आणि लोककथात्मकता यांच्याविषयीचा फरक इब्सेनच्या मनात असावा असे दिसते. हेटनरचे 'डास मॉडेर्नअ ड्रामा' हे पुस्तक इब्सेनने काळजीपूर्वक वाचले होते त्याचा हा परिणाम, फायदा असावा. ऐतिहासिक नाटकांचे उद्दिष्ट ऐतिहासिक व्यक्तींच्या मनोव्यापारांचे चित्रण हे आहे, दंतकथांची मांडणी नव्हे हे हेटनरचे मांडले आहे.

ज्याला आपण नकारात्मक मूल्ये म्हणून संबोधीत असतो– उदा. दुर्गंधी, मृत्यू, घाण, कुरूपता, व्यंग इ. यांचा आधार घेऊन भुतेखेते, पिशाच्चे यांच्याविषयीचे विचारमंथन सिद्ध होत असते. चोर, डाकू, स्मगलर्स यांचे विश्व हे मानवी विश्वातील विश्व म्हणजे मानवी समाजांतर्गत असते. ट्रोल्सचे विश्व, भुताखेतांचे विश्व ही वेगळी कल्पनासृष्टी असते. त्यामुळे तिचा आधार घेणे काल्पनिक विरुद्ध वास्तव अशा मांडणीकडे व संघर्षाकडे घेऊन जाते. पण फार ताणले तर, तपशीलात गेले तर या संघर्षातील कृतकता बाहेर पडू लागते. विधायक, होकारात्मक मूल्यांचा संपूर्ण निषेध हा वाचक–प्रेक्षकांना असंभवनीय वाटू लागतो. त्यात प्रेक्षकवर्ग सुधारलेला व सुशिक्षित असेल तर आणखीनच अवघड. शेक्सपीयर फ्रेंचांना फारसा आवडला नाही याचे एक कारण त्याची भुताखेतांची सृष्टी होते हे मराठी साहित्यप्रेमी माणसांना सहसा ठाऊक नसते. तुका-

अनुक्रमणिका

रामाला सदेह वैकुंठाला पाठविणाऱ्या किंवा ज्ञानेश्वरांना भिंत चालवायला लावणाऱ्या माणसांना शेक्सपीयरचा हा भाग खटकत नाही. इब्सेनचे मोठेपण हे की त्याने गोष्टी जागच्या जागी ठेवल्या. ट्रोल्स-कल्पनेचा जुना प्रचलित अर्थ सोडून देऊन त्यात नवीन आशय भरला पाहिजे तरच आपल्याला ती आणखी वापरता येईल हे त्याने ओळखले. हा प्रयत्न त्याने 'घोस्ट्स' या नाटकात केला. त्यातील महत्त्वाचा एक प्रसंग पाहू :

**मॅण्डर्स :** तुम्ही भित्र्या आहात म्हणून ! पण तुम्ही तशा नसतात तर ! हा घाणेरडा संबंध–

**आल्विग :** पण अशाच संबंधातून आपण निर्माण झालो आहोत असे म्हणतात. आणि अशी परिस्थितीच निर्माण करायला कोण आहे जबाबदार, मॅण्डर्स ?

**मॅण्डर्स :** अशा गोष्टींबद्दल मी तुमच्याशी चर्चा करू शकत नाही. तुमचे मन ताळ्यावर नाही. पण तुम्ही भित्र्या आहात असे म्हणणे–

**आल्विग :** मला काय म्हणायचेय ते सांगते. ज्यांच्यापासून सुटका नाही अशा भुतांनी मला पछाडलेय्. मी घाबरते आहे ती त्यांच्यामुळे.

**मॅण्डर्स :** काय म्हणालात ?

**आल्विग :** भुते ! रेजिना आणि ओसवाल्डला बोलताना ऐकले तेव्हा भुतांना पाहिल्याचाच भास मला झाला. आपण सारेजण भुते आहोत असे मला वाटायला लागले आहे. आपल्या आईवडिलांचा वारसा म्हणून जो आपण उचलतो तोच भुतांसारखा असतो असे नाही. सगळ्या प्रकारच्या जुन्या मृत कल्पना, जुन्या मृत समजुती, रूढी त्याही – ! खरे तर या गोष्टी आपल्यात जिवंत आहेत असे नाही. आपल्यात मूळ धरून बसलेल्या आहेत. त्यांच्यापासून आपण सुटूच शकत नाही. एखादे वर्तमानपत्र वाचायचा अवकाश, ओळीओळींतून ही भुते वावरताना मला दिसतात. साऱ्या देशभर असावीत ही भुते. वाळूच्या कणांप्रमाणे असंख्य. आपण सारेचजण प्रकाशाला घाबरतो आहोत.

**मॅण्डर्स :** वा: ! तुमच्या वाचनाचा हा सारा परिणाम– काय पण फळे आलीत त्याला ! हे गलिच्छ बंडखोर बेछूट नवे वाङ्मय !

**आल्विग :** तुमचे चुकतेय् पॅस्टरसाहेब ! खरे म्हणजे विचार करायला तुम्हीच मला प्रवृत्त केलेत. उपकारच आहे तो तुमचा माझ्यावर.

**मॅण्डर्स :** मी ?

**आल्विग :** हो ! माझी 'कर्तव्ये आणि त्यांचे पालन' यांच्या रस्त्यापुढे शरणागती पत्करून वागण्यात माझा आत्मा बंड करून चिडून उठत होता. पण ती योग्य असल्याचे तुम्ही सांगितलेत. तुमच्या उपदेशाचा अर्थ तरी काय याची चिकित्सा करावी असे मला त्यामुळेच वाटले. त्याच्यापैकी एक वीण मी उलगडली आणि मग काय सारा पटच उलगडला गेला नि मला कळले की, मशीनने विणल्याप्रमाणे मी त्यात विणली गेली आहे....

इब्सेनच्या मधल्या कालखंडात (१८६९–१८८२) जी सामाजिक, समस्याप्रधान म्हणून नाटके त्याने लिहिली, त्यांतील मोक्याचा असा हा प्रसंग आहे. सामाजिक, दांभिक रूढी, अंधश्रद्धा, खोटी वरकरणी मूल्ये, यांवर आघात करणारी ही नाटके आहेत. या साऱ्या गोष्टींकडे, इब्सेन विधवा मिसेस आल्विगप्रमाणेच भुतेखेते, ट्रोल्स म्हणून पाहू लागलेला आहे हे ठासून सांगणारा हा प्रवेश आहे. 'ए डॉल्स हाऊस' हे घोस्ट्सच्या आधीचे तर 'एनिमी ऑफ दि पीपल' हे घोस्ट्सच्या नंतरचे नाटक आहे हे लक्षात घेतले म्हणजे पुरे.

रेजिना आणि ओसवाल्ड यांचा प्रणय आल्विगबाईंना भुतांच्या प्रणयप्रसंगासारखा वाटतो; कारण असाच प्रणय प्रसंग त्यांनी ऐन तारुण्यात त्यांचा नवरा आणि एका नोकराणीत घडलेला पाहिलेला असतो. रेजिना ही अशाच व्यभिचारातून झालेली त्यांची सावत्र मुलगीच आहे. पण त्या वेळी, त्या प्रतिष्ठा, स्त्रियांची कर्तव्ये, नवऱ्याचा मान या भुतांच्या दबावाखाली मूग गिळून गप्प बसतात नि मग आयुष्यभर सोसणेच त्यांच्या वाट्याला येते. ओसवाल्ड त्याच्या बापासारखा आहे तर रेजिना तिच्या आईसारखीच. पुन्हा ते तसे संबंध घडू पाहाताहेत. आणखी कोणी भावी हेलेन आल्विग असेल तर तिचेही आयुष्य चिरडले जाण्याची शक्यता आहे. पॅस्टर मॅण्डर्स नि आल्विग यांच्यामध्ये कोणते भूत उभे आहे ? ते आहे (किंवा होते) चारित्र्याच्या कल्पनेचे भूत ! पॅस्टर मॅण्डर्सवर एक काळ हेलेनाने प्रेम केले, पण मॅण्डर्स त्याचा स्वीकारच काय, पण विचारही करू शकला नाही. कारण चारित्र्याची पारंपरिक मृत कल्पना, तिचे भूत. परिणामी नवराही नाही आणि प्रियकर वा मित्रदेखील

नाही. खानदानी प्रतिष्ठित घरात वाट्याला आल्विंग-बाईंना आलेले एकलकोंडे निर्जीव जीवन. भुतांचे आपण ऐकत जातो, अंधार स्वीकारतो, मृत कल्पनांच्या सावलीत आपणही मरतमरत राहतो. प्रकाश, चैतन्यमय आनंदी जीवन, जिवंत निर्मिती, आपल्यापासून दूर जातात. चर्च, घर, इतर संस्था, आता भुतांची ठिकाणे, भुतांचे वाडे झाले आहेत आणि त्यांच्या दडपणाखाली माणसे कोमेजून जात आहेत, चिरडली देखील जात आहेत. इब्सेनच्या मधल्या कालखंडात, त्याची प्रमुख पात्रे या भुतांविरुद्ध उभी राहातात. या अर्थाने लोना हेसेल, नोरा, विधवा आल्विंगबाई, डॉ. स्टोकमान हे सारे लढवय्ये बंडखोर आत्मे आहेत. लोककथेतील पेअरची जागा अथवा लोककथेतील ओलाफची जागा जीवनगाथेतल्या या आधुनिक नायक-नायिकांनी घेतली आहे. भुते मरत नाहीत, कारण बोलूनचालून ती भुतेच असतात. पण आपण त्यांच्या-विरुद्ध झगडू शकतो आणि मरण्याऐवजी जगू शकतो, कारण या भुतांचे अस्तित्वच आपण मानण्यावर असते.

अशा प्रकारच्या भुतांशी झगडा आज आपल्या-लाही द्यावा लागत आहे, कारण युरोप १९ व्या शत-काच्या अखेरीस ज्या अवस्थेतून गेला त्या अवस्थेतून आपण आता जात आहोत. वर्तमानपत्रे उघडली की हेलेन आल्विंगबाईंना जशी ओळीओळींतून भुतं दिसली तशीच आज आपल्यालाही दिसत असतात. कितीतरी जास्त मोठ्या प्रमाणावर एवढेच.

ट्रोल्स आणि भुतेखेते यांचा तिसऱ्या तऱ्हेने अन्व-यार्थ इब्सेनने लावला तो त्याच्या 'एनिमी'नंतरच्या नाटकातून साहित्यसाधनेच्या तिसऱ्या कालखंडात. या नाटकातून 'ट्रोल्स' म्हणजे मानवी व्यक्तिमत्त्वा-तील अतार्किक—इर्‌रॅशनल—शक्ती ठरतात. दस्तये-वस्कीची पात्रे ज्या आंतरिक शक्तींशी झगडत असतात, त्याच शक्तींशी इब्सेनची पात्रेही लढू लागतात. परि-णाम, दडपण जाणवते पण स्वरूप कळत नाही अशा शक्ती. मास्टर बिल्डर सोलनेस आणि हिल्डा हे दोघेही अशा शक्तींसमोर उभे आहेत :

**हिल्डा** : (त्याच्याकडे काळजीपूर्वक पाहात) सोलनेस, तुम्ही मला आजारी दिसता. मला वाटते खूपच आजारी.



**सोलनेस** : वेड लागलंय म्हण. खरं म्हणजे तुला तेच म्हणायचंय्.

**हिल्डा** : नाही, तुमच्या बुद्धीत काही बिघाड आहे असं वाटत नाही मला.

**सोलनेस** : मग कशात आहे ? स्पष्ट बोल.

**हिल्डा** : मला वाटतं की तुम्ही जन्माला आलात तेव्हाच तुमची विवेकशक्ती आजारलेली होती.

**सोलनेस** : आजारी विवेकशक्ती ? ही काय भानगड आहे ?

**हिल्डा** : मला म्हणायचंय की तुमची विवेकशक्ती—'कॉन्शन्स— अगदी दुबळी आहे. नाजूक बांधणीची आहे. वस्तुस्थितीवर पकड बसविण्याची क्षमताच तिच्यात नाही. — जड असं काही तिला पेलवत नाही.

**सोलनेस** : (उसळून) हः ! मग कशी असायला हवी एखाद्याची ही विवेकशक्ती ?

**हिल्डा** : ती अगदी धडधाकट असायला हवी.

**सोलनेस** : असं ? धडधाकट ? तुझी विवेकशक्ती आहे अशी धडधाकट ?

**हिल्डा** : अर्थात, मला तरी वाटते. ती तशी नसावी असं मला कधीच जाणवलं नाही.

**सोलनेस** : खरं म्हणजे, तिची कसून अशी परीक्षाच कधी झालेली नाही असं मला वाटतंय्.

**हिल्डा** : (थरथरत्या ओठांनी) ओः ! वडिलांना सोडून जायचं म्हणजे काही सोपी गोष्ट नव्हती. मला तर फार आवडतात माझे पपा !

**सोलनेस** : पोरी ! एखाद-दुसऱ्या महिन्यानंतर—

**हिल्डा** : मी घरी कधीच परतणार नाही असं मला वाटतं.

**सोलनेस** : कधीच नाही ? का सोडून आलीस त्यांना तू ?

**हिल्डा** : (काहीशा गंभीरपणे, काहीशा चिडविण्याच्या सुरात) तुम्ही विसरला वाटतं दहा वर्षे सरलीयत म्हणून ?

**सोलनेस** : खुळेपणा ! काही कुरबूर झाली वाटतं घरी ? अं ?

**हिल्डा** : (गंभीरपणे) या आंतरिक ऊर्मीने मला हल-वलं नि खेचून इकडं आणलं. भुलवलं नि ओढून इकडे आणलं.

अनुक्रमणिका






**सोलनेस** : बरोब्बर ! नेमकं उत्तर मिळालं पाहा, हिल्डा ! माझ्यात आहे तसा तुझ्यातही आहे ट्रोल. आपल्या अंतरंगात दडून राहिलेला ट्रोल आपल्याला बाहेरच्या शक्तीकडे जायला भाग पाडतो. मग इच्छा असो वा वा नसो– आपल्याला ते ऐकणं भागच पडतं.

**हिल्डा** : सोलनेस, तुमचं अगदी बरोब्बर आहे.

**सोलनेस** : (खोलीत येरझारा घालीत) ओः ! जगात इकडे तिकडे अनेक सैतान आहेत जे डोळयांना कधीच दिसत नाहीत.

**हिल्डा** : सैतान देखील ?

**सोलनेस** : (थांबत) चांगले सैतान आणि वाईट सैतान. तांबडया पिंग्या केसांचे नि काळया केसांचे. तुमच्यावर नक्की कोणत्या केसांच्या सैतानांची हुकूमत चालते हे तुम्हाला सांगता येईल तर शपथ ! (फिरत) हो हो ! तसं सांगता आलं तर फारच सोपं होईल सारं.

**हिल्डा** : (त्याच्याकडे पाहात) जर एखाद्याजवळ धडधाकट, तेजस्वी नि निरोगी विवेकशक्ती असेल तरच त्याला स्वतःच्या इच्छेप्रमाणे वागायची हिंमत होते.

**सोलनेस** : (टेबलाच्या मागे उभा राहातो) माझी खात्री आहे की त्या बाबतीत बहुतेक लोक माझ्याप्रमाणे किरकोळ प्राणी असतात.

**हिल्डा** : शंकाच नको.

**सोलनेस** : ( टेबलावर ओणवा होत ) सागांमध्ये– जुन्या सागा ग्रंथांपैकी वाचलायस एखादा तू ?

**हिल्डा** : हो तर ! मी पुस्तकं वाचायची तेव्हा– मी–

**सोलनेस** : सागांमध्ये आपण वायकिंग्जच्या, चाच्यांच्या कथा वाचतो. ते परक्या भूमीत जात, लूटमार करीत, जाळपोळ करीत, माणसांना ठार मारीत–

**हिल्डा** : अन् स्त्रियांना पळवून नेत–

**सोलनेस** : त्यांना कैदेत टाकीत–

**हिल्डा** : अन् त्यांना घेऊन घरी जात–

**सोलनेस** : त्यांच्याशी– वाईटांतल्या वाईट ट्रोल्सप्रमाणे वागत–

**हिल्डा** : (समोर शून्यात बघते, अर्धी नजर झाकलेली) काय थरकाप उडविणारी मजा असते ती !

**सोलनेस** : (खोल पण थोडाच वेळ हसत) बायका पळवून नेणं.

**हिल्डा** : पळवून नेलं जाणं.

**सोलनेस** : (क्षणभर तिच्याकडे पाहातो ) ओः खरोखरच.

**हिल्डा** : (संभाषण तोडीत) पण सोलनेस, वायकिंग्जविषयी बोलावं असं तुम्हाला का वाटलं ?

**सोलनेस** : का, त्या चाच्यांची विवेकशक्ती तुला हवी तशी धडधाकट होती ! ...

यानंतरच्या संभाषणात तीच सोलनेसचा बळी घेणार कारण तिची विवेकशक्ती धडधाकट आहे इ. भाग येतो.

माणसांच्या व्यक्तिमत्त्वात बुद्धिप्रधान, स्पष्ट होण्याजोगे म्हणजे रॅशनल घटक असतात त्याचप्रमाणे इर्-रॅशनल घटक असतात, ही जाणीव दस्तयेवस्कीप्रमाणे इब्सेनलाही झाली होती. मानसशास्त्राच्या उदयाचा तो काळ होता. माणसांना पडणारी स्वप्ने, त्यांच्या दपडलेल्या परंतु अबोध मनात जाऊन बसलेल्या इच्छा, वासना, माणसांची इच्छाशक्ती, काही गोष्टींविषयी वाटणारी अनाकलनीय ओढ यांसारख्या इर्-रॅशनल, –अ-तार्किक–घटकांची जाणीव इब्सेनला होती. या घटकांनाच तो ट्रोल्स म्हणून ओळखू लागला होता. त्यांचे मानवी वर्तनावर, व्यवहारांवर होणारे गुंतागुंतीचे परिणाम त्याला जाणवत होते. भूक, गरजा, व्यावहारिक चौकट, उपयुक्तता यांच्या आधारे माणसातील तार्किक स्व ( रॅशनल सेल्फ ) कार्यरत होतो, पण अ-तार्किक स्वदेखील ( इर्-रॅशनल सेल्फ) असतो असे इब्सेनच्या 'रोझमर्स होम'पासूनच्या नाटकांत उमटणारे विचारसूत्र आहे. ही नाटकेच फ्रॉईड आणि मनोविश्लेषणवाद्यांना अतिशय आवडत होती. इगो, सुपर इगो आणि इद या तीन थरांचा, व्यक्तिमत्त्वाचा विचार पुढे त्यांनी मांडला आणि त्याच्याशी इब्सेनचे ट्रोल्स त्यांनी निगडित केले. ट्रोल्स हे 'इद'चे प्रक्षेपण असल्याचे त्यांना वाटू लागले. या साऱ्यांची बीजे प्रस्तुतच्या, वरच्या संभाषणात दिसतात. इब्सेनने चांगले सैतान आणि वाईट सैतान असे शब्द वापरले आहेत. पण 'बायका पळवून नेणे' चा उल्लेख सूचक आहे. तो दडपलेली अतृप्त लैंगिक भावना सूचित करतो. अशीच दडपलेली लैंगिक भावना रोझमर व रिबेका यांना एकमेकांविषयी वाटणारी ओढ स्पष्ट करते.

लोककथांतील ट्रोल्सशी अथवा सामाजिक ट्रोल्सशी लढणे तुलनेने सोपे आहे. परंतु स्वतःच्याच व्यक्तिमत्त्वात–

इब्सेनच्या भाषेत अंतरंगात– दडलेल्या ट्रोल्सशी झगडणे फार दुरापास्त आहे. येथे कळते पण वळत नाही असे असते आणि कळते ते फार वरवरचे कळते. धर्मश्रद्धा ढासळत जाणे आणि रिबेकाच्या जवळ जाणे यांतील ट्रोल रोझमरला आकळणे अवघडच आहे.

वडिलांना सोडून जाणे सोपे नव्हते असे हिल्डा बोलून जाते. ती सोलनेसकडे येणे आणि वडिलांना सोडणे यांची सांगड घालते आहे. वडिलांविषयीचे आकर्षण किती गुंतागुंतीचे होते हे एका वाक्यातून बाहेर येते. अशाच प्रकारच्या गुंतागुंतीचे नाते लिटिल् इयोल्फ मध्ये आल्मर्स–त्याची सावत्र बहिण अॅस्टा– आणि पत्नी रीटा यांच्यात आहे. अॅस्टा इयोल्फवर प्रेम करत आहे कारण ती 'नकळत' आल्मर्सवर प्रेम करते आहे आणि रीटा स्वतःच्या मुलावर प्रेम करू शकत नाही कारण ती 'नकळत' अॅस्टाचाच द्वेष करते आहे. ती अंतरंगातील 'ट्रोल' समजू शकत नाही. आणि हा ट्रोल जणू तिला इयोल्फचा मृत्यू घडू देण्याची इच्छा करू देतो. 'वाईल्ड डक'मध्ये ग्रेगर्सला आईविषयी वाटणारे आकर्षण, वडिलांविषयी वाटणारा द्वेष यांची परिणती वडिलांची एके काळची सेक्रेटरी नीना हिच्या संसारात ढवळाढवळ करण्यात होते. माणसांच्या अतार्किक वर्तनामागे हे अंतरंगातील दडलेले ट्रोल्स इब्सेनला जाणवू लागतात. पण तो त्यांना नक्की नावही देऊ शकत नाही की त्यांचे विश्लेषणही करू शकत नाही. 'trolls in heart and soul' हे त्याचे सूचक शब्द आहेत. ते फक्त हे ट्रोल्स किती खोलवर दडलेले आहेत हे दर्शवितात.

हिल्डा दहा वर्षांनी घर सोडून सोलनेसकडे आली आहे. आणि ती पुनश्च त्याला त्या उंच टॉवरवर चढलेला पाहणार आहे. हे करताना त्याला मृत्यूही येणार आहे याचा तिला अंदाज आहे. पण ती त्याला स्वतःच्या इच्छाशक्तीच्या जोरावर हे कृत्य करायला भाग पाडणारच आहे. हा मृत्यू सोलनेसलाही आधी जाणवू शकतो, पण तोही उंच टॉवरवर चढण्याचे कृत्य करणारच आहे. तो ते टाळू शकत नाही. दोघांनाही कळते आहे पण माघारी वळता येणे शक्य नाही. हे का होते आहे ? कारण दोघांच्याही अंतरंगात ट्रोल्स दडलेले आहेत हे इब्सेनचे उत्तर आहे. गूढवाद आणि मानवी व्यक्तिमत्त्वाचे, मनोविश्लेषणाच्या पद्धतीने आकलन यांच्या सीमारेषेवर इब्सेन उभा होता.

पण इब्सेनचा भर reason वर होता. वय वाढत गेले. मानवी जीवनातील गुंतागुंत कळत गेली तसा हा भर, हा विश्वास कमी कमी होत गेला. पण इब्सेनचे व्यक्तिमत्त्व रीझनेबल राहिले. प्रत्यक्ष जीवनात झालेल्या अपेक्षाभंगांमुळे म्हणा किंवा घटनांमुळे म्हणा, विश्वास कशावर ठेवावा याबद्दल तो जास्त चिकित्सक बनला. किंबहुना त्याला विश्वासार्ह असेच काही वाटेना. त्याला अ-तार्किक (इर्-रॅशनल) घटक जाणवू लागला पण दस्तयेवस्कीप्रमाणे तो त्याचा उद्गाता बनला नाही की स्ट्रिण्डबर्गप्रमाणे तो त्यात वाहात गेला नाही. स्ट्रिण्डबर्गचा कशावरही विश्वास बसू लागला. या संदर्भात एफ्. एल्. ल्यूकासचा उद्गार मार्मिक वाटतो– Ibsen in fine was self–possessed; Strindberg was possessed.[४]

महत्त्वाची गोष्ट म्हणजे ट्रोल्स कल्पनेचे महत्त्व अगदी नव्या पद्धतीने इब्सेनला जाणवले तरी इब्सेनच्या मनाचा समतोल, त्याची विचाराची बुद्धिप्रधान चौकट यांना धक्का पोहोचला नाही. याचे कारण हे असावे की ठणठणीत प्रकृतीचा वारसा इब्सेनला त्याच्या आईवडिलांकडून मिळाला होता. प्रतिभा ही वेडाची बहीण असते ही समजूत त्याच्या नव्हे तर त्याच्या पात्रांच्या बाबतीत खरी ठरली. त्याने नव्या तऱ्हेने ट्रोल्स, सैतान सूचित केले. काही अंशी वर्णनात देखील आणले; पण या काळोख्या शक्ती त्याच्यावर मात करू शकल्या नाहीत... the evil forces of nature... embodying and symbolizing those powers of evil hidden in the soul of man which may at times supress his conscious will and dominate his actions ... By ever pandering to his evil instincts and desires, they have come to be really his rulers – mysterious powers that make him afraid of himself "[५] हे (मायरने उद्धृत केलेले) फ्रान्सिस बुलकृत ट्रोल्सचे वर्णन खूपसे यथार्थ आहे. या ट्रोल्समुळे इब्सेनही घाबरला असणार; पण तो त्यांना शरणही गेला नाही किंवा घाबरल्यामुळे एकदम धर्माकडेही आधारासाठी परत वळला नाही.

Evil forces of nature हे शब्द बुलने वापरले आहेत याचे कारण 'लिट्ल इयोल्फ' मध्ये Evil eye ची कल्पना येते. रॅट वुमनला इयोल्फ **बिचकतो**

कारण तिच्या नजरेतील भाव. तिची नजर इयोल्फवर पडते म्हणून इयोल्फचा मृत्यू घडून येतो असे नाही. पण तशी शंका रीटाच्या मनाला स्पर्श करून जातेच. रिबेका खरोखर evil नाही. ती लॅपलॅण्डमधून आलेली आहे. ती दुरात्मा नाही. बीटाच्या आत्महत्येला आपण कारणीभूत आहोत असे तिला वाटते पण नाटकात तिची दुष्टशक्ती वा तिच्यात दुःखद पर्यवसान घडवू शकेल अशी ट्रोल-शक्ती आहे असे दर्शविणारी दुसरी कोणतीही घटना नाही. वुलचे evil हे विशेषण थोडे ढोबळ आणि गडद आहे. ट्रोल्सच्या तिसऱ्या प्रकारच्या अन्वयार्थात इब्सेन अंतरंगातील गूढ शक्तींच्या दुष्टतेपेक्षा त्यांच्या अ-मानवीपणाबद्दल जास्त विचार करीत असावा. हेडाला थेआचे सुंदर केस जाळावेसे वाटते यात दुष्टपणापेक्षा अ-मानवी, विकृतपणा हे जास्त आहेत. केवळ दुष्ट व्यक्ती रंगविणे हे इब्सेनचे उद्दिष्ट दिसत नाही किंवा दुष्टतेचे विश्लेषणात्मक चित्रण करणे हेही दिसत नाही. मानवी व्यक्तिमत्त्वातील अनाकलनीय गुंतागुंत, विकृती यांच्याबाबत तो ट्रोल्सची कल्पना वापरीत असावा. शत्रूच्या बायका पळवून नेणे हे 'दुष्ट'पणाचे आहे, नाही असे नाही; पण हिल्डाला ते चित्तथरारक वा आकर्षक वाटते हे तो दाखवितो. याचे कारण हिल्डा आणि इब्सेन दोघेही 'आधुनिक' झालेले आहेत. केवळ नैतिक संकल्पनाच दोघेही वापरत नाहीत. सोलनेस, हिल्डा आणि इब्सेन सारीचजण जास्त खोलवर जाऊन काहीतरी मांडीत आहेत.

मानवी अंतरंगातील ट्रोल्सशी झगडण्याचे आणि त्यांच्यावर मात करण्याचे काही तंत्र इब्सेनला सापडलेले नव्हते. तो ट्रोल्सना मारणारा होता; पण हे अबोधमनात वसतीला असणारे ट्रोल्स मारता येतील किंवा मारलेच पाहिजेत असे त्याला वाटत असावे असे दिसत नाही. त्याने डॉ. वांगेलची व्यक्तिरेखा आणली आहे हेच मोठे सूचक आहे आणि फ्रॉईडसारख्या मंडळींना तेच दिलासा देणारे, प्रेरणा देणारे वाटले असणार यात शंकाच नाही. तलवार किंवा बंदुकीच्या गोळ्या हे नवीन ट्रोल्स मारणार नाहीत, प्रबोधन आणि बुद्धिवादही त्यांना काही करू शकणार नाहीत; तर त्यासाठी हव्यात डॉक्टर वांगेलसारखे डॉक्टर हे इब्सेनला निश्चित जाणवले असणार. सुरुवातीला नगरांच्या बाहेर डोंगरदऱ्यांत, रानावनांत अपरात्री भटकणारे ट्रोल्स दिसतात. नंतर समाजात वावरणारे पण दृश्य आकार नसणारे ट्रोल्स, भुते दिसतात तर शेवटच्या टप्प्यावर माणसाच्या अंतरंगातच दडून बसलेले अदृश्य ट्रोल्स उरतात. ट्रोल्सप्रमाणेच त्यांच्याशी चाललेला संघर्षही जास्त जास्त आंतरिक होत जातो, आणि त्यांच्याशी लढणारेही तलवारबहाद्दर, समाजसुधारक, डॉक्टर असे बदलत जातात. शेवटच्या टप्प्यावर तर इरीना आणि रूबेक दोघेही एका आरोग्यधामातच उतरलेले दिसतात. ट्रोल स्त्रिया एखादा पुरुष निवडतात. त्याला झपाटतात. त्याचा भोग घेतात आणि मग त्याला ठार करतात. पेअर ग्यून्टमधील ग्रीन-वुमन अशी ट्रोल आहे. रिबेका ट्रोलसदृश आहे. तिचे फिनमार्कमधून येणे, तिची दुसऱ्याला भारून टाकण्याची शक्ती, सागर-स्त्री ट्रोलसारखी चाल, हे सारे लक्षणीय आहे पण त्यात दुरित नाही. इरीनमध्ये हे सर्व संपलेले आहे. ती ट्रोलसदृश नाही असे नाही, पण ती चक्क वेडसर आहे. तिच्या आठवणीही सुस्पष्ट संगतवार नाहीत. ती सुरी घेऊन रूबेकच्या अंगावर धावून येऊ शकते.

इब्सेन हा शोकनाटचे लिहिणारा थोर नाटककार होता. त्याचे वैशिष्टच व मोठेपण हे की त्याने ट्रोल्सची नॉर्वेजियन कल्पना अशा तऱ्हेने वापरली की त्याच्या नाटचकृतींना गुंफणारी ती एक महत्त्वाची गोष्ट ठरली. ट्रोल्सशी झगडणा रेऱ्याचे नायक पराभूत देखील होतात; पण त्यांचा शोकान्त त्यांच्या धैर्यामुळे आणि लढतीमुळे उजळून निघतो. आपल्या लक्षात त्यांची झुंजण्याची तयारी राहाते. ट्रोल्सपासून त्याचे नायक, नायिका मुक्त होतात असेही नाही. ब्योर्ग आणि बटन मोल्डर परत भेटतील असे पेअरला वाटतेच. **तिसऱ्या** क्रॉसरोडची भीती आहेच. एलिद्य वांगेलने घराच्या किल्ल्या ताब्यात घेतल्या आहेत. पण या निर्णयानंतर देखील समुद्र-ट्रोल्सपासून ती मुक्त होणार आहे याची खात्री नाहीच आणि अगदी हेलेना आल्विंगलासुद्धा उरलेल्या थोड्याफार आयुष्यात मृत पुत्राचे–ओसवाल्डचे– पिशाच्च कशावरून भेडसावणार नाही. 'Ibsen chose to concentrate on the fight for freedom not so much on the implications of actually being free.' हे आस्ब्योर्न आर्सेकचे निरीक्षण ट्रोल्सपासून मुक्त होण्याच्या बाबतीतही लागू पडते.

आजही ट्रोल्स–भुते– नष्ट झालेली नाहीत. त्यांच्याकडून पराभूत होणेही संपलेले नाही. आकार आणि रंग पालटलेत. नावे मात्र बदललीत. जे कोणी अशा ट्रोल्सशी लढू पाहतील त्यांना इब्सेनचे स्मरण, प्रेरणा व सामर्थ्य देत राहील.

अनुक्रमणिका






**संदर्भ–**

१. Bradbrook M. C., *Ibsen the Norwegian* (Chatto and Windus), 1948 ed. पृ. ५२.

२. Meyer M., *Ibsen* (A biography) 1974 ed. (Penguine) पृ. ५८१.

३. Peter Watts अनुवादित आणि संपादित *Peer Gynt* ची आवृत्ती 1966 (Penguin) आणि Brian Downs कृत *A Study of Six Plays by Ibsen*, 1950 आवृत्ती, Cambridge University Press, पृ. ७० ते १०३.

४. Lucas F. L., *Ibsen and Strindberg*.

५. Bull Francis– M. Meyer ने त्याच्या इब्सेनचरित्रात उद्‌धृत केलेले अवतरण, पृ. २९०.

६. Aarseth Asbjqrn : *The idea of Freedom in Ghosts, Rosmersholm, and John Gabriel Borkman* हा लेख.





अनुक्रमणिका








# आपली वाङ्मयीन संस्कृती

रा. ग. जाधव

आपल्या समाजात लेखन करणारे आणि वाचणारे या दोहोंची संख्या वाढत आहे, असे दिसून येते. संख्येप्रमाणे या दोन्ही वर्गांचे जे सामाजिक क्षेत्र आहे, तेही विविध प्रकारचे असल्याचे दिसून येते. म्हणजे ज्या ज्या सामाजिक थरांतून लेखक आणि वाचक आढळतात, त्या सामाजिक थरांची विविधता लक्षात येते. संख्या आणि सामाजिक स्तर यांच्यातील या वृद्धीचे नेमके प्रमाण किती, हे मात्र निश्चितपणे सांगणे अवघड आहे. यासाठी स्वतंत्रपणे सर्वेक्षण करण्याची गरज आहे. आपल्या एकूणच वाङ्मयीन संस्कृतीच्या दृष्टीने त्या प्रकारचे सर्वेक्षण अत्यंत उद्‌बोधक आणि उपयुक्त ठरू शकेल. १९८१ च्या जनगणनेनुसार महाराष्ट्रातील साक्षरतेचे प्रमाण ४७.३७% आहे. तथापि साक्षरतेच्या या प्रमाणावरून लेखक आणि वाचक यांच्या प्रमाणांचा अंदाज करणे अचूक ठरणार नाही. सगळेच साक्षर लोक आपल्या विशिष्ट आवडीनिवडी जपण्यासाठी विशिष्ट प्रकारचे लेखन हमखास वाचतातच, असे निश्चितपणे म्हणता येणार नाही. त्याचप्रमाणे लेखन करणाऱ्या व्यक्तींचा साक्षरतेशी आणि कमी-अधिक शिक्षणाशी संबंध असतोच असेही म्हणता येणार नाही. तथापि लेखक-वाचकांची संख्या व क्षेत्र वाढती आहेत, असे आपण म्हणतो किंवा असे आपणास जाणवते, त्याचे कारण आपल्या समाजातील एकूणच लोकसंख्या वाढलेली आहे. आणि या वाढत्या लोकसंख्येच्या सापेक्षतेनेच लेखक-वाचक यांच्या प्रमाणवाढीसंबंधी आपण बोलत असतो.

मराठीतील लेखकांची विद्यमान संख्या खरे म्हणजे कुणीतरी सर्वेक्षण करून निश्चित केली पाहिजे. तीच गोष्ट वाचकांसंबंधी ! यातही पुन्हा स्त्री-पुरुष यांचे तौलनिक प्रमाण आणि विविध वयोगटांतील प्रमाण अशा प्रकारची अधिकृत आकडेवारी उपलब्ध झाल्यास ती महत्त्वाची ठरेल. थोडासा अंदाजच करावयाचा म्हटले, तर लेखक-वाचकांचा वर्ग हा समाजात एक अल्पसंख्य वर्गच असतो. अगदी साडेतीन टक्क्यांचीच ही संस्कृती असते असे जरी म्हणता आले नाही, तरी ती फार कमी लोकांचीच असते असे म्हणता येईल. वाङ्मयीन संस्कृती ही संकल्पना आपण या ठिकाणी काहीशी सोय म्हणूनच वापरत आहोत. एका दृष्टीने ही संकल्पना व्यापक असून समाजाच्या सर्व प्रकारच्या मौखिक आणि लिखित भाषाव्यवहारांना ती लागू पडते. लोक कशा रीतीने शिव्या देतात येथपासून एखादी श्रेष्ठ साहित्यकृती कशी वैशिष्टचपूर्ण आहे, येथपर्यंत वाङ्मयीन संस्कृतीचा आवाका असू शकतो. भाषेतील केवळ शब्दसंपत्तीच नव्हे, तर विचार, भावना, कल्पना यांच्या नेमक्या अभिव्यक्तीचे तिचे सामर्थ्य आणि विषय यांचाही विचार वाङ्मयीन संस्कृतीत मोडतो. संस्कृती हा शब्द येथे समाजाच्या सृजनशील शक्तीचा आणि आविष्कारांचा निदर्शक ठरतो आणि वाङ्मयीन या शब्दाने वाचेचा, वाणीचा म्हणजे आपल्या भाषेचा अवघा प्रांत निर्दिष्ट केला जातो. तथापि प्रस्तुत स्थळी वाङ्मयीन संस्कृतीच्या या व्यापक संकल्पनेशी फारसा संबंध नाही. विविध प्रकारचे लेखन करणारे व विविध प्रकारचे वाचन करणारे या दोन गटांच्या संदर्भापुरता तिचा अर्थ येथे अभिप्रेत आहे.

विविध प्रकारचे लेखन करण्यासाठी अनेक प्रकारच्या संधी अलीकडच्या काळात उपलब्ध झाल्या आहेत. नव्या प्रकारची रूढ होत चाललेली पत्रकारिता ही त्यांपैकी एक मोठी संधी म्हटली पाहिजे. पूर्वी काही मोजक्याच वृत्तपत्रांच्या खास अशा साप्ताहिक पुरवण्या निघत असत. या पुरवण्यांनाच आता स्वतंत्र साप्ताहिकांचे मोठे असे स्वरूप प्राप्त झाले आहे. खुद्द दैनिकांचे स्वरूपही पृष्ठे वाढवून विविध प्रकारच्या लेखनाने आकर्षक करण्यात येऊ लागले आहे. दैनिकांचे मध्य-साप्ताहिक असे वाढीव पृष्ठांचे एक आगळेवेगळे रूपही लोकप्रिय ठरत आहे. विविध प्रकारची पाक्षिके सुरू झालेली आहेत आणि त्यांनी एके काळी अत्यंत

अनुक्रमणिका

लोकप्रिय ठरलेल्या मासिकांना मागे सारले आहे. मासिकांचे सर्वच लेखनक्षेत्र या अल्पनियतकालीन प्रकाशनांनी काबीज केलेले असल्यामुळे मासिकांचा प्रकार आता जवळजवळ मागे हटत चालला आहे. या नव्या पत्रकारितेमुळे विविध प्रकारच्या लेखनाची गरज निर्माण केली आहे आणि ती गरज भागवणारे लेखकही स्वाभाविकपणे पुढे येत आहेत.

आपल्या समाजातील पुस्तकांच्या जगातही काहीसे असेच वातावरण दिसून येते. विविध प्रकारच्या लेखनाची अभिरुची वाचकवर्गात निर्माण करण्याचे काम नवी पत्रकारिता एका बाजूला करीत आहे. याचा परिणाम ग्रंथसृष्टीवरही होत आहे. ग्रंथवाचकही ठराविक कथा-कादंबऱ्यांपेक्षा इतर प्रकारच्या आणि वैविध्यपूर्ण अशा पुस्तकांकडे आकृष्ट होत आहेत. लेखनाची शैली आणि घाट यांपेक्षा विषयांचे वैचित्र्य असणाऱ्या पुस्तकांना मागणी येत आहे. या मागणीनुसार पुरवठा करणारा ग्रंथलेखकही मग पुढे येतो, आणि तसा तो आपल्या समाजातही पुढे येत आहे.

वाढती साक्षरता म्हणा किंवा वाचनासंबंधीचे वाढते आकर्षण म्हणा, यातून आपल्या एकूणच वाङ्मयीन संस्कृतीवर नव्या पत्रकारितेचा फार मोठा प्रभाव पडत आहे कित्येक चांगल्या संपादकांचे वृत्तपत्रीय लेखन ग्रंथरूपाने प्रसिद्ध होत आहे आणि त्याचा वाचकवर्गही मोठा आहे. साप्ताहिके, पाक्षिके यांतून स्तंभलेखन करणारे लेखन संगृहीत होत आहेत. विविध प्रकारचे क्रीडाप्रकार, पाककला, चित्रपटसृष्टी, ज्योतिष, चरित्रे आणि आत्मचरित्रे, इतिहास, वैद्यक, विज्ञाने, तंत्रविद्या यांसारख्या कितीतरी विषयांसंबंधीच्या लेखनाला आणि लेखकांना नव्या पत्रकारितेतून संधी आणि विशिष्ट वळण लाभत आहे. आपल्या वाङ्मयीन संस्कृतीशी याचा निकटचा संबंध आहे; एवढेच नव्हे, तर त्याचा एक दूरगामी परिणाम समाजाच्या वाचनविषयक अभिरुचीवर होणे अपरिहार्य आहे. ताजेपणा आणि समयोचित वेधकता त्याचप्रमाणे आटोपशीरपणा यांसारखे काही विशेष या नव्या पत्रकारिताप्रणीत लेखनात दिसून येत असले, तरी समाजाची संपूर्ण वाचनविषयक अभिरुची या प्रकारच्या लेखनाने घडविली जाणे कितपत हितकारक आहे, हे विचारात घेतले पाहिजे. थोडेसे सोयीने बोलावयाचे, तर माहिती आणि ज्ञान या दोन संकल्पनांतील फरक लक्षात घेतला पाहिजे. एक प्रकारचे वरवरचे सामान्यज्ञान आणि आपल्या जाणिवांची समृद्धी करणारी प्रत्ययकारी ज्ञानात्मकता यांत फरक आहे. वाचनक्षमतेचा पल्ला आणि ग्रहणशक्ती यांच्यात भर टाकणारे लेखन आणि वरवरचे विविधज्ञानसंग्रह करणारे एक तरतरीत वाचनपटुत्व यांत अंतर आहे. नव्या पत्रकारिताप्रणीत लेखनातून वाचनविषयक प्राथमिक कुतुहल वाढत असेल आणि विविध विषयांसंबंधीचे आकर्षण निर्माण होत असेल, तरीदेखील उच्च अशा वाचनविषयक अभिरुचीचा विकास यातून घडेलच, याची खात्री देता येत नाही. वाचकांच्या आकलनशक्तीला वा ग्रहणशक्तीला पैलू पाडण्याचे, तिच्यातील जडतेला आणि साचेबंदपणाला आव्हान देणारे असे काहीतरी लेखन हे समाजापुढे सतत येत राहिले पाहिजे. एवढेच नव्हे, तर या प्रकारच्या लेखनाची भाषा आणि शैली यांचेही योग्य भाग राखले पाहिजेत. नव्या पत्रकारितेत अनेकदा व्यवहारातील आणि बोलभाषेतील ग्राम्यतेला आणि शिवराळपणाला, त्यांतील भाषा-भावनेसकट प्रतिष्ठा दिली जात आहे किंवा काय, अशी शंका येते. भाषा आणि शैली या गोष्टी संस्कृतीच्या निदर्शक असतात आणि संस्कृती ही समाजाने मान्य केलेल्या काही चांगल्या गोष्टींची निदर्शक असते. जे व्यवहारात आहेत किंवा प्रत्यक्षात आहेत किंवा वास्तव आहेत, ते तसे आहे म्हणूनच समाजमान्य आहे आणि म्हणून संस्कृतिनिदर्शक आहे, असा दावा करणे बरोबर ठरणार नाही. वाङ्मयीन संस्कृती ही समाजाला एक चांगली वाचा देणारी, चांगली वाणी देणारी, चांगली भाषा देणारी शक्ती आहे. ग्राम्यता, शिवराळपणा ही समाजाची प्रकृती असेलही आणि असतेच; पण समाजाच्या सांस्कृतिक आकांक्षेत आणि उद्दिष्टात या प्रकारच्या प्रकृतीला स्थान असेल, असे वाटत नाही. नव्या पत्रकारिताप्रणित लेखनात भाषेची आणि शैलीची साधना आणि त्यासाठी करावयाचा अभ्यास या गोष्टी दुर्लक्षित आहेत, असे दिसते. एक प्रकारचा भाषिक भडकपणा त्या लेखनात दिसतो. त्याचप्रमाणे ज्याला पारिभाषिक काटेकोरपणा म्हणता येईल, तोही त्या लेखनात अभावानेच आढळतो. अर्थशास्त्रीय लेखन काय किंवा क्रीडाविषयक लेखन काय, यातून त्या त्या विषयानुरूप अशी जी शब्दकळा आणि शैली असणे आवश्यक असते, ती या लेखनात दिसत नाही. सामान्यपणे सगळयाच प्रकारच्या लेखनाचे भाषिक व्यावहारिकीकरण आणि राजकीयी-

अनुक्रमणिका

करण झाल्याचे दिसून येते. आपल्या भाषेतील पारंपरिक असे म्हणींचे आणि वाक्प्रचारांचे जे संचित आहे, संतांच्या साहित्यांत जो एक अस्सल मराठमोळा वाण आहे, मोरोपंतादी पंडितकवींच्या साहित्यात भाषेची जी प्रौढता आणि प्रगल्भता आहे आणि थोर मराठी निबंधकारांच्या लेखनात भाषाविचारांचा जो प्रभावी मेळ आहे, या सर्वांचा विसर आपल्याला पडलेला आहे. परंपरेच्या या शब्दधनाकडे जसे आपण दुर्लक्ष करीत आहोत, तसेच दुर्लक्ष आधुनिक ज्ञानविज्ञानांच्या परिभाषेकडेही करीत आहोत. एक प्रकारच्या झटपट लेखननिर्मितीत आजचा लेखक अडकून पडला आहे. आणि त्याला योग्य तो भाषाविवेक राखण्यासाठी व त्यासाठी परिश्रमपूर्वक अभ्यास करण्यासाठी उसंत लाभत नाही, असे दिसते. उच्च, सखोल आणि गुंतागुंतीच्या विचारकल्पनांचेच केवळ नव्हे, तर आपल्या मनातील नेमक्या आशयाचे नेमके वाहन म्हणूनही भाषेची साधना ही अत्यंत आवश्यक गोष्ट आहे. उथळ, व्यावहारिक आणि साचेबंद होत जाणाऱ्या शब्दांतून आणि शैलीतून समाजाचे विचार करण्याचे आणि ते व्यक्त करण्याचे सामर्थ्य कधीही वाढणार नाही. शेवटी आपण विचार करतो म्हणजे तरी काय करतो, हे लक्षात घेतले पाहिजे. आपण विचार करतो तेही शब्दांच्याच आधारे! शब्द नसतील तर आपली विचारप्रक्रियाच थांबेल. त्याच त्या मोजक्या, मूठभर, गुळगुळीत शब्दांनी सगळ्याच विषयांचा विचार आपण करत राहिलो, तर आपल्या विचारशक्तीचाच विकास थांबेल. ग्राम्य, अश्लील, करंट्या, दरिद्री, भडक अशा शब्दकळेने केवळ वाचनाभिरुचीच नव्हे, तर आपली विचारक्षमताच दरिद्री होईल. नव्या पत्रकारिताप्रणीत लेखनाचा लेखक, वाचक, वाचनाभिरुची आणि आपली ग्रंथसृष्टी या सर्वांवर परिणाम होत आहे आणि त्या दृष्टीने त्या लेखनातील मर्यादा वेळीच लक्षात घेणे आवश्यक आहे.

आपल्या समाजातील लेखनक्षेत्रात जे खुले आणि विमुक्त असे वातावरण निर्माण झाले आहे, त्याचाही योग्य तो विवेक करणे आवश्यक आहे. एक वेळ अशी होती, की लेखन वगैरे करणे हे खरोखरच ३।। टक्के लोकांचे काम आहे असे बाकी ९६।। टक्के लोकांचे मत होते. लेख लिहिणे, पुस्तक लिहिणे हे विशिष्ट लोकांचेच काम आहे, असे मानण्याकडे समाजाचा कल होता. आपल्या समाजातील जातिव्यवस्थेमध्ये या दृष्टिकोणाची मुळे आढळतात.

तथापि जातिव्यवस्था जसजशी खिळखिळी होत गेली, तसतशी या दृष्टिकोणाची पकडही सैल होत गेली. तसे पाहिले तर लेखननिर्मितीचे कार्य हे आपल्या समाजातील जातिनिरपेक्षतेनेच होत होते. तथापि जुन्या काळात या लेखनस्वातंत्र्याचा उपयोग मुख्यतः धार्मिक-सांप्रदायिक लेखनापुरताच मर्यादित राहिला. लौकिक विषयांची लेखनरूपाने हाताळणी करण्यास गेल्या शतकातच ब्रिटिशांच्या आगमनानंतर सुरुवात झाली. तरीदेखील ज्याला आपण वाङ्मय किंवा साहित्य म्हणू, त्याच्या निर्मितीची प्रवृत्ती किंवा आकांक्षा अल्पसंख्य अशा सुशिक्षित वर्गापुरतीच सीमित राहिली. खरे तर, सृजनशील वाङ्मयीन प्रवृत्तीचा सामाजिक दृष्टीने एखादा ऐतिहासिक आढावा घेणेही उद्बोधक ठरेल. तथापि शिक्षणाचा प्रसार आणि नव्या सामाजिक आकांक्षा यांचा परिणाम म्हणून लेखनप्रवृत्तीचा विकास आणि विस्तार झाला, असे म्हणता येईल. लेखन ही एक प्रकारची शक्ती आहे, अनेक लोकांवर परिणाम घडवून आणण्याची ताकद त्यात आहे आणि कोणत्या प्रकारचे परिणाम घडवून आणावेत यावद्दल आपल्याजवळ निश्चित विचार आहेत, अशी जाणीव अलीकडच्या काळातच निर्माण झाली. मराठीतील दलित साहित्य हे या जाणिवेचे निदर्शक आहे. तथापि या साहित्याची निर्मितीही एका नवोदित सांस्कृतिक वातावरणाचा परिणाम होती आणि हे सांस्कृतिक वातावरण बरेचसे गुंतागुंतीचे होते, हे लक्षात ठेवले पाहिजे. तथापि दलित साहित्याच्या रूपाने लेखनाचे एक नवे विमुक्त वातावरण आपल्या समाजात निर्माण झाले, असे म्हणावे लागेल. या वातावरणाचा मुख्य आधार म्हणजे माझ्याजवळ लिहिण्यासारखे काहीतरी आहे, अशी निर्माण झालेली जाणीव हा आहे. त्यामुळे लेखनक्षेत्राचे तथाकथित सोवळेपण संपुष्टात आले आणि आपल्या वाङ्मयीन संस्कृतीचे साहित्यिक म्हणून जे केंद्र होते, ते काहीसे ढळले. व्यंकटेश माडगूळकरांनी लेखक आणि साहित्यिक अशी विभागणी केलेली आहे. कथा-काव्य-नाटकादी कलात्मक साहित्याला वाहून घेणारा साहित्यिक हा एका दृष्टीने कलावंत असतो. आणि काहीशा स्पष्टपणाने आणि जाणीवपूर्वक आपल्या कलात्मक भूमिकेचे संवर्धन करण्याचा तो प्रयत्न करीत असतो. "लेखक" असे ज्याला आपण सोयीसाठी म्हणू, तो म्हणजे विविध

विषयांवर आपल्या अनुभवांच्या किंवा अभ्यासाच्या आधारे आणि कुठल्यातरी साहित्यबाह्य हेतूने लेखन करणारा असा मानता येईल. साहित्यिक म्हणून किंवा कलावंत म्हणून तो आपल्या भूमिकेचा दावा करीत नाही. आपली कलात्मक करिअर तयार करण्यासाठी-देखील तो धडपडत नाही. अशा प्रकारचा लेखकवर्ग आपल्या समाजात निर्माण झालेला आहे. तो स्फुट लेखनरूपाने किंवा ग्रंथरूपाने निर्मिती करू लागला आहे.

नवे सांस्कृतिक वातावरण आणि नवी पत्रकारिता यांच्यामुळे या लेखकवर्गाला अनुकूल असे क्षेत्रही उपलब्ध झाले आहे. वाङ्मयीन संस्कृती ही द्विकेंद्री बनत आहे, असे मला वाटते. लेखक आणि साहित्यिक-कलावंत ही तिची दोन केंद्रे म्हणावी लागतील. या दोन्ही केंद्रांच्या परिसरात जे जे काही घडत आहे, त्याचा एकमेकांवर परिणामही होत आहे. त्यामुळे वाङ्मयीन संस्कृती ही केवळ साहित्य आणि कला यांच्यापुरतीच आणि यांच्यासाठीच आहे, असे म्हणणे म्हणजे तिचा संकोच करणे ठरेल.

आपल्या लेखनक्षेत्रात आणखी एक गोष्ट प्रभावी ठरत आहे. ही गोष्ट म्हणजे इतर उद्योगधंद्यांप्रमाणेच वृत्तपत्रे, नियतकालिके, पुस्तके यांची निर्मिती हा एक आर्थिक उद्योग ठरत आहे. पत्रकारिता जुनी असो अगर नवी असो, ती अर्थातच आर्थिक नफ्या-तोट्याचा विचार करणारा एक धंदा वा उपक्रम ठरली आहे. ग्रंथनिर्मितीच्या बाबतीतही तसाच आर्थिक दृष्टिकोण प्रभावी ठरत आहे. शैक्षणिक प्रसारामुळे पाठ्यपुस्तके आणि संदर्भग्रंथ यांची मोठी गरजच निर्माण झाली आहे. पुस्तकांची गरज निर्माण करणारे इतरही अनेक विषय आणि क्षेत्रे आहेत आणि ती व्यापारी उपक्रमशीलतेला आवाहन करीत आहेत. पाककलेवरची कितीतरी पुस्तके बाजारात येत आहेत. तेव्हा वृत्तपत्रे, नियतकालिके आणि पुस्तके यांना एका आर्थिक व्यवहाराचा आणि हिशोबीपणाचा नवा संदर्भ प्राप्त झाला आहे. इतर उद्योगधंद्यांच्या निर्मितीत आणि व्यवस्थापनात जी पद्धत वापरली जाते, तिचा अवलंब आपल्या वाङ्मयाच्या क्षेत्रातही केला जात आहे. असे घडणे काहीसे अपरिहार्य आहे हे खरेच ! 'मागणी तसा पुरवठा' या तत्त्वावर इतर उद्योगधंदे चालतात, त्याचप्रमाणे लेखननिर्मितीच्या क्षेत्रातही हेच तत्त्व एका बाजूने स्वीकारले जात आहे. लेखक आणि साहित्यिक यांना या परिस्थितीत आज निर्मिती करावी लागत आहे. मागणी तसा पुरवठा करणे हे खऱ्या साहित्यिकाचे ब्रीद नव्हे हे खरेच. जो केवळ लेखक आहे असे स्वतःला मानतो, त्यालाही ही गोष्ट पटेलच असे नाही. लेखनाच्या औद्योगिकीकरणाची प्रलोभने लहानमोठ्या लेखक आणि साहित्यिकाच्या बाबतींत लहानमोठी असू शकतात आणि शेवटी ही प्रलोभने कशी टाळावयाची ही व्यक्तिगत समस्या ठरते. तशा प्रलोभनांना बळी पडणारे लेखन अगदी सामान्य वाचकाच्याही लक्षात येऊ शकते. त्या लेखनातून जाणवणारे असमाधानही मोठेच असते. वाङ्मयीन संस्कृतीच्या या औद्योगिक प्रलोभनांची दूरगामी अनिष्टता लक्षात घेणे आवश्यक आहे. विशेषतः नवोदित लेखकांच्या आणि साहित्यिकांच्या पिढीला ही प्रलोभने चुकीच्या दिशेने जाण्यास वा विचार करण्यास भाग पाडतील, अशी शक्यता आहे. आपल्या सृजनशील सामर्थ्याची किंमत आर्थिक स्वरूपात करण्याची किंबहुना आपल्या या सामर्थ्याची आर्थिक किंमत वसूल करण्याची प्रवृत्ती बळावत गेली, तर ते योग्य ठरणार नाही. याचा अर्थ आपली निर्मिती ही मोफत वाटावी असा नाही; तर आपल्या लेखनक्षमतेशी आपण प्रामाणिक राहावे आणि या बाबतीत काही तडजोड करू नये असा त्याचा अर्थ आहे.

आपल्या लेखनक्षेत्रातील विशेषतः साहित्य क्षेत्रातील नवे संप्रदाय हीदेखील एक महत्त्वाची वस्तुस्थिती आहे. दलित, ग्रामीण, स्त्रीमुक्ती, ख्रिस्ती, जनवादी यांसारख्या नव्या विचारप्रणाली मांडल्या जात आहेत. साहित्यातील सवतेसुभे असेही त्यांचे वर्णन केले जाते. या विविध संप्रदायांमध्ये सामील होणारे व त्यांच्या बाहेर राहणारे लेखक समाजात आहेत. त्याचप्रमाणे एखाद्या लेखनाचे किंवा पुस्तकाचे वरीलपैकी एखाद्या विशिष्ट संप्रदायाच्या दृष्टीने स्वरूप विशद करणारे समीक्षकही आहेत. हे सगळे काहीसे अपरिहार्य आहे. तथापि या सांप्रदायिक कक्षा आपल्या वाङ्मयीन संस्कृतीच्या दृष्टीने आपणास कुठवर आणि कसे नेतात याचा विचार केला पाहिजे. तात्त्विक वा राजकीय विचारप्रणालींचा दृष्टिकोणही या दृष्टीनेच लेखनाच्या क्षेत्रात कसा व कितपत उद्‌बोधक ठरतो हेही महत्त्वाचे ठरते. साहित्यिक-कलावंत म्हणून ज्यांची स्पष्ट भूमिका आहे, त्यांच्या बाबतीत त्याचप्रमाणे विविध प्रकारचे लेखन करणाऱ्या लेखकांच्या

बाबतीत या नव्या परिस्थितीचा काय परिणाम होतो याचा अंदाज घेणे उपयुक्त ठरेल. मात्र लेखनक्षेत्रातील सवत्यासुभ्यांनी व संप्रदायांनी वाङ्मयीन सृजनशीलतेचा संकोच होण्याची शक्यता आहे. विशेषतः नवोदितांच्या अविष्कारस्वातंत्र्यावर नकळत मर्यादा पडण्याचा संभव आहे. सृजनशीलतेचे सामाजिक बंदीकरण–कंडिशनिंग– होण्याचा धोका आहे. एका बाजूने नवी पत्रकारिता, दुसऱ्या बाजूने लेखनक्षेत्राचे औद्योगिकीकरण आणि तिसऱ्या बाजूने लेखनक्षेत्राचे बराकीकरण होण्याचा जर संभव असेल, तर ही परिस्थिती मोठी चिंताजनक आहे. विशेषतः नवोदित लेखक-साहित्यिकांच्या संदर्भात या त्रिविध स्वरूपाच्या धोक्याची भीती अधिक वाटते. हा धोका आहे, याचा अर्थ त्यात अशा सृजनशील व्यक्तिमत्त्वाच्या प्रभावी जडणघडणीस विकृत करणारी काही प्रलोभने आहेत आणि वाङ्मयीन संस्कृतीचे खरे अधिष्ठान लेखननिर्मिती हेच आहे. ही लेखन-निर्मिती कलात्मक उद्दिष्टाने केली जात असो किंवा कलाबाह्य अशा इतर प्रयोजनांनी केली जात असो; तिचे उद्दिष्ट व कार्य प्रभावी सृजनशील व्यक्तिमत्त्वाची जडणघडण हेच आहे. यासाठी लेखनाची जी भाषिक, वैचारिक किंवा ज्ञान-विज्ञानात्मक साधने आहेत, त्यांचे कसोशीने व उत्तम प्रकारे जतन केले पाहिजे. त्यासाठीही खूप परिश्रमांची व अभ्यासाची तयारी ठेवली पाहिजे. चांगली माहिती, चांगले ज्ञान, चांगली साहित्यकृती यांची निर्मिती करणे आणि समाजाच्या वाचिक किंवा भाषिक आशय-अभिव्यक्तीचा दर्जा वाढविणे, हे वाङ्मयीन संस्कृतीचे अगदी उघड असे उद्दिष्ट आहे. भांडायचे कसे, आपले मतभेद प्रकट करावयाचे कसे, आपला संताप, चीड यांना व्यक्त करावयाचे कसे, यांचा एक चांगला नमुना वाङ्मयीन संस्कृतीच्या संवर्धकांनी समाजापुढे ठेवावयाचा असतो. म्हणजे या प्रकारच्या आविष्कारासाठी एक चांगली भाषा व शैली लोकांसमोर ठेवावयाची असते. शेवटी भाषा हे मानवी संस्कृतीचे व्यवच्छेदक लक्षण आहे आणि भाषा ही अमूर्त नसते. आपल्या भावना, विचार, कल्पना, आपले ज्ञान–विज्ञान यांतूनच भाषा मूर्त झालेली असते, अस्तित्वात आलेली असते. वर एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणे आपण विचार करतो म्हणजे विशिष्ट भाषेद्वारेच तो करतो हे जसे खरे आहे; तसेच आपण भाषाप्रयोग करतो म्हणजेच काही विचार किंवा भावना किंवा माहिती यांचा प्रयोग करतो. म्हणून भाषा ही वाङ्मयीन संस्कृतीचे प्राणभूत तत्त्व आहे.

नव्या पत्रकारितेने आधुनिक ज्ञानविज्ञानाची एक नवी संपन्न परिभाषा आपणास द्यावी; लेखनक्षेत्रातील औद्योगिकीकरणाने आपल्या नव्या नव्या वाङ्मयीन गरजा हेरून त्यांची दर्जेदार रीतीने परिपूर्ती करावी आणि लेखक-साहित्यिकांचा उत्तम प्रकारे योगक्षेम चालवावा आणि नवे संप्रदाय व विचारप्रणाली यांनी जीवनविषयक जाणिवांच्या जटिलतेचे स्पष्टीकरण करून त्यातून एक संश्लेषक जीवनविचार सूचित करावा, अशी अपेक्षा केल्यास ती वावगी ठरू नये. असे न घडले आणि वरील विविध प्रक्रियांतून प्रलोभनांचे फसवे आदर्श निर्माण झाले, तर मात्र आपल्या वाङ्मयीन संस्कृतीचे भवितव्य चिंतनीय ठरेल. विद्यमान काळात चिंतनीय अशा शेकडो गोष्टी समाजापुढे आहेत हे खरेच. आपली वाङ्मयीन संस्कृती हा त्यांपैकीच एक विषय होय, असे मला वाटते.

⊙ ⊙ ⊙

## साभार पोच

* **एकनाथी भागवताचा अभ्यास :** प्रा. डॉ. दामोदर विष्णुपंत कुलकर्णी; काँटिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–३०; १९८७; पृ. ३२२; किं. ५० रुपये.
* **जमिनीतील पाणी शोध व वापर :** रा. पि. शिरकांडे; काँटिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–३०; १९८७; पृ. १४४; किं. ३० रुपये.
* **शैवदर्शन :** प्रा. डॉ. ग. वा. तगारे; प्रकाशक मराठी तत्त्वज्ञान-महाकोश मंडळ, पुणे आणि प्राचार्य दांडेकर वाङ्मय प्रकाशन मंडळ, पुणे; द्वारा : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ३०; १९८७; पृ. २४९; किं. ५० रुपये.
* **विद्रोही कविता :** केशव मेश्राम; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–३०; द्वितीयावृत्ती; १९८७; पृ. १८६; किं. १५ रुपये.

# शास्त्री-पंडितांच्या परिवारात तर्कतीर्थ*

— शास्त्रीजी, तुम्ही भारतीय शास्त्रांचे अध्ययन–अध्यापन केले त्याविषयी काही प्रश्न विचारायचे आहेत. प्रेरणा तुम्हाला प्रथम कशी झाली ?

— माझ्या वडिलांची माझ्याबद्दल अशी महत्त्वाकांक्षा होती की मी संस्कृत शास्त्रे शिकावीत आणि पुण्यासारख्या शहरी वसंत व्याख्यानमालेत भाषणे करता येतील ह्या दर्जाचे ज्ञान मी संपादन करावे, अशा व्यासपीठावरून प्रभावी भाषणे करता येतील अशी शक्ती मी कमवावी. ही प्रेरणा घेऊन मी प्राज्ञपाठशाळेत दाखल झालो. ही माझ्या दृष्टीने सुदैवाची गोष्ट ठरली. कारण प्राज्ञपाठशाळेचे वातावरण ह्या दोन्ही गोष्टींना अतिशय अनुकूल होते. पाठशाळेतील काही मंडळी स्वातंत्र्यवीर सावरकरांची अनुयायी होती. सकस उच्च दर्जाचे शास्त्राध्यायन करून व्यवहारात पडावे ह्यापेक्षा स्वातंत्र्याच्या लढ्यात सामील व्हावे असा त्यांचा ध्येयवाद होता. ह्या ध्येयवादाचा परिणाम माझ्यावर होत होताच. पण वाईत आल्यावर मी लवकरच शास्त्राचे अध्ययन करू लागलो. माझी साहित्याची व्युत्पत्ती वर्षदीडवर्षात पुरी झाली. नंतर शास्त्रांकडे वळल्यावर माझ्या गुरूंनी – नारायणशास्त्री मराठे, केवलानंद सरस्वती – माझी दृष्टी व्याकरणापेक्षा न्यायशास्त्रावर केंद्रित केली. महाराष्ट्रात त्या वेळी व्याकरणशास्त्राचा प्रभाव खूप होता. पुण्याला वासुदेवशास्त्री अभ्यंकर गाजत होते. श्रीधरशास्त्री पाठक डेक्कन कॉलेजात अध्यापक होते. तेही वैयाकरण होते. आमच्या गुरूंचे गुरू धोंडशास्त्री डेंगवेकर हे मात्र नव्यन्यायाचे होते. ते नुकतेच निवर्तले होते.

प्रज्ञानंद हे माझ्या गुरूंचे अद्वैताचे गुरू, आध्यात्मिक गुरू होते. त्यांनी तारुण्यातच संन्यास घेतला होता. त्यांच्या परंपरेला साक्षात्कारी परंपरा असे म्हणता येईल. ही माझ्या गुरूंचीही परंपरा होती. एकदा ब्रह्मसूत्रभाष्याचा पाठ चालू असताना एका मुद्द्यावर ते आले असताना आपल्याला अनुभव आला असे त्यांना वाटले. अशी साक्षात अनुभवाची परंपराही पाठशाळेत होती.

प्राज्ञपाठशाळेत त्या वेळी तीन परंपरा प्रतिबिंबित झाल्या होत्या. स्वातंत्र्याच्या चळवळीकडे ओढा असलेली काही मंडळी होती. त्यांच्याविषयी पाठशाळेचे प्रमुख असलेल्या आमच्या गुरूंना आदर होता. परंपरागत दर्शनशास्त्रे, व्याकरण यांच्यात पारंगतता मिळवावी अशी एक प्रवृत्ती होती तर काही मंडळी आगरकर, स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या पंथाची होती. ते जे वैचारिक मंथन करीत होते त्याचाही माझ्यावर प्रभाव पडत होता.

— एक प्रश्न विचारतो. डेंगवेकर शास्त्र्यांनी स्वत:ची शिष्यपरंपरा तयार केली नाही ?

– नाही. आमच्या गुरूंना त्यांनी नव्यन्याय शिकविला आणि इतरही अनेकजण त्यांच्याजवळ शिकून गेले. पण ते प्रभावीपणे पुढे आले नाहीत.

— तुमचे इथे जे न्यायाचे शिक्षण झाले ते कोणत्या पातळीपर्यंत झाले ?

— ते वस्तुत: वरच्या पातळीपर्यंत गेले. पण न्यायाच्या अध्ययनाला जे अनुकूल वातावरण लागते ते येथे नव्हते. अनेक नव्यन्यायाचे विद्यार्थी आणि अध्यापक एकत्र असावे लागतात. ते येथे नव्हते. तेव्हा माझ्या गुरूंनी मला सांगितले की तू आता वाराणसीला जा आणि तेथे नव्यन्यायाचे अध्ययन कर. १९१४ साली मी येथे आलो, चार वर्षे येथे अध्ययन केले आणि मग वाराणसीला गेलो. इथे जे संस्कार होते ते संमिश्र होते. वाराणसीमध्ये जे शास्त्री-पंडित होते ते परंपरेचे कट्टर समर्थक होते आणि गाढे विद्वान होते. अशी

---

* तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांची मे. पुं. रेगे यांनी घेतलेली मुलाखत.



अनुक्रमणिका

गाढी विद्वत्ता, एखाद्या शास्त्राची उत्कृष्ट तयारी, त्या वेळी महाराष्ट्रात नव्हती असे नाही. पुणे आणि काही अंशी कोल्हापूर आणि नाशिक येथे व्याकरणाचे अध्ययन–अध्यापन चांगले चालले होते. परंतु दार्शनिक आणि इतर विद्यांमधील सर्वांगीण पारंगतता मला वाराणसीमध्ये दिसली. उत्तम नैयायिक, उत्तम वैयाकरण, वरच्या दर्ज्याचे धर्मशास्त्रज्ञ, वेदान्ती, वेदाध्यायी मोठ्या संख्येने मला तेथे आढळले. प्राचीन विद्यांचे अतिशय उत्कृष्ट अध्ययन केंद्र असे वाराणसीचे रूप मला दिसले. त्यामुळे आपल्याला जवळ जवळ काहीच येत नाही, अशा प्रकारची भावना माझ्या मनात निर्माण झाली.

एक विचारतो, शास्त्रीजी. व्याकरणाप्रमाणे पूर्वमीमांसेचे अध्ययन महाराष्ट्रात होत होते की नाही ?
स्वामी (केवलानन्द सरस्वती) करीत होते. पण एकंदरीत महाराष्ट्रात पूर्वमीमांसेचे फारसे अध्ययन–अध्यापन होत नव्हते. मात्र पूर्वमीमांसेच्या परीक्षा घेण्यात येत असत. वेदशास्त्रोत्तेजक सभा ह्या परीक्षा घेत असे. प्राचीन भारतीय शास्त्रांचे परस्परसंबंध असे असत की, एखाद्याची एखाद्या शास्त्रात चांगली तयारी असली की त्याला इतर शास्त्रांचीही चांगली माहिती असे. तेव्हा पूर्वमीमांसेच्या परीक्षा घेता येतील अशी परिस्थिती येथे होती. वेदशास्त्रोत्तेजक सभा ही त्या वेळी भारतीय विद्यांत परीक्षा घेणारी उत्तम संस्था होती. परीक्षा घेण्यासाठी परप्रांतांतले पंडितही बोलावण्यात येत असत आणि सर्व शास्त्रांच्या परीक्षा घेण्यात येत असत.

व्याकरणाच्या अध्ययन–अध्यापनाची परंपरा महाराष्ट्रात होती असे तुम्ही सांगितले. इतर प्रांतांतल्या पंडितांनीही मला ते सांगितले आहे. व्याकरणशास्त्रात जो दार्शनिक भाग आहे त्याचेही अध्ययन होत असे का ?
म्हणजे स्फोटवाद इत्यादी ? हो, त्याचेही अध्ययन होत असे. तसेच ज्याला 'शाब्दबोध' म्हणतात त्याचीही व्यवस्थित चर्चा होत असे. नागोजी भट्टांचा शाब्दबोधाविषयीचा विचार, कोंडभट्टांनी नव्य-न्यायाच्या परिभाषेत मांडलेला ह्याच विषयावरील विचार ह्यांचे चांगले अध्ययन येथे होत असे.

आता वाराणसीला तुम्ही गेल्यावर काय झाले तिकडे वळू या.
मी मघाशी म्हटल्याप्रमाणे मला तेथे दिग्गजांसारखे पंडित दिसले. मी नव्यन्यायाचे पुढचे अध्ययन करण्यासाठी राजेश्वरशास्त्री द्रवीड यांच्याकडे गेलो. ते नुकतेच न्यायाचार्य झाले होते. दुसरे एक भंडारीशास्त्री म्हणून होते. तेही न्यायाचार्य होते. मी दोघांकडे अध्ययनासाठी जाऊ लागलो. पण त्यांच्या अध्यापनात, ज्याला सुबोधता म्हणतात, ती नव्हती. मग त्यांचे गुरू वामाचरण भट्टाचार्य होते त्यांच्याकडे मी जाऊ लागलो.

पण प्राज्ञपाठशाळेत जी शिस्त होती ती वाराणसीच्या पाठशाळांत मला आढळली नाही. प्राज्ञपाठशाळेत वेळापत्रक असे. सकाळी ८ ते ९ न्यायाचा पाठ, ९ ते १० मीमांसेचा पाठ, दुपारी २ ते ३ धर्मशास्त्राचा पाठ, इ. अशी शिस्त ह्या खाजगी पाठशाळांत नव्हती. खाजगी पाठशाळेचे स्वरूप म्हणजे एक गुरू आणि त्याच्याकडे शिकणारे शिष्य असत; गुरू बहुधा अत्यंत पारंगत असत. शिष्य आपापले ग्रंथ घेऊन त्यांच्याकडे जात. एका खोलीत पाठ चालत. गुरू आयत्या वेळी सांगत, आज सकाळी न्यायाचा पाठ होईल; दुपारी मीमांसेचा इ. कोणाचा कधी पाठ होईल याचा काही नियम नसे. कार्यक्रमाची शिस्त ह्या पाठशाळांत नसे. ह्यामुळे प्राज्ञपाठशाळेत जी शिस्तबद्ध व्यवस्था होती तिचे महत्त्व वाराणसीला गेल्यावर माझ्या मनावर ठसले.

वामाचरण भट्टाचार्यांकडे तुम्ही कोणते ग्रंथ वाचले ?
गदाधरभट्टाच्या तत्त्वचिंतामणीवरील दिधितीमधील पञ्चलक्षणी, चतुर्दशलक्षणी आणि सिद्धान्तलक्षण अशी व्याप्तीच्या लक्षणावरील तीन प्रकरणे मी त्यांच्यापाशी शिकलो. त्यांच्याद्वारा नव्यन्यायाच्या पद्धतीने परिष्कार कसा करावा हे मी चांगल्या प्रकारे उमगलो. अर्थात मला इतर दर्शनांविषयीही

जिज्ञासा होती. उदा., मी पूर्वमीमांसेचे स्वतः वाचन करीत असे. म. म. पंत म्हणून तेव्हाचे एक प्रसिद्ध विद्वान होते. एक परिणतप्रज्ञ पंडित म्हणून काशीमध्ये त्यांना मोठा मान होता. त्यांच्याकडे मी कित्येक वेळा प्रश्न घेऊन जात असे. काशीची प्रथा अशी असे की, ह्या पंडितांकडे आपण कधीही जावे, त्यांचे पाठ आटोपले की ते चर्चा करायला मोकळे असत. ते अगदी प्रसन्नपणे चर्चा करीत असत. पंतजी पूर्वमीमांसक, वेदान्ती आणि वैयाकरणही होते. त्यांच्याकडे जाऊ लागल्यावर मी त्यांना जो पहिला प्रश्न केला तो असा होता : आपण जे वेदप्रामाण्य स्वीकारतो, ते केवळ श्रद्धेने स्वीकारतो. ते सिद्ध करता येत नाही. कारण 'औत्पत्तिकस्तु शब्दस्य अर्थेन संबंधः, तस्य ज्ञानम् उपदेशः, तत्प्रमाणं बादरायणस्य अनपेक्षत्वात्' हे जे जैमिनिसूत्र आहे ह्यावरून वेद हे अपौरुषेय आहेत हे सिद्ध होत नाही. ते गृहीत धरलेले आहे. सूत्राचे शब्द जर पाहिले तर 'अर्थाचा आणि शब्दाचा संबंध औत्पत्तिक आहे, म्हणजे स्वाभाविक आहे, शब्द येतो तो अर्थ घेऊनच येतो, म्हणजे त्याच्याजवळ अर्थ असतोच, त्याला अर्थ **दिलेला** नसतो, तो त्याच्याशी स्वाभाविकपणे निगडितच असतो' एवढेच त्यात सांगितलेले आहे. पण शब्द, म्हणजे वेदवाक्ये अपौरुषेय आहेत असे काही ह्या सूत्रात सांगितलेले नाही आणि ती अपौरुषेय आहेत असे का मानावे, ह्याचे काही प्रमाण मीमांसासूत्रात नाही. ही केवळ श्रद्धा आहे. कुराणावर जशी मुसलमानांची श्रद्धा आहे किंवा बायबलवर जशी ख्रिश्चनांची श्रद्धा आहे तशीच आपली वेदांवर आहे असे आपण का मानू नये ? नैयायिक हे वेद ईश्वरप्रणीत आहेत असे मानतात. कुराणातील शब्द किंवा बायबलमधील शब्द प्रत्यक्षपणे किंवा अप्रत्यक्षपणे ईश्वराचे असे मुसलमान किंवा ख्रिस्ती जसे मानतात त्याच स्वरूपाचे नैयायिकांचेही मत आहे असे मानणे योग्य होईल. अशा तऱ्हेची चर्चा मी त्यांच्याशी करीत असे.

त्यांचे उत्तर काय होते ?

त्यांचे उत्तर असे होते : वेद अपौरुषेय आहेत म्हणजे काय ? हे कसे सिद्ध होते ? तर असे अनुमान मांडण्यात येते : 'यद् यद् वेदाध्ययनं तद् तद् गुर्वध्ययनपूर्वकम्।' वेदाध्ययनाचे कोणतेही उदाहरण घेतले तर ते करणारा जो (शिष्य) असतो तो आपल्यापूर्वी वेदाध्यायन केलेल्या गुरूपासून वेद शिकत असतो. म्हणजे जो, जो गुरू असतो त्याला, त्याला त्याचा गुरू असतो. तेव्हा वेद हे अनादिसिद्ध आहेत. त्यांना प्रारंभ नाही.

पण तुम्ही ज्या जैमिनीसूत्राचा उल्लेख केला त्याचा आणि ह्या युक्तिवादाचा काही संबंध नाही हे ते मान्य करीत होते का ?

होय. हे ते मान्य करीत. पण हा त्यांचा युक्तिवाद आहे. सृष्टी अनादी आहे असे मानले तर तो टिकतो; नाही तर नैयायिकांचा ईश्वर मानावा लागेल. आता सृष्टीची उत्पत्ती व प्रलय हे आपल्या पुराणांनी आणि अनेक दर्शनांनी मानले आहेत. उदा., 'जन्माद्यस्य यतः' (ज्याच्यापासून ह्याचा– ह्या दृश्य विश्वाचा– जन्म इत्यादी होतात) हे बादरायणसूत्र घ्या. किंवा उपनिषदांमध्ये 'ही पंचमहाभूते ज्याच्यापासून उत्पन्न होतात, ज्याच्यात स्थिरावतात आणि ज्याच्यात विलीन होतात ते ब्रह्म होय' असे ब्रह्माचे व्याख्यान केले आहे किंवा लक्षण सांगितले आहे. ह्यामुळे पूर्वमीमांसक जरी सृष्टीची उत्पत्ती मानीत नसले तरी सृष्टीला उत्पत्ती, स्थिती आणि लय आहे असे मत होतेच. पूर्वमीमांसक सृष्टीची उत्पत्ती अमान्य करतात कारण त्यांना ती मान्य करणे अडचणीचे आहे. मग (वेदप्रामाण्यासाठी) ईश्वर मानावा लागतो. पण जसे निरीश्वर पूर्वमीमांसक आहेत तसे काही सेश्वर पूर्वमीमांसकही होते. जसे निरीश्वर आणि सेश्वर सांख्य आहेत, म्हणजे ईश्वर मानणारे आणि ईश्वर न मानणारे सांख्य आहेत तसेच सेश्वर आणि निरीश्वर पूर्वमीमांसक असू शकतात. आपण काहीही मानले तरी वेदांचे शब्दप्रामाण्य का मानायचे हा प्रश्न शिल्लक राहतोच असा युक्तिवाद मी करीत होतो.

त्यांचे उत्तर असे होते की तर्काने हा विषय सिद्ध होणार नाही. हा श्रद्धेचाच विषय आहे. श्रद्धेनेच आपण संध्यावंदनादी करतो, विवाहादी संस्कार करतो, श्रद्धेनेच आपण खरे बोलतो, खोटे

बोलत नाही, श्रद्धेनेच अहिंसादी व्रतांचे आचरण करतो. तेव्हा श्रद्धा आवश्यक आहे आणि श्रद्धा ही आपल्या मनात असतेच असे पंतजी मला उत्तर देत असत.

— तुम्ही वामाचरण भट्टाचार्यांकडे किती वर्षे अध्ययन केले ?

— एक वर्ष. मला नव्यन्यायाची व्युत्पत्ती जमल्यानंतर मी स्वतंत्रपणे अध्ययन करू लागलो. कार वाराणसीच्या पाठशाळांतील जी अव्यवस्था होती तिच्याशी जुळवून घेणे मला कठीण गेले. 'तर्कतीर्थ ह्या परीक्षेसाठी नव्यन्यायाचे काही महत्त्वाचे ग्रंथ होते. त्यांचे अध्ययन मी केले व परीक्षा दिली.

— नव्यन्यायाचे कोणते ग्रंथ 'तर्कतीर्थ' ह्या परीक्षेसाठी होते ?

— जागदीशी होती; पञ्चवाद आणि उत्तरवाद हे अनुमानखण्डातील; प्राचीन न्यायातील; फक्त न्यायसूत्रे आणि त्यांच्यावरील विश्वनाथ पञ्चाननाची वृत्ती एवढेच ग्रंथ होते. ह्यामुळे ह्या परीक्षेमुळे माझी नव्यन्यायाची व्युत्पत्ती तयार झाली.

मी तेथून वाईला लवकर परतलो. मी १८ साली वाईहून निघालो आणि २२ साली परीक्षा देऊन वाईला परतलो. आणि मग परत मी वाराणसीला गेलो नाही. पण तेवढ्या अवधीत तेथील विद्वानांचे जे जग होते त्याच्याशी माझा चांगला परिचय झाला होता. नित्य होणाऱ्या चर्चांमुळे माझ्या चांगल्या ओळखीपाळखी झाल्या होत्या.

धर्मशास्त्राच्या बाबतीतही नेहमी अशी चर्चा होत असे. उदा., ऐतिहासिक दृष्टिकोण आणि समन्वयवादी दृष्टिकोण ह्या बाबतीत त्यांचे-माझे वाद व्हायचे.

— तुम्ही विद्यार्थी म्हणून काशीला असताना हे वाद होत असत का ?

— होय ! कारण मी धर्मशास्त्र वाचीत असे. आणि ते वाचताना मला धर्मशास्त्राच्या आदेशांमध्ये फरक होत गेलेला दिसत असे. उदा., कन्यांच्या विवाहाचे वय हा विषय घेतला तर काही ठिकाणी प्रौढ विवाह सांगितलेले आहेत व काही ठिकाणी बालविवाह सांगितलेले आहेत असे दिसते. तसेच काही ठिकाणी ब्राह्मणांना चारी वर्णांच्या स्त्रिया सांगितल्या आहेत तर काही ठिकाणी इतर वर्णांच्या स्त्रिया निषिद्ध ठरविल्या आहेत. पण अशी ठिकाणे थोडी आहेत. असाही भेद करण्यात आलेला दिसतो की जरी चारी वर्णांच्या स्त्रिया ब्राह्मणांना संमत असल्या तरी शूद्र स्त्री ही भोगार्थ असते, धर्मार्थ नसते असे सांगितले आहे. हा पुढे आलेला निबंध दिसतो. सुरुवातीला तो नव्हता हे पुराणकथांवरूनही दिसून येते.

— पण धर्मशास्त्राप्रमाणे असे नाही का, कीं एका पत्नीला पुत्र झाल्यानंतर इतर स्त्रियांशी जर एखाद्या पुरुषाने विवाह केला तर त्या भोगार्थंच असणार-- मग त्या ब्राह्मण असोत वा शूद्र असोत.

— बरोबर आहे. पहिला पुत्र हाच धर्मपुत्र असतो. पण भेद असा आहे की, ज्या त्रैवर्णिक भार्या असत त्या धर्मकार्यामध्ये सहभागी होऊ शकत असत; शूद्र भार्यांना हा अधिकार नव्हता.

— हे तुमचे जे वादविवाद होत ते इतर विद्यार्थ्यांशी होत की पंडितांशी होत ?

— दोघांशी. सहाध्यायांशी आणि पंडितांशी. आणि त्यांच्यामुळे हे दिसून येत असे की, ऐतिहासिक दृष्टीने धर्मशास्त्रातील वचनांची जशी संगती लावता येत असे तशी समन्वयवादी दृष्टीने लावता येत नसे. समन्वयवादी दृष्टीने व्यवस्था लावण्यासाठी युगभेदाचा आश्रय घ्यावा लागत असे. म्हणजे जी परस्परविरुद्ध वचने होती ती वेगवेगळ्या युगांसाठी होती असे मानावे लागे. उदा., अमूक वचने अन्ययुगांसाठी होती, ती कलियुगासाठी नाहीत अशी भूमिका घ्यावी लागे.

— त्या वेळी वाराणसीला पद्धतशीर रीतीने शास्त्रार्थ होत असत का ?

— हो. पद्धतशीरपणे सतत शास्त्रार्थ होत असत. ते दोन तऱ्हांनी. एक, जेष्ठ महिन्यामध्ये गंगेचा नऊ दिवस उत्सव होत असे व त्यात दरदिवशी, म्हणजे नऊ दिवस शास्त्रार्थ चालत असे. पूर्वोत्तरपक्ष होत असत

अनुक्रमणिका

आणि मध्यस्थ असे. ह्या शास्त्रार्थांमध्ये मुख्यत: न्याय आणि व्याकरण ह्यांतील विषय असत. क्वचित वेदान्तावरही शास्त्रार्थ होत असे. पण विशेष नाही.

– एक प्रश्न असा. हे शास्त्रार्थ म्हणजे लुटुपुटीची वाग्युद्धे होती असे म्हणता येईल. कारण एखादा मुद्दा सिद्ध होई तो प्रमाण ग्रंथांतील वचनांच्या आधारे सिद्ध होई. पण एखादा नवीन सिद्धान्त ह्या शास्त्रार्थांतून सिद्ध झाला असे कधी होत असे का ?

— असे कधी होत नसे. परंपरागत पद्धतीनेच सर्व प्रश्नांची उत्तरे मिळत असत.

— पद्धती परंपरागतच राहणार हे मी मान्य करतो. तसेच जो मुद्दा मान्य होईल तो रघुनाथ, गदाधर, जगदीश इ. अधिकारी पंडितांच्या वचनांच्या आधारेच सिद्ध होणार. पण असे कधी होत असे का, की अशा वचनांच्या अर्थाचे तोपर्यंत जे निरूपण करण्यात येत असे, तोपर्यंत सर्वमान्य असे जे निरूपण असे, त्याच्याहून वेगळे निरूपण स्वीकारार्ह आहे असे एखाद्या शास्त्रार्थापासून निष्पन्न झाले ?

— अशा तऱ्हेने शास्त्रार्थ होत असत. उदा., गौरव-लाघव विचार हा न्याय, मीमांसा आणि व्याकरण ह्या तिन्ही शास्त्रांमध्ये चालत असतो. एखादे मत जर अनुभवाने बाधित होत नसेल तर गौरव-लाघव विचाराच्या निकषावर त्याची परीक्षा होत असे. उदा., 'निषादस्थपतिं याजयेत्' हे वचन घ्या. निषाद असलेला जो स्थपती, म्हणजे गवंडी, त्याच्याकडून यज्ञ करवावा. हे श्रुतिवाक्य आहे. परंतु शूद्र हा द्विज नाही. तो एकजाति आहे. त्याला उपनयनाचा अधिकार नाही. म्हणून त्याला वेदाध्ययन नाही. म्हणून त्याला यज्ञाचा अधिकार नाही. आता 'निषादस्थपति' ह्याचा अर्थ निषादांचा स्थपती असा घेतला तर हा स्थपती त्रैवर्णिक असू शकेल. पण निषाद असलेला स्थपती असा त्याचा अर्थ घेतला तर तो अर्थात शूद्र असेल. तर इथे 'निषादस्थपति' हा समास कर्मधारय समजायचा– निषाद असलेला स्थपति अशा अर्थाने घ्यायचा– की षष्ठी तत्पुरुष म्हणून घ्यायचा– निषादांचा स्थपती अशा अर्थाने घ्यायचा– असा प्रश्न आहे. आता तो कर्मधारय म्हणून घेणे हे सरळ आहे. हा सरळ शब्दार्थ आहे. कारण त्याच्यात लाघव आहे. षष्ठी तत्पुरुष म्हणून घेण्यात गौरव आहे. कारण तेथे लक्षणा येते. 'निषादस्थपति' याचा अर्थ 'निषादीय स्थपति' असा घेतला जात आहे म्हणून येथे लक्षणा आहे. तेव्हा निषाद असलेला स्थपती असा त्याचा अर्थ घेणे लाघवाला धरून आहे. तो सरळ शब्दार्थ आहे. पण हा सरळ अर्थ घेतला तर त्याबरोबर अनेक गोष्टीही येतात. ह्या स्थपतीने यज्ञ करायचा तर त्याने वेदाध्ययन केले पाहिजे, म्हणजे त्याचे उपनयन झाले असले पाहिजे. आता शूद्राला वेदाध्ययनाचा अधिकार नाही असा सामान्य नियम आहे. ह्या वाक्यामुळे ह्या नियमाला अपवाद करावा लागेल. म्हणजे सर्वसाधारणपणे शूद्रांना वेदाध्ययनाचा अधिकार नसला तरी ह्या विशिष्ट शूद्रांना वेदाध्ययनाचा अधिकार आहे असे मानावे लागेल. असा अपवाद करावा लागेल. म्हणजे 'निषादस्थपति' हा कर्मधारय समास मानला तर काही सामान्य नियमांना अपवाद आहे असे मानावे लागेल. म्हणजे गौरव आला. पण हा 'फलमुखगौरव' आहे. लाघवाला अनुसरून अर्थ लावला असता पुढे येणारा हा गौरव आहे. म्हणून तो स्वीकारार्ह आहे.

— शास्त्रीजी, तुम्ही म्हणाला की त्या वेळी दोन प्रकारचे शास्त्रार्थ व्हायचे. एक म्हणजे ज्येष्ठ महिन्यात गंगेच्या उत्सवात.

— होय. त्या वेळी जोरदार शास्त्रार्थ व्हायचे. पाणिनीच्या एका सूत्रावर नऊ दिवस शास्त्रार्थ होत असे. इतके पांडित्य चालायचे, परिष्कार व्हायचा.

— जो मध्यस्थ असे त्याची भूमिका किंवा कार्य काय असे ?

— त्याची भूमिका अशी की जर विषयांतर होऊ लागले तर तो सांगायचा हा प्रकृत विषय नव्हे. अगोदर केलेल्या विधानाशी विसंगत असे विधान जर कुणी केले तर ही विसंगती तो दाखवून देत असे. कोण जिंकला हेही तो जाहीर करीत असे.

— तुमच्या प्रत्येक वादाला किंवा शास्त्रार्थाला समयबंध आवश्यक असे हे खरे ना ?

होय. पण समयबंध गृहीत असे. तो सांगायची जरुरी नसे.

समयबंधामध्ये काय, काय अंतर्भूत असे ?

एक तर त्या शास्त्राची जी प्रामाण्यपद्धती असे ती मान्य करण्यात येत असे. उदा., बौद्ध पूर्वपक्ष असेल तर त्याचे खंडन करताना श्रुतिवाक्याचा आधार घ्यायचा नाही. कारण बौद्धांना श्रुतिप्रामाण्य मान्य नाही. जैनांनाही मान्य नाही. तेव्हा उभयसंमत अशी जी प्रमाणपद्धती असेल ती प्रथम निर्णित करावी लागे. हा समयबंधाचा एक भाग. दुसरा, ज्या विषयावर चर्चा व्हायची तो विषय स्पष्ट असावा लागे. उदा., ऋतु-प्राप्तीच्या पूर्वी कन्येचा विवाह हाच शास्त्रशुद्ध विवाह होय हा जर पक्ष असेल तर तो स्पष्टपणे मांडला पाहिजे. विवाहाच्या वेळी कन्येचे वय काय असावे ह्याची चर्चा करीत असताना नेमकी कशाची चर्चा करायची आहे ह्याची स्पष्ट प्रतिज्ञा करावी लागत असे.

दुसऱ्या प्रकारचे जे शास्त्रार्थ होते त्याचे स्वरूप असे होते : काशीमध्ये मी जाण्याच्या पूर्वी मोठमोठे शास्त्रार्थ झाले होते. उदा., स्वामी दयानंदांनी असे शास्त्रार्थ घडवून आणले होते. ते मोठे वैयाकरण होते. बाळशास्त्री रानडे हे परंपरेचे समर्थक, ते धर्मसुधारक होते. स्वामी दयानंद आणि बाळशास्त्री रानडे यांचे मोठे शास्त्रार्थ झाले. ते मोठ्या सार्वजनिक सभांमध्ये होत असत. जशा टुर्नामेन्ट्स असतात तसे ह्या शास्त्रार्थाचे स्वरूप होते. धर्मसुधारक आणि सनातनी यांच्यामधील असे शास्त्रार्थ माझ्या देखतही वाराणसीमध्ये झाले. आर्यसमाजाला स्मृती आणि पुराणे ह्यांचे प्रामाण्य मान्य नव्हते. त्यांना फक्त वेदच प्रमाण आणि वेदांतील फक्त मंत्रभाग प्रमाण होता; ब्राह्मणे प्रमाण नव्हती.

तुम्ही ज्या तीन मोठ्या पंडितांचा उल्लेख केला ते म्हणजे राजेश्वरशास्त्री द्रवीड, पंतजी आणि वामाचरण भट्टाचार्य. ह्यांशिवाय कोणते उल्लेखनीय पंडित तुमच्या स्मरणात आहेत ?

अंबादासशास्त्री म्हणून एक होते. ते जैनन्यायही शिकवीत. ते राजेश्वरशास्त्री इ. पंडितांसारखेच ब्राह्मण पंडित होते. पण जैन न्याय शिकण्यासाठी अनेक जैन विद्यार्थी त्यांच्याकडे येत असत. त्याचप्रमाणे पञ्चानन तर्करत्न भट्टाचार्य हे मोठे नैयायिक होते.

मी असे ऐकले की त्या वेळी तेथे मैथिली नैयायिक व बंगाली नैयायिक यांच्यात स्पर्धा असे.

होय. बालकृष्ण मिश्र हे मोठे नैयायिक त्या वेळी होते. तसेच लक्ष्मीनाथ झा हेही मोठे नैयायिक होते. तीस-पस्तीस तरी प्राचीन पंडित त्या वेळेस काशीमध्ये वाखाणले जात.

राजेश्वरशास्त्री द्रविड यांचे ह्या पंडितांत एक विशिष्ट स्थान होते, नाही का ?

राजेश्वरशास्त्री हे उत्कृष्ट वादपटू होते. सभेत बसल्यानंतर इतरांना अडविण्यात ते वाकबगार होते. त्यांचे नव्यन्यायाचे अध्ययन अत्यंत सखोल होते अशी त्यांची ख्याती होती. ते किती सखोल आहे ह्याची कल्पना मला यावी ह्या स्वरूपाची त्यांची-माझी चर्चा त्या वेळी झाली नाही. पुढेही कधी झाली नाही.

वाराणसीहून तुम्ही वाईला परतल्यानंतर ह्या प्रकारच्या पंडिती वातावरणातून तुम्ही मनाने बाहेर पडला असे म्हणणे बरोबर होईल का ?

नाही. मी त्या वातावरणात बरीच वर्षे राहिलो. कारण त्या प्रकारचे वातावरण महाराष्ट्रतही होते. धर्मसुधारणा झाली पाहिजे असे म्हणणारे पंडित आणि परंपरेला चिकटून राहणारे पंडित हा भेद महा-राष्ट्रातही आढळून येत होता.

धर्मसुधारणेसाठी प्राज्ञपाठशाळेने केलेले कार्य मोठेच आहे यात शंका नाही. पण नव्यन्याय, मीमांसा यांत रमलेले पंडित महाराष्ट्रात होते का ?

मी मघा म्हटल्याप्रमाणे व्याकरणात रमलेले आणि पारंगत असे वासुदेवशास्त्री अभ्यंकर होते. वस्तुतः सर्व शास्त्रांचा त्यांचा व्यासंग होता आणि व्याकरण हा त्यांचा मुख्य विषय होता.

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळेत परतल्यावर तुम्ही अध्यापन कसले केले ?

तिन्ही विषयांचे केले. मीमांसेमध्ये 'आपदेवी' किंवा 'मीमांसान्यायप्रकाश' म्हणून ग्रंथ आहे. तो मी दोनदा शिकविला. ह्या ग्रंथात पूर्वमीमांसेच्या सिद्धांतांची व्यवस्थित, परिष्कारपूर्वक अशी मांडणी केली आहे. त्याचप्रमाणे नव्यन्याय आणि वेदान्त हे विषयही मी शिकवीत असे. तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोगजे हे माझे विद्यार्थी. पांडुरंगशास्त्री गोस्वामी हेही नव्यन्यायाचे माझे विद्यार्थी. त्यांनी शंकराचार्यांच्या स्तोत्रांचे भाषांतर केले आहे.

प्राज्ञपाठशाळेच्या तीन प्रेरणा तुम्ही सांगितल्या. प्राचीन शास्त्रांचे अध्ययन-अध्यापन जागृत ठेवावे अशी त्यांतील जी प्रेरणा होती तिचे महत्त्व हळूहळू कमी झालेले दिसते.

शास्त्रांच्या अध्ययनासाठी विद्यार्थीच येईनातसे झाले. महाराष्ट्रात शास्त्री होते. पण आता महाराष्ट्रात शास्त्री कुठे आहेत ?

नव्यन्यायाचा परिचय करून देणारा किंवा त्याचे सखोलपणे विवरण करणारा ग्रंथ मराठीत लिहावा अशी इच्छा तुम्हाला झाली नाही का ?

मी पुढे राजकीय चळवळीत पडल्यामुळे ही वासना उरली नाही. हा विषय चांगल्या रीतीने तपासून पाहिला पाहिजे असे आता मला वाटते. उदाहरण म्हणून सांगतो. मुक्तावलीचा शब्दखंड गेल्या महिन्यात मी एका विद्यार्थ्याला सांगितला. न्यायाच्या सिद्धांतांचा किंवा संकल्पनांचा गेल्या हजार वर्षांत काही विकास झाला आहे का, असा प्रश्न प्रा. दयाकृष्ण यांनी मला अलीकडे विचारला होता. त्याचे उत्तर असा विकास झाला आहे असे आहे. शाब्दबोधाचे उदाहरण घ्या. शाब्दबोध जो होतो त्याच्यामध्ये शब्दाच्या दोन वृत्ती मानल्या आहेत. म्हणजे शब्दाचे दोन प्रकारचे वर्तन मानले आहे. 'वर्तन' हा शब्द येथे लाक्षणिक अर्थाने घेतला पाहिजे. ह्या दोन वृत्ती म्हणजे शक्ती आणि लक्षणा. ह्या दोघांमध्ये शब्दाचा, पदाचा जो अर्थ आहे तो स्पष्ट होऊन जातो. शाब्दबोध जो होतो त्याच्यामागे शब्दाचे जे वर्तन असते ते दोन प्रकारचे असते : शब्दाचा वाच्यार्थ, किंवा शक्तीने होणारा अर्थ आणि दुसरा लक्ष्यार्थ. म्हणजे वाच्यार्थाला धरून असलेले इतर अर्थ. ह्यांच्यामध्ये सर्व शाब्दबोध संपतो.

पण शब्दाची जी शक्ती किंवा वाचकता आहे ती काय आहे ? तर मीमांसकांच्या दृष्टीने शब्दाच्या ठिकाणी स्वाभाविक अशी वाचकता आहे. शब्द हा नित्य आहे आणि त्याच्या ठिकाणी नित्य अशी शक्ती आहे. त्यांना वेदांची नित्यता सांभाळण्यासाठी हा सिद्धांत स्वीकारावा लागला. पण त्याच्या योगाने सगळीच भाषा नित्य ठरते. 'अस्मात् पदात् अयम् अर्थः बोद्धव्यः' ह्या पदाने हा अर्थ जाणावा– असा जो संकेत आहे तो ईश्वरी संकेत आहे असे प्राचीन नैयायिकांनी मानले आहे. हा सिद्धांत मीमांसकांच्या सिद्धान्तापासून फारसा दूर नाही. ईश्वराचा संकेत काय किंवा अनादि संकेत काय, ते जवळजवळ येतात– पण संकेत मानावा लागतो. ह्या शब्दापासून हा अर्थ व्हावा, असा बोध व्हावा असा हा संकेत असतो. नव्य-न्यायामध्ये असा एक पंथ निघाला की 'ह्या पदापासून हा अर्थ व्हावा' असा संकेत भाषिक व्यवहारामागे असतो हे मान्य केले की मग शक्ती आणि लक्षणा असा भेद करण्याचे कारण उरत नाही. कारण पदे उच्चारणारा जो आहे त्याच्या मनामध्ये त्यांच्यापासून असा अर्थ बोध व्हावा असे असतेच. शक्ती आणि लक्षणा ह्यांतील भेद एवढाच की लोकांनी नेहमी स्वीकारलेला रूढार्थ म्हणजे संकेत, म्हणजे ह्या पदापासून ह्या अर्थाचा बोध व्हावा असा जनांनी स्वीकारलेला संकेत म्हणजे शक्ती आणि ह्या पदापासून ह्या अर्थाचा बोध व्हावा असा वक्त्याने स्वीकारलेला संकेत म्हणजे लक्षणा एवढा भेद व्यवस्थेसाठी स्वीकारावा लागतो. मुलाचे आपण नामकरण करतो. त्याच्यातही ह्या पदापासून ह्या अर्थाचा बोध व्हावा अशीच इच्छा व्यक्त झालेली असते. ती पित्याची इच्छा असते 'पिता नाम करोति'. आणि 'गङ्गायां घोषः' अशी लक्षणा जेव्हा असते तेव्हा वक्त्याची 'गङ्गातीरावर घोष आहे' असे म्हणण्याची इच्छा असते; वक्त्याचे तात्पर्य असते. म्हणून

कशापासून काय अर्थबोध व्हावा ही वक्त्याची इच्छा येथे व्यक्त झालेली असते. वक्त्याची नसेल तर सामाजिक इच्छा असते– ह्या पदार्थापासून हा अर्थबोध व्हावा अशी सामाजिक इच्छा असते. भाषिक व्यवहारामध्ये ह्या संकेतापलीकडे काही नसते, येथपर्यंत नव्यनैयायिक आले होते.

म्हणजे ईश्वर बाजूला सारला गेला.

तात्पर्य अर्थात मानावेच लागते. 'सैन्धव आण' हे वाक्य भोजनाच्या प्रसंगी उच्चारले गेले असताना 'सैन्धव' म्हणजे मीठ असा अर्थबोध होतो; पण गावाला जाण्याचा प्रसंग असताना 'सैन्धव' म्हणजे घोडा असा अर्थबोध होतो. तेव्हा वक्त्याला अभिप्रेत असलेला अर्थ म्हणजे वक्त्याची इच्छा, ही मानावीच लागते. पण वक्त्याची इच्छा हेच केवळ अर्थबोधाचे साधन नाही. कारण ग्रंथापासून अर्थबोध आपल्याला होतो पण तेथे ग्रंथकाराची इच्छा काय आहे हे समजायचे साधन नसते. येथे सामाजिक किंवा सार्वजनिक इच्छा गृहीत धरावी लागते. वाक्यार्थाचे जे नियम आहेत – मीमांसेने विवरण केलेले किंवा शाब्दबोध-मीमांसेने दाखविलेले – त्यांना अनुसरून आपण अर्थबोध करून घेतो. एकंदरीत शाब्दबोधाची नव्य-न्यायामध्ये जी चर्चा झालेली आहे ती सखोल झालेली आहे.

तुम्हाला मोठे दाक्षिणात्य शास्त्री वाईत किंवा अन्यत्र भेटले का ?

हो. मी १९२९ साली काशीत ब्राह्मणपरिषदेला उपस्थित होतो. ही अखिल भारतीय परिषद होती आणि जवळजवळ सातशे पंडित तिला उपस्थित होते. नवीन, सुधारणावादी मत मांडणारा मी जवळजवळ एकटाच होतो. तेथे मला तातसुब्बरायशास्त्री हे मोठे वैयाकरण भेटले. आणि दक्षिणेतील अनेक नैयायिक भेटले. धारवाडचे नागेशशास्त्री उप्पनबेट्टिगिरी आणि त्यांचे वडील कृष्णशास्त्री हे दोघे महान नैयायिक आणि अद्वैतवेदान्ती. म्हणजे 'अद्वैतसिद्धि' शिकविणारे आणि 'गादाधरी' आणि 'जागदीशी' शिकवि-णारे. नागेशशास्त्री उप्पनबेट्टिगिरी यांचे पुत्र आज धारवाडची पाठशाळा चालवितात.

हे पंडित न्याय आणि अद्वैत यांची सांगड कशी घालतात ? न्याय शिकविताना न्यायसिद्धांत स्वीकारायचे आणि अद्वैत शिकविताना अद्वैतसिद्धान्त स्वीकारायचे असे ते करतात का ?

होय, अद्वैत शिकवताना न्यायाचे सप्तपदार्थ स्वीकारायचे नाहीत.

पण नव्यन्यायाचे अवच्छेदकता, आधारता इ. जे पदार्थ आहेत ते स्वीकारायचे का ?

हो. ते सर्व अद्वैत्यांनी घ्यायचे.

आता शेवटचा प्रश्न विचारतो. तुम्ही नव्यन्यायाच्या अंतरंगात प्रवेश केला. नंतर ॲरिस्टॉटलचे आकारिक तर्कशास्त्रही तुम्ही वाचले. त्या दोहोत तुम्हाला साम्यभेद काय आढळले ?

अन्वयव्याप्ती आणि व्यतिरेक-व्याप्ती ह्या दोन्ही व्याप्ती ॲरिस्टॉटलमध्ये आहेतच. ॲरिस्टॉटलचे जे 'व्हॅलिड मूड्स' आहेत– प्रमाणभूत न्यायशरीरे किंवा अनुमानशरीरे– त्यांना अन्वयव्याप्ती आणि व्यतिरेकव्याप्ती यांच्यात सामावून घेता येते. परंतु एक प्रश्न मला ह्या अभ्यासापासून उत्पन्न झाला. जे ग्रीक येथे आले त्यांचे ज्योतिषशास्त्र भारतीयानी घेतले. 'म्लेच्छा हि यवनास्तेषु सम्यक् शास्त्रमिदं स्थितम्। ऋषिवत्तेपि पूज्यन्ते किं पुनः दैवविद् द्विजाः ॥' असे वराहमिहिराने म्हटले आहे. तसेच ग्रीक ॲरिस्टॉटीलिअन पंडित जर येथे आले असते तर त्यांच्या तर्कशास्त्राचा, तत्त्वज्ञानाचा स्वीकार भारतीयां-कडून झालाच असता असे मला वाटते. गेल्या हजारएक वर्षांत आपला जो संकुचित दृष्टिकोण बनला आहे तो त्या वेळी नव्हता. भारतीय आणि पाश्चात्त्य दृष्टिकोणांचा समन्वय साधण्याची ही मोठी संधी हुकली. मग येथले दार्शनिक विचार वेगळ्या पद्धतीने विकसित झाले असते. पण अलेक्झांड्रियामध्ये ज्याप्रमाणे मोठ्या प्रमाणावर वैचारिक स्वातंत्र्य निर्माण झाले होते तसे वैचारिक स्वातंत्र्य भारतामध्ये कायम होते. जैन, बौद्ध इ. अवैदिक पंथ येथे नांदले आणि त्यांना राजाश्रयही मिळाला. एखादा राजा असहिष्णू असे पण सामान्यपणे राजे सर्व पंथांना मान्यता देत असत. कदाचित राजांना असे दिसत नसे की आपल्या कक्षेतील सर्वांना शैव बनविणे किंवा वैष्णव बनविणे शक्य कोटीतील आहे, ज्यांना तशा प्रकारची शक्ती होती आणि तसे प्रयत्न ज्यांनी केले त्यांना प्रतिकार झाला असणार.

— कदाचित असे फारसे प्रयत्नही झाले नसतील. ख्रिश्चन धर्म हाच खरा धर्म आहे अशी एक खोल श्रद्धा असल्यामुळे सर्व प्रजाजनांनी ख्रिस्ती– किंवा एका विशिष्ट पंथाचे ख्रिस्ती– असले पाहिजे असा आग्रह धरण्यात येत असे. पण येथे अनेक आध्यात्मिक, धार्मिक पंथ असू शकतात आणि ते प्रमाण असू शकतात अशी दृष्टी होती.

ही तात्त्विक जाणीव वेदकाळापासूनची आहे. हे सर्व भिन्न संप्रदाय जे आहेत ते एकाच अंतिम, अनिर्वचनीय सत्याकडे जातात, एकाच अंतिम सत्याचे भिन्न आविष्कार असू शकतात हा उपनिषदांचा दृष्टिकोण आहे. आणि ह्या दृष्टिकोणाला बौद्धांनी व जैनांनी अप्रत्यक्ष आधार दिला. जैन अनैकान्तवादी. म्हणजे एका दृष्टीने हेही मत योग्य आहे आणि एका दृष्टीने ते विरोधी मतही योग्य आहे असे मानणारे. तेव्हा हट-वादामध्ये परपक्षाचा निःपात करण्याचा जो उग्र आग्रह असतो तो जैनांच्या स्याद्वादामध्ये, अनैकान्तवादा-मध्ये नाही. बौद्धांचे मत असे की हे काहीही असले तरी चित्तशुद्धीशिवाय मोक्ष नाही आणि चित्तशुद्धी झाल्यानंतर तुम्ही द्वैती की अद्वैती याला काही महत्त्व नाही. हा बौद्धांचा दृष्टिकोण फार महत्त्वाचा आहे आणि त्याचा येथे प्रभाव पडला. उदा., भगवद्‌गीतेवर त्याचा प्रभाव पडला. स्थितप्रज्ञाची जी संकल्पना आहे तिचा विश्वाचे अंतिम तत्त्व काय आहे ह्याच्याशी काही संबंध नाही.

प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥

ही परमशांती, विकारांवर विजय मिळवून, तुम्ही मिळवली, की तिच्यात मोक्ष आला. ब्रह्मात्मक निर्वाण तुम्हाला लाभते. हा उच्च विचार बुद्धकालीच निर्माण झाला.

दुसऱ्या बाजूने पाहिले तर चित्तशुद्धीच्या तुलनेने बौद्धिक शास्त्रांना त्यांनी गौण मानले.

नाही. त्या शास्त्रांनाही त्यांनी मान्यता दिली. नाही तर ही शास्त्रे वाढलीच नसती. सांख्यदर्शन किती सुरेख वाढले आहे !

हा एक प्रकारचा खेळ होता ?

शास्त्रे पूरक होती. प्रत्येक विश्वविचार शांतीकडे नेतो अशी त्यांची श्रद्धा होती. समग्र विश्वाचा तुम्ही कोणत्याही दृष्टीने विचार करा, पण करा असा त्यांच्या भूमिकेचा अर्थ लावता येईल. ‘शमाय शास्त्रं जगतो जगाद।’ असे न्यायवार्तिककार म्हणतात.

नव्यन्यायाचे प्रस्थापक गङ्गेशोपाध्याय आपल्या ‘तत्त्वचिंतामणि’ ह्या ग्रंथाच्या शेवटी म्हणतात, ‘अतः सिद्धं चत्वारि प्रमाणानि इति उपरम्यते।’ (वरच्या प्रतिपादनावरून चार प्रमाणे सिद्ध होतात असे म्हणून आता थांबतो.) पुढे

धीराः कुशाग्रमतयो भवतः प्रणम्य ।
मौलो निधाय करवारिरुहे समीहे ।
वाणीयं अर्थरहितापि विश्रृंखलापि ।
सानुग्रहेण हृदयेन विलोकनीया ॥

(हे विद्वानांनो, तुमची कुशाग्रमती आहे. दोन हात मस्तकावर जोडून तुम्हाला प्रणाम करतो. माझी ही वाणी अर्थरहित, विस्कळीत असली तरी हृदयामध्ये अनुकंपा ठेवून तिचे अवलोकन करा.)

पण विरुद्ध प्रवृत्तीही दिसते : रघुनाथशिरोमणी म्हणतात,

विदुषां निवहैः इहैकमत्या ।
यदटंकि यच्च दुष्टम् ।
मयि जल्पति कल्पताधिनाथे ।
रघुनाथे मनुतां तदन्यथैव ॥

(विद्वानांच्या संघाने एकमताने जे दुष्ट म्हणून किंवा अदुष्ट म्हणून सांगितले असेल ते अनुमानाचा अधिपती असा हा मी रघुनाथ बोलत असताना– वाद करीत असताना– मी म्हणतो तेच बरोबर आहे, त्यांचे चूक आहे असे माना.)

⊙ ⊙ ⊙









[अनुक्रमणिका]

# काफ्काच्या काही कथा

एस. डी. इनामदार

## १. एक छोटी नीतिकथा

अरेरे !' —उंदीर म्हणाला. 'हे जग दिवसेंदिवस किती लहान होत चालले आहे ! सुरुवातीला ते इतके मोठे होते, की मला भीतीच वाटायची, मी पळत सुटायचो आणि दूरवर मला माझ्या डावी-उजवीकडे भिंती दिसू लागल्या, की मला दिलासा वाटायचा. पण ह्या लांबलचक भिंती आता इतक्या जलद गतीने एकमेकींच्या जवळ जवळ येत चालल्या आहेत, की मी शेवटच्या खोलीत पोचलोय देखील. आणि तिथेच एका कोपऱ्यात सापळा रचून ठेवला आहे, ज्याच्या दिशेने मी चाललो आहे...' 'तुला फक्त तुझी दिशा बदलायला हवी'— मांजर म्हणाले आणि त्याने उंदराला गट्ट केले.

* * *

## २. भोवरा

जिथे लहान मुले खेळत असत, तिथे एक विशिष्ट तत्त्वज्ञ नेहमी रेंगाळत असे आणि जेव्हा एखादा मुलगा भोवरा फिरवताना दिसे, तिथे तो वाट पाहात थांबून राही. भोवरा गरगरत इकडेतिकडे पळू लागला, की तत्त्वज्ञही त्याच्यामागे धावत असे आणि तो भोवरा पकडण्याचा प्रयत्न करीत असे. मग मुले आरडाओरडा करीत, त्याचा धिक्कार करीत, त्याला त्या खेळण्यापासून हुसकावून लावण्याचा प्रयत्न करीत. तरीही तो यत्किंचितही विचलित होत नसे. भोवरा गरगरत असतानाच त्याला पकडण्यात यश आले, की त्याला सुख होत असे. पण ते क्षणभरच. मग तो भोवरा जमिनीवर फेकून देई व तिथून चालू लागे. कारण त्याचा असा विश्वास होता की, कोणत्याही तपशिलाचे आकलन— मग ते गरगरा फिरणाऱ्या भोवऱ्याचे का असेना— हे सर्व वस्तूंच्या आकलनासाठी पुरेसे होते. आणि ह्याच कारणासाठी मग तो मोठमोठ्या प्रश्नांमध्ये गुंतून राहात नसे. कारण ते त्याला अवाजवी, उधळेपणाचे लक्षण वाटे. एकदा का लहानातला लहान तपशील योग्य तऱ्हेने समजून आला की, मग प्रत्येक गोष्ट समजल्यासारखीच आहे. आणि म्हणून तो फक्त गरगरणाऱ्या भोवऱ्यामध्येच गुंतून राहिला होता. आणि जेव्हा जेव्हा भोवरा फिरवण्याची तयारी चालू असे, तेव्हा त्याला अशी आशा वाटत असे, की निदान ह्या वेळी तरी आपण यशस्वी होऊ. भोवरा गरगरू लागला, की तो धापा टाकत त्याच्यामागे धावू लागे आणि त्याच्या आशांना पालवी फुटत असे. पण जेव्हा त्याने तो लाकडाचा निर्बुद्ध गोळा आपल्या हातावर घेतला, तेव्हा त्याला त्याची विलक्षण किळस वाटू लागली आणि मुलांच्या किंचाळ्या — की ज्या त्याला आतापावेतो ऐकूच आल्या नव्हत्या, त्या आता एकदम त्याच्या कानांचे पडदे टरकावून आत घुसल्या आणि त्यांनी त्याला तिथून दूर हुसकावून लावले. अन् वेड्यावाकड्या दोरीतून सुटलेल्या भोवऱ्यासारखा तो गरगरत दूर गेला.

## ३. अभिप्राय

भल्या पहाटेची वेळ. रस्ते स्वच्छ अन् निमनुष्य. मी स्टेशनकडे निघालो होतो. माझ्या मनगटावरचे घड्याळ मी मनोऱ्यावरच्या घड्याळाशी पडताळून पाहिले, तेव्हा लक्षात आले की मी समजत होतो, त्यापेक्षा खूपच उशीर झालाय. आता अत्यंत घाई करणे भागच होते. आणि हे लक्षात येताच तो जणू निर्वाणीचा इशारा मानून मी जसजशी घाई करू लागलो, तसतसा माझा रस्ता तर बरोबर असेल ना, ह्याविषयी मनात संभ्रम माजू लागला. त्या शहरात तसा मी नवखाच होतो. सुदैवाने तिथे जवळच एक पोलीस उभा होता. मी धावतपळत, धापा टाकत त्याच्याजवळ गेलो. आणि त्याला रस्ता विचारला. त्याने मंद स्मित केले व म्हणाला, 'माझ्याकडून तुम्ही तुमचा रस्ता शोधण्याची अपेक्षा करताय?—' 'होय,' मी म्हणालो, 'कारण माझा मला तो सापडत नाहीय.' 'तर मग हा नाद सोडून द्या !—सोडूनच द्या !' विजयोन्मादाने हात-

अनुक्रमणिका

वारे करीत तो म्हणाला आणि तिथून जाऊ लागला. एकांतात स्वतःशीच हासण्यात चूर असलेल्या माणसा-सारखा.

* * *

## ४. प्रॉमीथिअस

प्रॉमीथिअससंबंधी चार आख्यायिका सांगितल्या जातात :

पहिल्या आख्यायिकेनुसार, त्याने देवांची गुपिते मानवांना सांगून विश्वासघात केल्याबद्दल त्याला कॉकेशस पर्वताच्या खडकाला जखडून टाकण्यात आले होते. आणि देवांनी गरुडांना धाडले होते, त्याचे यकृत खाऊन त्यावर गुजराण करण्यासाठी. की जे यकृत कधी नष्टच होत नव्हते; ते पुनःपुन्हा नव्याने सचेत होत होते.

दुसऱ्या आख्यायिकेनुसार, प्रॉमीथिअस आपल्या यकृताचे वाभाडे काढणाऱ्या गरुडांच्या चोचींपासून स्वतःला वाचवण्यासाठी, त्या यातनामय अवस्थेत खडकामध्ये जास्त जास्त अंग चोरून घेत, स्वतःला दडपून टाकत होता. तो त्या खडकामध्ये इतका आत आत रुतत गेला की, अखेर तो त्या खडकाचाच एक भाग होऊन गेला.

तिसऱ्या आख्यायिकेनुसार, हजारो वर्षांच्या अव्याहत कालप्रवाहात त्याचा द्रोह विसरला गेला. त्याने केलेला विश्वासघात देव विसरले, गरुड विसरले आणि तो स्वतःदेखील विसरून गेला.

चौथ्या आख्यायिकेनुसार, जे आता निरर्थक ठरले होते, त्याचा प्रत्येकालाच कंटाळा आला होता. देव कंटाळून गेले, गरुड कंटाळले आणि त्याच्या जखमेवरही आस्ते आस्ते कंटाळ्याची खपली धरली.

आणि तिथे फक्त उरला अनाकलनीय, अवर्णनीय खडकाळ पर्वत. आख्यायिका जे अनाकलनीय ते स्पष्ट करण्याचा प्रयत्न करते. ते सत्याच्या भूमीतून उगवून येत असल्याने त्याचा शेवटही अनाकलनीयच व्हावा, हे अटळ.

* * *

## ५. पोसायडॉन

पोसायडॉन मेजापाशी बसला होता आणि पाण्याचे हिशेब करीत होता. नद्या, सरोवरे, समुद्र असे सर्व प्रकारचे जलव्यवस्थापन त्याच्याकडे होते. आणि हे काम अखंड चालू होते. त्याच्या ह्या कार्यात त्याला जितके लागतील तितके साहाय्यक घेण्याची मुभा होती आणि खरोखरच त्याचे साहाय्यक संख्येने विपुल होते. पण तो आपले कार्य फार निष्ठेने करीत असल्याने तो सर्व हिशेब पुनःपुन्हा स्वतः जातीने करीत असे. त्यामुळे त्याला साहाय्यकांची फारशी मदत होण्याजोगी नव्हती. मात्र त्याला आपले काम आवडत होते, अशातला भाग नव्हता. तथापि त्याच्यावर ते सोपवले गेले असल्याने तो ते चोखपणे पार पाडत होता, इतकेच. आणि खरे तर, त्याने त्यांच्या दृष्टीने अधिक आनंददायक काम मिळावे, म्हणून वारंवार अर्जविनंत्या केल्या होत्या. पण जे वेगवेगळ्या कामांचे प्रस्ताव त्याच्यापुढे मांडले जात, त्यांतून एकच गोष्ट निष्पन्न होत होती की, त्याच्या सध्याच्या कामाइतके दुसरे कुठलेच काम त्याच्या योग्यतेचे नव्हते. त्यामुळे हे सांगायला नकोच की, त्याला दुसरे एखादे काम मिळणे फार अवघड होऊन बसले होते. आणि काहीही झाले तरी, एखाद्याच विशिष्ट समुद्राचा कार्यभार त्याच्यावर सोपवणे हेही अशक्य होते. शिवाय त्यामुळे त्याचे काम हलके झाले असते, अशातलाही भाग नाही. उलट ते कनिष्ठ प्रतीचे झाले असते, इतकेच. आणि महान पोसायडॉन हा फक्त सर्वोच्च पदच भूषवू शकत होता. शिवाय पाण्याशी संबंधित नसलेले कोणतेही पद त्याला देऊ केल्यास ती नाममात्र कल्पनाही त्याला अगदी असह्य होत असे. त्या कल्पनेनेच त्याला उमळून येई, त्याचे दैवी श्वास कासावीस होत, आणि त्याची पोलादी छाती धपापू लागे. आता वस्तुस्थिती अशी की, त्याच्या ह्या यातना कुणी फारशा गंभीरपणे मनावर घेत नसे. एखादा प्रचंड बलशाली माणूस जेव्हा किरकोळ तक्रारी करतो, त्या वेळी त्याचे म्हणणे ऐकून घेऊन त्याच्याशी सहमत असल्याचा नुसता बहाणा करावयाचा असतो, इतकेच. त्यालाही त्यातून फारसे समाधान लाभण्याची आशा नसते, ते सोडून द्या. खरे तर, पोसायडॉनला त्याच्या पदाच्या जबाबदारीतून मुक्त करण्याचा विचारही फारसा कोणी करीत नसे. कारण जलदेव असणे, हे पोसायडॉनचे अनादी-अनंत काळापासूनचे प्राक्तन होते आणि ते निरंतर तसेच राहणार होते.

आता त्याला चीड कशाची येत असेल तर (आणि हेच त्याच्या कामाविषयीच्या असमाधानाचे मूळ कारण होते) त्याच्या संबंधात पसरवल्या जाणाऱ्या अफवांची.

उदाहरणार्थ, तो आपला त्रिशूळ घेऊन गलबतातून सदैव समुद्रसंचार करीत फिरत असतो. आता हे खरे तर नव्हतेच; उलटपक्षी तो विश्वसागराच्या खोल तळाशी बसून अखंड, सातत्याने हिशेब करीत असायचा. फक्त अधूनमधून केव्हातरी तो ज्यूपिटरच्या भेटीसाठी प्रवासाला निघायचा. एवढाच त्या कंटाळवाण्या कामातून विरंगुळा. आणि बहुतेक वेळा क्रुद्ध, संतप्त होऊनच तो त्या प्रवासाहून परतत असे. परिणामी त्याने फारसे समुद्र पाहिलेच नव्हते. अपवाद म्हणजे, ऑलिंपस पर्वतावर घाईगर्दीने उड्डाण करीत असता, अतिजलदगतीने समुद्रपार करताना, दिसतील तेवढेच. पण प्रत्यक्ष शीडजहाजातून समुद्रप्रवास असा त्याने केलाच नव्हता. हा प्रवास जगाच्या अंतापर्यंत पुढे ढकलणार असल्याचे तो नेहमी म्हणत असे. कारण अंतकाळ समीप आला असता, अखेरचा हिशेब पुरा होईल आणि तो एक छोटी जलद सफर करू शकेल

* * *

## ६. प्रस्थान

माझा घोडा तबेल्यातून बाहेर काढण्याची मी आज्ञा दिली. मी काय म्हणतोय, ते नोकराला कळेना. मग मी स्वतःच तबेल्यात गेलो, घोड्यावर खोगीर चढवले आणि सवार झालो. दूरवर मला रणभेरी ऐकू आल्या. मी त्याला विचारले, 'ह्याचा अर्थ काय ?'–तर त्याला त्यातले काहीच ठाऊक नव्हते व काही ऐकूही आले नव्हते. त्याने मला फाटकापाशी थांबवले व विचारले; 'मालक, आपण कुठे निघालाय घोड्यावरून ?–' 'ते मला माहीत नाही–' मी उत्तर दिले; 'फक्त इथून दूर. आणि इथून दूर. जास्तीत जास्त इथून दूर, अगदी दूरवर जाणे हाच माझा मार्ग आणि तोच मला माझ्या ध्येयाप्रत नेईल.' 'तुमचे ध्येय ?– तुम्ही जाणता तर ते ?–'त्याने विचारले. 'होय–' मी उत्तर दिले– 'आत्ताच तर मी सांगितलं ना, इथून दूर हेच माझं ध्येय–' 'तुम्ही बरोबर काही शिदोरी घेतली नाहीय–' तो म्हणाला. 'नाही, मला त्याची गरज वाटत नाहीय.' मी म्हणालो, 'हा प्रवास इतका लांबचा आहे की, मला वाटेत काही मिळालं नाही तर मी उपासमारीनं मरणार, हे नक्कीच. तेव्हा कुठलीच शिदोरी मला वाचवू शकणार नाही. आणि सुदैवाने, प्रवास फार लांबचा, अगदी दीर्घ पल्ल्याचा आहे, हे बरंच आहे.'

* * *

## ७. वकील

मला कुणी वकील मिळालाय की नाही, ह्याविषयी माझी खात्री नव्हती. ह्याबद्दल निश्चित असे काहीच मला सांगता आले नसते. प्रत्येक चेहरा मैत्रीला पारखा झालेला. पुष्कळसे लोक, जे माझ्या दिशेने येत व मला कॉरिडॉरमध्ये भेटत, ते लठ्ठ म्हाताऱ्या बायकांसारखे दिसत. सबंध अंग नखशिखान्त झाकणारे, निळे-पांढरे पट्टे असलेले मोठ्ठे झगे त्यांनी घातले होते आणि पोटांवरून हात फिरवत, कॉरिडॉरच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत, ते अवघडलेपणाने येरझारा घालत फिरत होते. आम्ही न्यायालयातच आहोत का, ह्याविषयीही मला खात्रीपूर्वक सांगता आले नसते. काही बाबी त्याला अनुकूल होत्या, तर काही प्रतिकूल. इतर अनेक तपशिलांपेक्षाही, न्यायालयाची आठवण करून देणारा एक निर्णायक तपशील म्हणजे, तिथे सतत येत असलेला, मधमाशांच्या गुणगुणण्यासारखा एक प्रकारचा गुण्गुण् आवाज. जो दूरवरून एकसारखा अखंड कानावर पडत होता. तो कोणत्या दिशेने येतो आहे, हे कुणाला सांगता आले नसते. प्रत्येक खोलीमध्ये तो आवाज इतका ओतप्रोत भरून राहात असे, की तो सगळीकडूनच, सर्व दिशांनी येत असला पाहिजे, असेच एखाद्याला वाटले असते. किंबहुना असे म्हणणे जास्त संयुक्तिक होईल की, जिथे प्रत्येकजण उभा होता, ती जागाच या गुणगुणत्या ध्वनीचे उगमस्थान होती. पण हा निस्संशय एक आभासच. कारण आवाज दूरवरून येत होता. आता हे कॉरिडॉर्स – अरुंद, कडेकोट बंदिस्त कमानींनी युक्त, क्रमशः आत आत, एकमेकींत मिटत जाणारे कमानींचे वक्राकार आणि तुरळक, मोजक्या अलंकरणाने युक्त असे उंच दरवाजे– असे हे कॉरिडॉर्स; वस्तुतः तिथे गाढ शांतता नांदावी अशा उद्देशाने त्यांची रचना झाली असावी–ते एखाद्या संग्रहालयाचे वा ग्रंथालयाचे कॉरिडॉर्स शोभत होते. मग, जर ते न्यायालयच नसेल तर तिथे मी वकिलाचा शोध का बरे घेत होतो ? – ह्याचे कारण असे की, मी प्रत्येक ठिकाणीच वकिलाचा शोध घेत होतो. प्रत्येक ठिकाणी त्याची गरज असते. तसेच म्हटले तर, कोर्टात कमी आणि इतरत्र जास्त. कारण कोर्ट न्यायनिवाडा करते ते कायद्यानुसार. आता जर एखाद्याने अशीच समजूत करून घेतली, की हे फार अन्याय्य, पक्षपाती व क्षुद्र-








अनुक्रमणिका

पणाचे आहे, तर मग जगणेच अशक्य होऊन बसेल. तेव्हा एखाद्याला असा आत्मविश्वास वाटला पाहिजे, की कोर्ट न्यायाधीश महाराजांना न्यायदानाची पूर्ण मुभा देते. कारण तेच तर त्याचे परमकर्तव्य आहे. मात्र आरोप, वकिली आणि निकालपत्र हे सर्व कायद्याच्या कक्षेतच घडत असते आणि त्यात कुठल्याही एका व्यक्तीने अडथळा आणणे वा अधिक्षेप करणे हा कायद्याने गुन्हाच ठरेल- परंतु न्याय मिळवून देण्यासाठी कारणीभूत ठरणाऱ्या साक्षीपुराव्यांची गोष्टच वेगळी असते. हे साक्षीपुरावे चौकशांवर आधारलेले असतात आणि कुठून कुठून चौकशा करून ते गोळा करावे लागतात. नातेवाईकांकडून आणि नवख्यांकडून; मित्रांकडून आणि शत्रूंकडून; कौटुंबिक जीवनातून आणि सार्वजनिक जीवनातून; शहरातून आणि खेड्यातून. जवळ जवळ प्रत्येक ठिकाणी चौकशा न् पुरावे. आणि इथेच खरी वकिलांची गरज असते. वकील, भरपूर वकील आणि मुबलक वकील. वकिलांचे घट्ट बंदिस्त कडे करणे, अधिक चांगले. वकिलांची एक जिवंत भिंत. कारण वकील हे जात्याच अभेद्य जडशीळ प्राणी असतात. मात्र फिर्यादी हे कावेबाज कोल्हे, चपळ खारी आणि अदृश्य उंदीर असे असल्याने कुठेही जरादेखील फट सापडताच ते निसटून जातात. वकिलांच्या तंगड्यांतून ते सटकतात. तेव्हा, त्यांच्यावर नजर ठेवा! आणि म्हणूनच मी इथे आहे. वकील गोळा करत हिंडतोय. पण अजून मला एकही गवसलेला नाही. फक्त त्या म्हाताऱ्या बायका सारख्या येतायत न् जातायत. त्यांची ये–जा आपली सारखी चालूच आहे. आणि मी जर या शोधमोहिमेवर नसतो, तर मला नक्कीच झोप लागली असती. पण, अरेरे! मी योग्य जागी आलो नाहीच. आणि ही भावना काही केल्या मनातून जात नाही, की मी योग्य ठिकाणी नाही. खरे तर, मी अशा जागी असायला हवा, की जिथे अनेक लोक एकत्र येतात. देशाच्या निरनिराळ्या भागांतून, वेगवेगळ्या जातिपंथांचे, वर्गांचे, व्यवसायांचे आणि आबालवृद्ध जिथे एकत्र येतात, तिथेच मी असायला हवे. आणि मला संधी हवी, त्या गर्दीतून चोखंदळ निवड करण्याची. असे लोक की, जे माझ्या दृष्टीने योग्य आहेत, जे मैत्री निर्माण करू शकतात; माझ्याकडे पाहण्याची दृष्टी ज्यांच्याकडे आहे, असे लोक. आणि ह्यासाठी खरेखुरे योग्य ठिकाण म्हणजे प्रचंड जत्रेचे मैदान. की, जिथे जाण्याऐवजी मी इथे या कॉरिडॉर्समध्ये भटकतो आहे, निव्वळ म्हाताऱ्या बायकांचे चेहरे पाहात. आणि त्याही संख्येने जास्त नव्हेत, तर अगदी थोड्या. आणि पुनःपुन्हा त्याच, त्याच. वेगळ्याही नव्हेत. आणि ह्या जरी थोड्या असल्या, तरी त्या माझ्या तावडीत सापडत नाहीयत. त्यांची संथ, ढालगज चाल आणि तरीही त्या माझ्या हातून निसटतायत. पावसाळी ढगांसारख्या तरंगत चालल्यायत, माझ्यापासून दूर, दूर. आणि कुठल्या तरी अज्ञात कृत्यामध्ये पूर्ण गढून गेल्यायत. तर मग हे असे का?– की, दारावरची पाटी न पाहताच कुठल्याही घरात मी अविचाराने घुसलोय. आणि आता इथे घुटमळतो आहे, या कॉरिडॉर्समध्ये. अगदी हेकटपणाने इथे पाय रोवून थांबलो आहे. इतका की, मी या घरापुढे कधीकाळी उभा होतो, हेही आता मला आठवत नाहीय, अन् जिन्यावरून पायऱ्या चढून वर पोचलो कधी, हेही नाही. पण आता माघारी परतता येत नाही. हा काळाचा अपव्यय, आपण चुकीच्या मार्गाने जात आहोत ह्याची कबुली, हे सगळे फार असह्य होते आहे. काय?– इतक्या घाईगर्दीच्या अन् धावपळीच्या तुटपुंज्या आयुष्यात, अस्वस्थ गुणगुणणाऱ्या आवाजाच्या संगतीत, धावत जिने उतरून खाली जायचे?– अशक्य! जो वेळ तुमच्या वाट्याला आलाय, तो इतका थोडा आहे की, एखादाही क्षण वाया घालवणे म्हणजे सबंध आयुष्य वाया घालवणे. कारण तुमच्या आयुष्याची दोरी, तुम्ही जितका वेळ वाया दवडता त्या वेळेइतकीच लांब असते; त्याहून जास्त नाही. तेव्हा तुम्ही जर चालायला सुरुवात केली असेल, तर चालतच रहा. मग काय वाट्टेल ते होवो! त्यातून तुम्ही काही ना काही तरी मिळवालच. आणि कसला धोका म्हणून नाही. कदाचित, शेवटच्या क्षणी तुम्ही पडालही. पण जर सुरुवातीलाच, पहिल्या पायरीवरूनच तुम्ही माघारी वळला असतात आणि जिने उतरत असतात, तर तेव्हाही पडला असतातच की. आणि शंकेला जराही वाव नाही; अगदी निश्चितपणे पडला असताच. तेव्हा, जर तुम्हाला इथे कॉरिडॉर्समध्ये काही आढळले नाही, तर दरवाजे उघडा. ह्या दरवाजांपाठीमागेही काही आढळले नाही; तर आणखी काही मजले आहेत, ते चढून वर जा. तिथेही काही आढळले नाही, तरी हरकत नाही. आणखी उड्या मारत जिन्यांच्या काही पायऱ्या पार करा. आणि जोवर तुम्ही जिने चढणे








थांबवत नाही, तोवर कधी जिनेही संपणार नाहीत. तुमच्या चढत्या पावलांखाली तेही वरवर चढतच जातील.

* * *

## ८. बंधुभाव

आम्ही पाचजण मित्र आहोत. एके दिवशी आम्ही एका घरातून एकामागून एक असे बाहेर पडलो. पहिला आला आणि फाटकापाशी जाऊन उभा राहिला. नंतर दुसरा आला व पहिल्याशेजारी जाऊन उभा राहिला. नंतर तिसरा आला, नंतर चौथा, नंतर पाचवा. अखेर अशा रीतीने आम्ही सगळे येऊन एका रांगेत उभे राहिलो. लोकांचे आमच्याकडे लक्ष वेधले गेले. आमच्याकडे बोट दाखवत ते म्हणू लागले : हे पाचजण नुकतेच त्या घरातून बाहेर पडलेत. तेव्हापासून आम्ही एकत्र राहतो आहोत. आणि आमचे हे सहजीवन खरोखरच शांततामय झाले असते; फक्त सहावा आमच्यात वारंवार अडथळे न आणता तर. तो काही जाणूनबुजून आम्हाला उपद्रव देतो, अशातला भाग नाही. पण तो चीड येईल, असे वागतो मात्र. आणि हाच तर मोठा उपद्रव आहे. आता जिथे तो नकोसा आहे, तिथे तो का बरे घुसखोरी करतो आहे ? आम्ही त्याला ओळखत नाही आणि आम्हाला तो आमच्यात यायला नको आहे. असा एक काळ खचितच होता की, जेव्हा आम्ही पाचजणही परस्परांना ओळखत नव्हतो. आणि असेही म्हणता येईल की, अजूनही आम्ही एकमेकांना ओळखत नाहीच. पण जे आमच्याबाबत शक्य आहे आणि आम्ही पाचजण एकमेकांना सहन करू शकतो, ते या सहाव्याबाबत शक्यही नाही आणि सहन करण्यासारखेही नाही. ते काही असो, आम्ही पाच आहोत आणि सहा होण्याची आमची इच्छा नाही. आणि असे सदासर्वकाळ एकत्र राहण्याचा अट्टाहास तरी काय म्हणून ? ह्यात तरी काय तात्पर्य आहे ?– आम्हा पाचांचे एकत्र येणेही तसे निरर्थकच आहे, म्हणा. पण आम्ही कसे का असेना, एकत्र आहोत. आणि एकत्र राहणारही आहोत. तेव्हा आणखी नव्याने एकजूट आता नको. आमच्या आजवरच्या अनुभवावरून आम्ही ती नाकारतो आहोत. पण हे सहाव्याला समजावून सांगायचे कुणी ?– त्याबद्दलची भली, भली, लंबीचवडी स्पष्टीकरणेही शेवटी त्याला आमच्या वर्तुळात सामावून घेण्याच्याच निष्कर्षाप्रत येतील. तेव्हा ते स्पष्टीकरणही नको आणि त्याला सामावून घेणेही नको. मग त्याने कितीही रुसवेफुगवे धरले, वा दाताच्या कण्या केल्या, तरी आम्ही त्याला कोपराने ढोसून बाहेर ढकलू. आणि त्याला कितीही दूर लोटा, तो पुनःपुन्हा परत येतोच.

* * *

## ९. गिधाड

एक गिधाड माझ्या पायांचे लचके तोडत होते. माझे बूट त्याने कधीच फाडले होते आणि पायमोजांच्या चिंध्या केल्या होत्या. आता ते प्रत्यक्ष पायांवरच तुटून पडले होते. ते पुनःपुन्हा त्यांवर चोची मारत होते. नंतर वारंवार माझ्याभोवती अस्वस्थपणे घिरट्या घालत होते आणि पुनःपुन्हा पायांकडे आपला मोहरा वळवत, चोची खुपसून पाय कुरतडण्याचे काम चालू ठेवत होते. जवळूनच एक सद्गृहस्थ चालला होता. त्याने थोडा वेळ हे पाहिले आणि मग मला विचारले की, मी या गिधाडाच्या वेदना का बरे सोसतो आहे? – 'मी असहाय्य आहे '– मी म्हणालो– 'सुरुवातीला ते जेव्हा आले व माझ्यावर हल्ला करू लागले; तेव्हा त्याला हाकलून देण्याचा मी निकराचा प्रयत्न केला होता, एवढेच नव्हे तर, त्याचे नरडे आवळून त्याला ठार मारण्याचाही प्रयत्न केला. पण हे पक्षी मोठे सामर्थ्यवान असतात. ते माझ्या चेहऱ्यावर झेपावण्याच्या बेतात होते; पण मी माझे पाय बळी देण्याचे ठरवले. आणि आता माझ्या पायांच्या जवळजवळ चिंध्या झाल्या आहेत.' 'कमाल आहे ! तुम्ही अशा प्रकारे छळाला बळी पडताय, ह्याची ! ' – तो सद्गृहस्थ म्हणाला. 'बंदुकीची एक गोळी या गिधाडाचा शेवट करण्यास पुरेशी आहे.' 'खरंच ?–' मी म्हणालो; 'आणि तुम्ही माझ्यासाठी कराल हे ?–' 'हो, हो, अगदी आनंदानं !–' तो सद्गृहस्थ म्हणाला; 'फक्त मला घरी जायला हवं आणि माझी बंदूक आणायला हवी. तुम्ही आणखी अर्धा एक तास थांबू शकाल का ?'– 'तशी काही खात्री देता यायची नाही'– मी म्हणालो आणि वेदना सोसत क्षणभर कणखरपणे उभा राहिलो. मग मी म्हणालो, 'ते काही असो. पण तुम्ही कृपा करून माझ्यासाठी प्रयत्न तरी करून पहा.' 'ठीक आहे.' तो सद्गृहस्थ म्हणाला, 'मला शक्य होईल तितक्या जलदीने मी परत येतो.' आमचे हे



अनुक्रमणिका






संभाषण चालू असता, गिधाड शांतपणे ते ऐकत होते. आणि त्याची नजर एकदा माझ्याकडे, तर एकदा त्या सद्गृहस्थाकडे अशी सारखी भिरभिरत होती. आता मला कळून चुकले, की सारे काही त्याला समजले आहे. त्याने पंख पसरून भरारी घेतली. जोरात सरसावून पुढे झेप घेण्यासाठी ते बरेचसे मागे फिरले आणि मग तुफान वेगाने भालाफेक करणाऱ्या योद्धयाच्या त्वेषात ते झेपावत आले आणि त्याची भाल्यासारखी चोच त्याने माझ्या तोंडात खुपसली. माझ्यात खोलवर ती रुतवली व मी मागे कोसळलो. कोसळताना एकच समाधानाची भावना होती की, माझ्या रक्ताने तो नखशिखान्त न्हाऊन निघाला आहे आणि हे रक्त सर्वत्र खोलवर पसरून, दुथडी भरून किनाऱ्यावरून वाहते आहे.

* * *

## १०. बोधकथांसंबंधी

शहाण्या माणसांची वचने म्हणजे निव्वळ बोधकथा, त्यांचा दैनंदिन जीवनात काहीच उपयोग नाही आणि आम्हाला आता फक्त दैनंदिन आयुष्यच तेवढे उरले आहे, अशा तक्रारी करणारे अनेकजण होते. जेव्हा एखादा शहाणा माणूस म्हणतो की, 'पलीकडे जा.' तेव्हा त्याचा अर्थ केवळ रस्ता ओलांडून, रस्त्याच्या एका बाजूने दुसऱ्या बाजूला जा, असा होत नाही. आणि ही गोष्ट एखादा माणूस साध्य करूही शकेल, जर त्याच्या त्या प्रयत्नांना योग्य फळ मिळणार असेल तर. पण शहाण्या माणसाला अभिप्रेत असते, ती ज्ञाताच्या कुंपणापलीकडची प्रचंड झेप. की, जी आपल्या आकलनाबाहेरची असते. आणि त्यालाही त्याचे म्हणणे अधिक नेमकेपणाने स्पष्ट करून सांगता येत नाही. आणि म्हणून शहाण्या माणसांच्या बोधवचनांचा आपल्याला इथे या जीवनात यत्किंचितही उपयोग होण्यासारखा नसतो. ह्या सगळ्या बोधकथा फक्त हेच सांगतात की, जे गूढ, अनिर्वचनीय; ते गूढ, अनिर्वचनीयच असते. आणि ही गोष्ट तर आपल्याला आधीपासूनच ठाऊक आहे. पण रोजच्या दैनंदिन जीवनात ज्या चिंता-विवंचनांना आपल्याला तोंड द्यावे लागते, त्या याहून फार निराळ्या असतात.

त्यावर एकजण म्हणाला; 'तुम्ही विरोध का करता ? – तुम्ही जर बोधकथांना अनुसरत गेलात, तर तुम्हीच बोधकथा होऊन जाल. आणि अशा रीतीने तुमच्या दैनंदिन विवंचनांतून मुक्त व्हाल.'

दुसरा म्हणाला, 'मी पैज लावतो की, ही देखील एक बोधकथाच आहे.'

पहिला म्हणाला; 'तू जिंकलास.'

दुसरा म्हणाला; 'पण दुर्दैवाने फक्त बोधकथेतच.

पहिला म्हणाला; 'नाही, प्रत्यक्षात. बोधकथेत तर तू हरलास.'

* * *

[ फ्रांट्स काफ्का ह्याच्या अनुक्रमे– ( १ ) अ लिट्ल फेबल, ( २ ) द टॉप, ( ३ ) अ कॉमेंट, (४) प्रॉमीथिअस, (५) पोसायडॉन, (६) द डिपार्चर, (७) ॲड्व्होकेट्स, (८) फेलोशिप, (९) द व्हल्चर आणि (१०) ऑन पॅरबल्स या दहा कथांचे स्वैर भावानुवाद. ]

○ ○ ○

## साभार पोच

* **काळा गुलाब** : विश्वास वसेकर; नवल पब्लिकेशन्स, ३९, अत्रेनगर, सेलू–४३१५०३; प्रथमावृत्ती; १९८७; पृ. ५१; कि. २० रुपये.

* **ड्रगजच्या जाळ्यात** ( रवीन्द्रसिंगची आत्मकथा ) : मराठी अनु. सुजला नित्सुरे; श्रीविद्या प्रकाशन, २५० क/१६ शनिवार पेठ, पुणे– ४११०३०; १९८७; पृ. १८५; कि. ५० रुपये.

* **उचल्या** : लक्ष्मण गायकवाड; श्रीविद्या प्रकाशन, २५० क/१६ शनिवार पेठ, पुणे– ३०; १९८७; पृ. १८८; किंमत ४५ रुपये.

* **'अमुचा पेला दुःखाचा'** ( आत्मचरित्र ) : बाळ राणे; श्रीविद्या प्रकाशन; २५०क/१६, शनिवार पेठ, पुणे-३०; १९८७; पृ. १९३; किंमत ४५ रुपये.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

**लावू कोटी कोटी संकल्पांचे दीप राखू प्रकाशित विकासाचा रथ**
**देऊ दुर्बलांना सहकार्याचा हात वेगे पुढे नेऊ जगन्नाथाचा रथ**

- अपुऱ्या आणि अनियमित पावसामुळे यंदा लागोपाठ चौथ्या वर्षी महाराष्ट्राच्या बऱ्याचशा भागात अवर्षणसदृश परिस्थिती निर्माण झाली तरी जनतेची उमेद व जिद्द कायम आहे.

त्यामुळेच जनतेचा भरघोस पाठिंबा शासनाच्या जनहितकारी ध्येयधोरणांना व कार्यक्रमांना लाभत आहे.

- अवर्षण परिस्थितीचा मुकाबला युद्धपातळीवरून करण्यासाठी शासकीय यंत्रणा सर्व स्तरांवर सिद्ध आहे. मागेल त्याला काम पुरविण्यास शासन कटिबद्ध आहे.
- ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याची गंभीर समस्या सोडविण्याच्या प्रयत्नात महाराष्ट्र शासन अग्रेसर आहे.
- उद्योगधंद्यांना विजेचा अखंडित पुरवठा होईल अशी दक्षता घेतली जात आहे.
- अपारंपरिक ऊर्जानिर्मिती, बायो-गॅस संयंत्रांची उभारणी, सामाजिक वनीकरण आदी कार्यात महाराष्ट्र राज्य आघाडीवर आहे.
- आदिवासी, दुर्बल घटकांतील लोक आणि हरिजन ह्यांच्या वस्त्यांत वीज पुरवून त्यांची घरे उजळण्यात आली आहेत.
- झोपडपट्ट्या सुधारण्याचा व्यापक कार्यक्रम जोरात सुरू आहे.
- आणि आता २ ऑक्टोबरच्या गांधीजयंती दिनापासून तर ग्रामीण भागातील व नगरपालिका क्षेत्रातील हरिजनवस्त्या व झोपडपट्ट्यांमध्ये अनुदान तत्त्वावर सामूहिक दूरचित्रवाणी संच बस-विण्याचा निर्णय महाराष्ट्र शासनाने घेतला आहे. राज्यात आजवर २,१५९ रंगीत व ३,२७० कृष्णधवल सामूहिक दूरचित्रवाणी संच ग्रामपंचायत क्षेत्रात बसविण्यात आले आहेत

**प्रगतीच्या रथाची दोन चाके–**
**एकात्मभाव आणि अथक प्रयत्न**

**डी जी आय पी आर**

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका








## महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ

# म रा ठी  वि श्व को श

" विज्ञान व तांत्रिक " तसेच " समाजशास्त्रे व मानव्यविद्या " या विषयांतील मानवी ज्ञान मराठी भाषेत उपलब्ध करून देण्याचा महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचा अभिनव लक्षणीय उपक्रम.

**प्रत्येकी सुमारे १२०० / १६०० पृष्ठांचे एकूण २० खंड.**

**मराठी विश्वकोशाचे १ ते १३ खंड व परिभाषासंग्रह (नमुना) खंड १८ वा विक्रीस तयार.**

**– उर्वरित खंड प्रकाशनाच्या मार्गावर –**

**खंड १४ वा लवकरच विक्रीस उपलब्ध होत आहे. किंमत : प्रत्येक खंडास रुपये १००/–**

अ) शासनमान्य शैक्षणिक संस्था, संशोधन व सांस्कृतिक संस्था, ग्रंथालये यांसह सर्वच " मराठी विश्वकोश " वाचकांना खंडांच्या खरेदीवर ३० टक्के सवलत म्हणजे प्रत्येक खंड रु. ७०/– ला.

ब) सुमारे ४५ हजार मराठी–इंग्रजी व इंग्रजी–मराठी पारिभाषिक संज्ञांचा " परिभाषासंग्रह " खंड १८ वा. मूळ किंमत रुपये २०/–. ३० टक्के सूट वजा जाता वाचकांना सदर खंड फक्त रुपये १४/– ला.

क) **महाराष्ट्र शासनाच्या प्रकाशनाचे तसेच पाठ्यपुस्तक मंडळाचे अधिकृत विक्रेते यांना खंडांच्या खरेदीवर ३७ टक्के सूट.**

**★ अधिक माहितीसाठी ★**

सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ,
एन्सा हटमेंट, " डी " ब्लॉक, आझाद मैदान, मुंबई–४०० ००१.
(दूरध्वनी क्र. ४१५०६९८) यांच्याकडे कृपया संपर्क साधावा.

**" मराठी विश्वकोश " खंडांच्या प्रती विक्रीसाठी**
**खालील विक्रीकेंद्रांवर उपलब्ध :**

**व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक भांडार व वितरण केंद्र–**

१) १० उद्योगनगर, स्वामी विवेकानंद पथ,
गोरेगाव (प.), मुंबई–४०० ०६२.
(दूरध्वनी क्र. ६९४०७१)

२) " बालभारती "
सेनापती बापट मार्ग, पुणे–४११ ००४.
(दूरध्वनी क्र. ५९४६५)

३) " बालभारती "
रवींद्रनाथ टागोर सायन्स कॉलेजसमोर,
महाराजाबाग रोड, नागपूर–४४० ०१२.
(दूरध्वनी क्र. २३०७८)

४) औद्योगिक वसाहत, पथ नं २ व ३,
रेल्वे स्टेशनजवळ, औरंगाबाद–४३१ ००१.
(दूरध्वनी क्र. ४११०)

अनुक्रमणिका

